॥ श्री ॥

भारत-इतिहास-संशोधक-मंडळ-स्वीयग्रंथमाला क्रमांक ३०

# शिवचरित्र-साहित्य

## खंड १ ला.

( शिरवळकर देशपांडे वगैरेंचे कागद )





संपादक

**कृष्णाजी वासुदेव पुरंदरे**

---

प्रकाशकः—

**दत्तो वामन पोतदार**, बी. ए.

**गंगाधरराव नारायणराव मुजुमदार**

चिटणीस, भा. इ. सं. मंडळ, पुणें.

---

**पुणें येथें**

'**आर्यभूषण**' छापखान्यांत **अनंत विनायक पटवर्धन**

यानीं छापिलें.

---

शके १८४८ ] **किंमत दीड रुपया.** [ इ. स. १९२६

# संपादकीय दोन शब्द.

सासवड हा गांव ऐतिहासिक बाबतींत फार महत्वाचा आहे. तेथें संशोधनास अत्यंत वाव असून संशोधकाचीच काय ती उणीव आहे. मराठेशाहीच्या इतिहासाशीं ज्यांचा अत्यंत जिव्हाळ्याचा संबंध पोहोंचूं शकेल अशीं कित्येक शिवकालीन व पेशवाईंतील घराणीं आज सासवडीं हयात आहेत. पैकीं सुप्रसिद्ध पुरंदरे घराण्यांतलि मौल्यवान् कागदपत्र तपासण्याचा योग सासवडीं असतां जुळून आला. सासवडीं अंबाजीपंत पुरंदरे यांच्या दोन शाखा विद्यमान आहेत. पैकीं वडील घराण्यांतील विद्यमान वंशज श्रीमंत रा. मल्हारराव पुरंदरे यांच्या कृपेनें पुरंदरे दप्तरांत एक दोन वर्षे मनमुराद काम करतां आलें; त्यामुळें इतिहाससंशोधनाचें प्राथमिक शिक्षण मिळण्यास पंचाईत पडली नाहीं. करतां प्रथम श्रीमंत रा. मल्हारराव पुरंदरे ह्यांचे मनःपूर्वक आभार मानणें जरूर आहे.

पुरंदरे दप्तरांतून मोकळें झाल्यानंतर पोटाचा व्यवसाय सांभाळून कित्येक ठिकाणीं संशोधनार्थ परिभ्रमण केलें. त्यांत गेल्या फाल्गुनमहिन्यांत मी व माझे मित्र रा. मार्तंड वामन जोशी हे शिरवळास संशोधनार्थ गेलों असतां एक अपूर्व योग जुळून आला. मित्रवर्य रा. जोशी यांच्या ओळखीनें शिरवळ येथें रा. बाबाजी खंडेराव देशपांडे यांजकडे जुने कागद मिळविण्याचें संधान लाविलें. सुशिक्षितांशीं गांठ पडल्यामुळें कागद मिळण्यास कसलीच अडचण पडली नाहीं. रा. देशपांडे यानीं मोकळ्या मनानें, आपला शेंकडों वर्षे जिवाच्या पलिकडे जपून ठेवलेल्या अमुल्य कागदपत्राचा, ठेवा आमच्या स्वाधीन केला. व या कृत्यानें त्यांनीं महाराष्ट्रास सदैव ऋणी करून ठेविलें आहे. मी, मित्र जोशी व खुद्द मालक ह्यांनीं दोन दिवस अहोरात्र खपून शें सवाशें जुने रुमाल तपासून ऐतिहासिक दृष्ट्या अत्यंत महत्वाचे कागद एकीकडे काढिले. त्यांतलि कांहीं निवडक पत्रें ह्या भागांत मुख्यतः घेतलीं आहेत. शिवाय चांबळी येथील रा. आपाजी पाटील सेंडकर, नाना सरनाईक, बलवंतराव सरनाईक, दत्तोपंत दाणी ( सासवड ) यांजकडे मिळालेलीं शिवकालिन पत्रें, महजर ह्यांचाहि ह्यांत समावेश केला आहे. शिरवळ व चांबळी येथील कागदांतील विषयांची संगती बरोबर लावण्याकरतां पुण्याचे रा. पिलोबा ठकार, रा. होनप देशपांडे वगैरेंचेहि कागद ह्यांत अंतर्भूत केले आहेत. ह्याशिवाय आणखीहि कांहीं ठिकाणचे कागद ह्यांत आहेत. पत्रांची निवड करतांना उगीच कांहीं तरी कागद छापले जाऊं नयेत ह्याबद्दल शक्य ती खबरदारी घेतली आहे. आपले संग्रहांतील कागद देणाऱ्या वरील सद्गृहस्थांचा मी फार आभारी आहें.

याशिवाय भा. इ. सं. मंडळानें या खंडास **स्वीय ग्रंथमालेंत** स्थान देऊन; रा. शंकरराव जोशी यांनीं सूचीचें जिकीरीचें काम करून देऊन आणि रा. दत्तोपंत आपटे यांनीं प्रस्तावना लिहून देऊन मला कायमचें ऋणी करून ठेवलें आहे.

या खंडाच्या छपाईच्या खर्चास मदतीदाखल पन्नास रुपये देण्याचें रा. रा. वाग्भट नारायण देशपांडे बी. ए. एल. एल. बी. वकील, सातारा यांनीं अभिवचन दिलें आहे. रा. वाग्भटराव देशपांडे हे शिरवळकर देशपांड्यांपैकीं असल्यानें त्यांनीं पितृऋण फेडण्याचे कामीं घालून दिलेलें उदाहरण अनुकरणीय आहे. या मदतीबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोंत.

मौजे पूर ( पुरंदर )
कार्तिक शु॥ १ शके १८४८

कृष्णाजी वासुदेव पुरंदरे

श्री.

प्रस्तुतचें पुस्तक भा. इ. सं. मंडळाच्या स्वीय-ग्रंथ-मालेंतील ३० वें म्हणून प्रसिद्ध करण्यांत संतोष वाटतो. या ग्रंथाचें सर्व श्रेय रा. पुरंदरे व रा. आपटे या दोघां आस्थेवाईक संशोधकांस आहे. श्रीशिवचरित्रसाहित्यमालेचे असेच भाग किंवा खंड पुढें प्रसिद्ध करण्याचा मंडळाचा हेतु आहे. सकल शिवचरित्रजिज्ञासूंच्या प्रोत्साहनानें तो सफल होईल अशी आशा आहे.

रा. पुरंदरे व रा. दत्तोपंत आपटे यांनीं आजचा हा खंड तयार करून मोठें अनुकरणीय उदाहरण घालून दिलें आहे. त्या बद्दल मंडळ त्यांचें निरंतर ऋणी राहील.

आश्विन व. ३० शके १८४८ भा. इ. सं. मं. मंदिर.

**दत्तो वामन पोतदार.**
**गंगाधरराव नारायणराव मुजुमदार.**
चिटणीस.

☞ टीपः-प्रस्तुत ग्रंथ शके १८४८ वर्ग ३।४ चे वरील सर्व वर्गांचे बेधाक सभासदांस नियमाप्रमाणें मोबदल्यांत मिळेल. वर्ग ३।४ चे सभासदांस एक प्रत अनुक्रमें निम्या व पाऊणपट किमतीस मिळेल.

चिटणीस.

## चुकीची दुरुस्ती.

प्रस्तावना पृ. २, टीप * यांतील सूत्रांत "हिजरी— ५८०" च्या जागीं "हिजरी—८५०" असें वाचावें.

# प्रस्तावना.



महाराष्ट्राचा शास्त्रशुद्ध इतिहास लिहिला जावा या हेतूनें ऐतिहासिक कागदपत्र प्रकाशित करण्याची परंपरा गेल्या पन्नास वर्षांपासून अनेक विद्वानांनीं चालविली आहे; तिला अनुसरून शिरवळकर देशपांडे व पुणें आणि सुपें येथील शिवशाहींतील घराणीं यांच्या दप्तरांतील कांहीं कागद प्रस्तुत खंडांत छापले आहेत. यांपैकीं ४२ कागद शिरवळकर देशपांडे यांच्या दप्तरांतले; २१ चांबळी येथील सरनाईक यांच्याकडचे; ६ पुणे येथील कसब्याच्या गणपतीचे पुजारी रा. निलकंठराव ठकार यांच्याकडचे; २ पुणें येथील होनप देशपांडे यांच्याकडचे, २ पेठकर पुरंदरे यांच्याकडचे, २ चांबळी येथील सेंडकरांकडले व १ उंबराणी येथील वाळवेकरांकडचा असे असून बाकीचे लेखांक पूर्वीं इतरत्र छापलेल्यांपैकीं संदर्भासाठीं येथें उध्दृत केले आहेत. बहुतेक सर्व कागद मिळविण्याचा व त्यांच्या नकला करण्याचा उद्योग या खंडाचे संपादक रा. **कृष्णाजी वासुदेव पुरंदरे** यांचा आहे. नकला मुळाशीं रुजू पाहण्याचें व कांहीं टीपा देण्याचें काम मीं केलें असून, मुद्रितें तपासण्याचें बरेंच काम रा. शंकरराव जोशी वाईकर यांनीं केलें आहे.

२. **मुसलमानांची दक्षिणेंत स्वारीः**— या खंडांत शिवशाहीच्या पूर्वीची महाराष्ट्रांतील परिस्थिति सांगणारे कित्येक लेखांक आहेत. त्यांवरून मुसलमानांचें लक्ष दक्षिणेकडे केव्हां गेलें व त्यांच्या ताब्यांत कोणता प्रदेश केव्हां आला हे दोन महत्वाचे प्रश्न उपस्थित होतात. सामान्यतः असा समज रूढ आहे कीं, शके १२१६ मध्यें अल्लाउद्दीनानें प्रथम देवगिरीवर स्वारी केली त्यापूर्वीं मुसलमानांचें लष्कर दक्षिणेकडे आलें नव्हतें; आणि हसनगंगूनें बहामनी राज्याची स्थापना केल्यापासून महाराष्ट्र यवनांच्या ताब्यांत आला. पण अलीकडच्या संशोधकांनीं प्रकाशित केलेल्या सामग्रीवरून वरील मतांत कांहींसा फरक करावा लागेल असें लक्षण दिसत आहे. कारण ज्ञानेश्वरी लिहिली जाण्यापूर्वीं यादवराजांच्या प्रशस्तींत नर्मदेच्या दक्षिणेकडील प्रदेशांचाच उल्लेख असला तरी दिल्लीश्वराच्या मनांत दक्षिणेकडील राजांना जिंकण्याची महत्वाकांक्षा शके १२१६ च्या पूर्वीं उद्भवली होती असें निश्चितपणें म्हणतां येतें. कारण ग्यासउद्दीनाच्या कारकीर्दींत शके १२०२

१ तैलङ्गक्षितिपालतूलनिचयप्रक्षेपझञ्झानिलो
गर्जद्गूर्जरगर्वपर्वतभिदादम्भोलिदोर्विक्रमः ।
हेलोन्मूलितकोंकणक्षितिपतिः कर्णाटलाटोद्भट-
क्षोणीपालविडम्बनः स हि महादेवः कथं वर्ण्यते ॥ १३ ॥

मध्यें पालम येथें कोरलेल्या शिलालेखांत "आगौडाद्गज्जणान्तं द्रविडजनपदात्सेतुबंधा त्समंतात्" म्हणजे बंगाल्यापासून गजनीपर्यंतचें व दक्षिणेस द्रविड देशादि सेतुबंधापर्यंतचे राजे दिल्लीपतीचें अंकितत्व मान्य करीत होते असें म्हटलें आहे इतकेंच नव्हे तर ग्यासुद्दीनाचें सैन्य दिग्विजयार्थ निघालें म्हणजे गौड, केरल, कर्नाट, महाराष्ट्र, गुर्जर व लाट हे देश घाबरून जात असा उल्लेख आहे. यावरून शके १२०२ च्या पूर्वी दक्षिणेंतील राजांना आपले अंकित करण्याची इच्छा दिल्लीच्या बादशहांच्या अंतःकरणांत उद्भूत झाली होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. निदान शके १२१६ मध्यें अल्लाउद्दीन रामराजावर चालून आला तीच काय ती मुसलमानांना दक्षिणेकडची पहिली माहिती असें तरी म्हणतां येणार नाहीं. यापुढें शके १२४० मध्यें हरपाळदेव मारला जाऊन दिल्लीकरांचें ठाणें देवगिरीस पडेपर्यंत व त्यानंतर दिल्लीकरांचें अंकितत्व झुगारून देऊन शके १२७० च्या सुमारास हसन गंगू यानें ब्राह्मणी राज्याची स्थापना करीपर्यंत जो काल लोटला त्याची माहिती सांगणारे विश्वसनीय असे मराठी लेख उपलब्ध नाहींत. मुसलमानी लेखक काय सांगतात तेवढें ऐकून घेऊन ऐतिहासिक जिज्ञासा तृप्त करून घेणें भाग पडतें.

३. **मुसलमानी इतिहासकार**— केवळ मुसलमानी लेखकांच्या म्हणण्यावर विश्वसून महाराष्ट्राच्या इतिहासाची संगती लावूं पाहणें शास्त्रशुद्ध होणार नाहीं. कारण त्यांच्या इतिहासांत हिंदूंच्या कर्तबगारीचा उल्लेख बहुधा टाळलेला आहे, आणि हिंदूंचा संबंध सांगण्याचा प्रसंगच आला तर तो विकृत अगर भलत्या स्वरूपांत मांडून खरा प्रकार छपविण्याचाहि त्यांनीं प्रयत्न केलेला आहे. त्यांतून बहामनी राज्याची स्थापना झाल्यापासून तो निजामशाहीस स्पष्टपणें उतरती कळा लागेपर्यंतच्या इतिहासास फक्त दोनच मुसलमानी ग्रंथ मुख्यत्वेंकरून आपणास उपयोगी पडण्याजोगे आहेत; एक फेरिस्ताचा म्हणजे **नौरसनामा** अथवा **तारीख–इ–इब्राहिमी** व दुसरा **बुर्हान–इ–मआसिर.** पैकीं फेरिस्ता कांहीं वर्षें अहमदनगर येथें होता व तेथून तो हिजरी ९९८* म्हणजे शके १५११ मध्यें विजापुरास गेला. आणि तेथील इब्राहीम जगद्गुरु या नांवानें प्रसिद्ध असणाऱ्या बादशहाच्या आश्रयास राहून त्यानें ग्रंथलेखनास सुरुवात केली व पुढें २५ वर्षें

२ यस्मिन् दिग्विजयप्रयाणकपरे गौडा निराडंबरा अंध्रा रंध्रपरायणा भयवशान्निष्केलयः केरलाः । कर्णा (टा) अपि कंदराश्रयपरा भ्रष्टा महाराष्ट्रजास्त्यक्तोर्जा किल गूर्जराः समभवन् लाटा किराटा इव ॥ १० ॥ (J. A. S. B. vol. XL III 1874.)

* हिजरी सनावरून शालिवाहन शक काढण्याचें सूत्रः ।

$$\text{शके} = \text{हिजरी} + ५१८ - \frac{\text{हिजरी} - ५८०}{३३\cdot५४}$$ (केतकरकृत क्रॉनालाजी पृष्ठ ८९ पहा.)

तरी त्यानें इतिहासलेखनाच्या कामीं खर्च केली. या ग्रंथाची सारांशवजा इंग्रजी भाषांतरें ब्रिग्ज (इ. स. १८२९) व डाऊ यांनीं छापिलीं आहेत. दुसरा ग्रंथ बुऱ्हाण-इ-मासिर. हा सय्यद् अली बिन अझीझुल्ला तबातबा यानें लिहिला असून त्याच्या लेखनास प्रारंभ हिजरी १००० मध्यें होऊन समाप्ती पुढें चार वर्षांनीं शके १५१७ मध्यें झाली. याच्या पूर्वार्धांत बहामनी राज्याची हकीकत असून उत्तरार्धांत निजामशाहीची माहिती, दुसऱ्या बुऱ्हाण निजामशाहच्या कारकिर्दीपर्यंत, दिलेली आहे. पैकीं पूर्वार्धाचें इंग्रजी भाषांतर मेजर किंग यांनीं इंडियन ॲंटिक्वरीमध्यें क्रमशः छापलें होतें तें पुस्तक रूपानें इ. स. १९०० मध्यें प्रसिद्ध झालें. निजामशाहीची हकीकत देणाऱ्या उत्तरार्धाचें मात्र इंग्रजी भाषांतर कॅनल हेग यांनीं इं. अँ. च्या १९२१-२४ पर्यंतच्या अंकांतून क्रमशः दिलेलें आहे. फेरिस्ता व सय्यद्अली यांचे एककल्ली ग्रंथ हिंदुद्वेषानें भरलेले असले तरी त्या काळच्या इतिहासाची एक बाजू तरी (अतिशयोक्ति वगळली असतां) समजून घेण्यास या ग्रंथांचा चांगला उपयोग होण्याजोगा आहे; आणि त्यांतल्या त्यांत सय्यद्अलीपेक्षां फेरिस्तास कांहीं तरी सत्याची चाड होती असें दिसतें. कारण त्यानें हिंदूंच्या कर्तबगारीचा उल्लेख टाळला असला, व हिंदूंच्या कत्तलीचीं वर्णनें रसभरित रीतीनें केलीं असलीं तरी बहमनी हें नांव 'ब्राह्मणी' या शब्दापासून व्युत्पादिलें पाहिजे व निजामशाहीचा संस्थापक हा पाथ्रीच्या कुलकर्ण्याचा मुलगा वगैरे गोष्टी नमूद करण्यास तो कचरला नाहीं; पण सय्यद्अलीनें मात्र अशा प्रसंगीं पराकाष्ठेचा लपंडाव केला आहे. बहमनी या शब्दाचा संबंध इराणांतील बहमन वंशाशी जोडण्याचा त्यानें प्रयत्न केला आणि बहिरी निजामशहाचें हिंदुत्व झाकण्यासाठीं अशी दंतकथा नमूद केली आहे कीं "बहमनी वंशांतील महमुदशहाच्या अंतःपुरांत एक दासी होती; ती त्यानें मलिक नायब नांवाच्या सरदारास नजर केली; त्यानें तिला घरीं नेली तेव्हां ती गर्भवती असल्याचें त्याच्या नजरेस आलें. ही गोष्ट त्यानें बादशहाच्या कानावर घातली; पण बादशहानें असें ठरविलें कीं भावी अपत्य मलिक नायब यानेंच पत्करावें. यामुळें त्या दासीचा मुलगा अहमद हा मलिक नायबाचा मुलगा अशी समजूत रूढ झाली!" ही काल्पनिक दंतकथा सय्यद्अलीनें दिली, याचें कारण मलिक नायब हा पाथ्रीचा कुलकर्णी ही गोष्ट त्यावेळीं लपण्याजोगी नव्हती; तेव्हां त्याचा मुलगा म्हणून गणला जाणारा अहमद बीजदृष्ट्या बहामनी वंशांतला होता असें भासविल्यास खपेल असें त्याला वाटलें. परंतु या अहमदशहाच्या नातु बुऱ्हाण निजामशहा यानें अल्लाउद्दीन इमादशहाकडे पाथ्री गांवाची मागणी करतांना 'हा गांव माझ्या पूर्वजांचा आहे यासाठीं तो मला पाहिजे' अशा अर्थाचे शब्द योजल्याचें फेरिस्ता व निजामुद्दीन वगैरे ग्रंथकारांनीं स्पष्टपणें लिहिलें आहे. अर्थात सय्यद्अलीची हकीकत म्हणजे स्वकपोलकल्पित आख्यान होय हें उघड

आहे। अशा रीतीनें बुर्हान-इ-मआसिर् या ग्रंथातलि व्युत्पत्त्या दूषित असल्यामुळें त्याच्या जोरावर स्मिथ वगैरे धोरणी इतिहासकारांनीं ' बहामनी ' शब्दाचा संबंध इराणाशी जोडण्याचा प्रयत्न केला आहे तो ग्राह्य धरतां येत नाहीं. फेरिस्ता व तस्करतुलमलुक आणि मराठी बखरी यांनीं सांगितलेली हसन व मिरजेचा गंगरस ब्राह्मण यांची हकीकत इराणच्या बादरायणी संबंधापेक्षां अधिक ग्राह्य धरणें भाग आहे.

४. बेदरची पादशाही— ' ब्राह्मणी ' राज्याच्या नांवाचा विचार झाल्यानंतर महाराष्ट्राच्या इतिहासाच्या दृष्टीनें गुलबर्ग्याची बादशाही व बेदरची बादशाही हा भेद लक्षांत ठेविला पाहिजे. या बादशाहीचें ठाणें पहिल्या आठ सुलतानांच्या कारकीर्दीत ( म्हणजे शके १२६९-१३४४ पर्यंत ) ७५ वर्षेपर्यंत गुलबुर्गा किंवा कलबुर्गा येथें होतें; आणि अहमदच्या कारकीर्दीपासून पुढें ९६ वर्षेपर्यंत ( शके १३४५-१४४० ) त्याच्या राजधानीचें ठिकाण बेदर येथें होतें. या खंडांत शिरवळ, पुरंदर वगैरे प्रांतांतील प्राचीन हकीकत सांगणारे जे कागद छापले आहेत त्यांत देखील बेदरच्या बादशाहीचा उल्लेख आहे, कलबुर्ग्याच्या पादशाहीचा नाहीं. मराठी वाङ्मयात जुनी बादशाही म्हणजे बेदरची असा जो अर्थ रूढ झाला आहे त्याचें कारण असें दिसतें कीं, बेदरला बादशाही आल्यापासून आजच्या महाराष्ट्राचा अधिकाधिक भाग ब्राह्मणी राज्यांत सामील होऊं लागला. कलबुर्ग्यास राजधानी स्थापन करणाऱ्या हसनाचा खास मुलूख म्हणजे हुकेरी, बेगळांव, मिरज हे प्रांत होते; आणि त्याच्या राज्याचा विस्तार मुख्यत्वें करून कर्नाटकाकडे व तेलंगणाकडे होता व महाराष्ट्रापैकीं दौलताबाद वगैरे ठिकाणें ब्राह्मणी राज्यांत अंतर्भूत झालीं असूनहि पश्चिम महाराष्ट्राच्या बऱ्याच भागांत लहानसहान राजे व पाळेगार स्वतंत्रपणें नांदत असत. कोंकणांतील व गोव्यांतील कांहीं बंदरें मात्र कलबुर्ग्याच्या बादशाहींत मोडत असावीं असें म्हणतां येईल.

५. दुर्गादेवीचा दुष्काळः— शिरवळच्या इतिहासांतली अगदीं जुनी आठवण म्हणून टिपणकारानें ( ले. २ ) दुर्गादेवीचा दुष्काळ शके १३१८-१३३० पर्यंतच्या १२ वर्षांत पडला असें सांगितलें आहे. त्यानंतर ३० वर्षें चारणकरू याची ' राव ' होती; पुढें १३६१ मध्यें बेदरच्या बादशहानें दादो नरसिंह यास रवाना केलें अशी हकीकत या टिपणांत आहे. खटाव येथील एका अप्रकाशित टिपणांत या संबंधींची कांहींशी अधिक माहिती आहे ती अशीः— " बेदरी पादशाही सुलतान वबु करीत असता श्री शके १३१८ वरूपे धाता नाम संवछरे सन ८०६ ते वरती दुर्गादेवीचा दुकाल पडिला. बारा वरुसें आवर्शण. पाऊस नाही. या करिता मुलूक खराब होऊन मजरा पडिले. मुलकी वस्ती नाहीं येसे जाहले.

मुलूक वैरान वरुषें ३०. त्यावर विद्यानगरीहून दादो नरसीह अथर्ववेदी भालंजन गोत्री पाप्र कराडास आला. जुजवी वस्ती होती. तेथून मुलुकाचे वर्तमान घेता, मुलूक खराब देखोन बबूचे लेक हमशाऊ पादशाही करीत होता त्यास बेद्रास जाऊन भेटला. मुलुकाचे अहवाल सांगोन आबादानीबद्दल कारमुलकी पा कराड बावन चाहुडीचें करून आला. मुलुकी कोणी वतनदार नव्हते. चारणीस चारण-कर आले होते, त्यास वतनें करून दिल्हीं." यावरून दुर्गादेवीच्या दुष्काळानंतर दादो नरसिंह बेद्रच्या बादशहातर्फे कऱ्हाडाकडे आला असें म्हणतां येतें. या दादो नरसिंहाचें आडनाव 'काळे' असें होतें; आणि त्याच्या बरोबर बेद्रच्या बादशहानें एक तुर्की खोजा अधिकारी म्हणून दिला होता तो गोरा होता. यामुळें 'काळे' आणि 'गोरा खोजा' यांचा एकत्र उल्लेख करतांना 'काळा खोजा' व 'गोरा खोजा' असे जोडशब्द वापरण्याचा प्रघात लोकांत पडला असावा असा ग्रँडफनें तर्क केला आहे. पण या तर्कापेक्षां महत्त्वाचा मुद्दा म्हणजे या दुष्काळाची व्याप्ती केवढी होती हा आहे. ग्रँडफनें आधारास घेतलेला कागद वाईच्या देशमुखाजवळचा होता. आणि या खंडांतला कागद शिरवळच्या देशपांड्यांच्या संग्रहांतला आहे. या खेरीज खटावच्या बाजूस या दुष्काळाचा उल्लेख करणारे कागद आढळतात त्याचाहि मतलब वर सांगितलेल्या प्रकारचाच आहे. लेखांक २ मध्यें 'प्रिथिवीवर दुष्काळ पडला' असे शब्द आहेत. त्यांत 'प्रिथीवीवर' या शब्दांत शिरवळपासून वाई-पर्यंतच्या व खटाव, कऱ्हाड प्रदेशाचा अंतर्भाव करण्यास तर कांहीं हरकत दिसत नाहीं. पण या पलीकडे दुष्काळाच्या व्याप्तीचा प्रदेश केवढा होता हें सांगणें कठिण आहे. फेरिस्ता व सय्यदअल्ली यांनीं आपल्या ग्रंथांत या दुष्काळाचा उल्लेख केला नाहीं. यावरून अनुमान करावयाचें असेल तर ज्या भागांत हा दुष्काळ जाणवला तो भाग ब्राह्मणी राज्यांत मोडत नव्हता किंवा दुष्काळाची व्याप्ती फारशी मोठी नव्हती असें विधान करावें लागेल तथापि अनुल्लेख हा निश्चयात्मक पुरावा नव्हे हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

६. **दक्षिणी मुसलमान**—दुर्गादेवीच्या दुष्काळानंतर व बहामनी सुलतानाची राजधानी बेद्र येथें आल्यानंतर शिरवळ, वाई वगैरे महाराष्ट्राच्या पश्चिम भागाकडे बेद्रच्या बादशहाची दृष्टि वळण्यास अनेक कारणें घडलीं असें दिसतें. विशे-षतः अल्लाउद्दीन अहमदशहा (शके १३५७ ते १३७९) याच्या कारकीर्दींत घडलेल्या दोन गोष्टी संस्मरणीय आहेत. उत्तर हिंदुस्थानांत दिल्लीचें तक्त मुसल-मानांच्या ताब्यांत गेल्यापासून मुसलमान सरदार आपसांत भांडत असत. पण तीं भांडणें स्वतः दिल्लीची गादी बळकावण्यासाठीं होत असत; दिल्लीपासून फुटून निराळ्या ठिकाणीं बादशाही स्थापण्याचा प्रयत्न उत्तरेकडील मुसलमानांनीं बहुधा केला नाहीं. परंतु नर्मदेच्या दक्षिणेस वावरणाऱ्या मुसलमानी सरदारांची मनोवृत्ति या

बाबतींत भिन्न होती. त्यांनीं दिल्लीपतीचें अंकितत्व थोड्याच वर्षांत झुगारून दिलें व पुढेंहि ब्राह्मणी सुलतानांशीं राजनिष्ठ राहण्यापेक्षां आपापल्या प्रांतांत स्वतंत्र राज्यें स्थापण्याचीच प्रवृत्ति त्यांच्या ठिकाणीं बलवत्तर होती. याचें कारण दक्षिणेंतील मुसलमानी वर्ग एकजात नसून परदेशी व दक्षिणी हा भेद त्यांच्या ठिकाणीं तीव्रतेनें जाणवत होता हें होय. इराण, तुर्कस्तान, अरबस्तान येथून आलेले साहसप्रिय मुसलमान आपणास अस्सल वंशांतले व अभिजात समजून येथील बाटे मुसलमानांना तुच्छ लेखीत असत; आणि महत्वाच्या सरकारी जागा परदेशी लोकांना अगर त्यांच्या मुलांनाच मिळाल्या पाहिजेत असा ते आग्रह धरीत. यामुळें ही गोष्ट येथील बाटलेल्या महत्त्वाकांक्षी मुसलमानांना पटण्याजोगी नव्हती.

**७. चाकणची कत्तल**— अशा रीतीनें मुसलमानांतील ही तेढ विकोपास जाऊन तिचा स्फोट चाकण येथील कत्तलीच्या स्वरूपानें झाला. त्याची हकीकत थोडक्यांत अशी आहे. हिजरी ८४९ ( =शके १३६७ ) मध्यें अल्लाउद्दीन अहमदशहाच्या कारकीर्दींत खल्फ मलिकतुजार यानें संगमेश्वरबंदर हस्तगत करण्याचा विचार केला. याचें कारण त्या बाजूस दाट जंगल असल्यामुळें त्याच्या आश्रयास राहून पुष्कळ चोर व दरवडेखोर छापे घालीत; यामुळें त्या मार्गांतून जाणाऱ्या येणाऱ्या मुसलमान यात्रेकरूंस नेहमीं भय वाटत असे. मलिकतुजारानें प्रथम एक किल्ला घेऊन तेथील किल्लेदार शिर्के यास कैद केलें; तेव्हां शिर्क्यानें मुसलमानी सैन्याशी गोडी लाऊन असें बोलणें चालविलें कीं " मला इकडील जंगल व प्रदेश याची बारकाईची माहिती आहे. तेव्हां माझ्या बरोबर तुम्ही सैन्यासह याल तर तुम्हांस नेमके संगमेश्वरच्या पायथ्याशीं पोंचवितों; म्हणजे तुम्हास तें बंदर सहज घेतां येईल." मलिकानें शिर्क्याच्या म्हणण्यास मान्यता दिली; आणि सैन्यांतील लोक नाखुष होते तरी त्यांचें म्हणणें न ऐकतां शिर्क्यानीं दाखविलेल्या वाटेनें निबिड जंगलांतून व डोंगरांच्या दऱ्या खोऱ्यांतून जातांजातां हें मुसलमानी सैन्य एका अत्यंत कठिण जागीं येऊन पोंचलें. त्या ठिकाणीं तीस चाळिस हजार हिंदु सैन्य आधींच दबा धरून राहिलें होतें; आणि त्यांच्या तडाक्यांतून या मुसलमानी सैन्याची सुटका होणें अशक्य झालें. शिवाय मलिक तुजार त्याचवेळीं फार आजारी पडला. सारांश हिंदु सैनिकांनीं त्या मुसलमानी सैन्यांतील बहुतेक सैन्याची कत्तल केली. व त्यांत मलिकतुजार व बरेच सय्यद लोक प्राणास मुकले. कांहीं थोडे लोक या प्रसंगांतून निभावले ते मलिकाच्या ठाण्याचें ठिकाण चाकण येथें गेले. इकडे दक्षिणी सरदारांनीं परदेशी सरदारांच्या हेतूविषयीं बादशहाचे मन कलुषित करून शिर्क्यांच्या प्रसंगांतून बचाऊन चाकणास आलेल्या परदेशी सरदारांची कत्तल करावी असा हुकूम मिळविला होता. त्याप्रमाणें निजामुलमुल्क, राजा रुस्तम व मशीरउलमुल्क हमजा यानीं हिंदु व मुसलमान यांचें मिळून एक मोठें

लष्कर चाकणच्या किल्ल्यास वेढा देण्यासाठीं नेलें; त्यावेळीं अस्सल वंशाचे १२०० सय्यद व खेरीज १००० परदेशी मुसलमान चाकणच्या किल्ल्यांत रहात होते. दक्षिणी मुसलमानांचें सैन्य किल्ल्याजवळ आलें तेव्हां तडजोडीचें बोलणें सुरू झालें. त्यांत पहिल्या दिवशीं सुरक्षितपणें जाऊं देण्याचा करार करून व आंतील लोकांना आणा शपथा देऊन बाहेर आणलें व परत किल्ल्यांत जाऊ दिलें. यामुळें विश्वास पटून दुसरे दिवशीं किल्ल्यांतलि सर्व लोक मेजवानीस म्हणून बाहेर आले; आणि त्या प्रसंगीं त्यांची दक्षिणी मुसलमानांनीं सपशेल कत्तल केली." चाकणच्या कत्तलीचें साल फेरिस्ताच्या मतें शके १३६८; बुऱ्हाण-इ-मासिरच्या मतें १३७६; आणि निजामुद्दीन अहमदच्या मतें शके १३६७ हें आहे. ही कत्तल झाली त्या वेळीं दक्षिणी व हबशी लोकांचा पक्ष अधिकारारूढ होता; आणि नंतर खरा प्रकार सुलतानास कळून आल्यावर दक्षिणी पक्षाच्या हातून सूत्रें काढून घेण्यांत आलीं. दौलताबाद तेथील चांदमिनारच्या स्तंभावर कोरलेला लेख ( ले. ८५ ) शके १३६७ मधला आहे व त्यात हबशी आमलदार त्याठिकाणीं असल्याचा उल्लेख आहे. यावरून चाकणच्या कत्तलीची मिति हीच असावी असें ठरतें. * परदेशी पक्ष अधिकारारूढ झाल्यावर पुनः शफशीखान यास मलिक तुजार हा किताब मिळून त्याच्याकडे दाभोळ, जुन्नर, चाकण, पुणें, सुपे व शिरवल या प्रांतांचा हवाला देण्यात आला व याबद्दलचें पत्र ( ले. ८६ ) उपलब्ध आहे. त्या अर्थी शके १३७२ पूर्वी शिरवल परगण्यास त्याचें ठाणें कायम झालें होतें हें उघड दिसतें. याखेरीज शके १३६८ मध्यें 'विजापूर, भागानगर, देवगिरी व आमदाबाद बेदर अशा चार तरफा होऊन चार सुभ्यांची रवानगी झालीं' हें ले. २ मधील विधानहि मुसलमानी ग्रंथांतील हकीकतीशीं विसंगत नाहीं.

८. **नृसिंह सरस्वतींचा काळ**—अल्लाउद्दीन बहामनीच्या कारकीर्दींतील दुसऱ्या एका गोष्टीचा उल्लेख मराठी ग्रंथांतून आढळतो तो नृसिंहसरस्वतींच्या संबंधाचा. गुरुचरित्रांत 'सद्गुरु बैसले निजानंदीं' याचा काळ सांगतांना कन्यागत गुरु, बहुधान्य संवत्सर, माघवद्य १ शुक्रवार, उत्तरायण वगैरे योग सांगितले आहेत.

---

* चाकणची कत्तल ही हबशी व दक्षिणी पक्षाच्या सरशीची निदर्शक होती; व ही कत्तल केवळ चाकण येथेंच तेवढी झाली असा अर्थ नसून ती ठिकठिकाणीं झाली व पर्वीझ हबशानें दौलताबादच्या स्तंभावरील शिलालेखांत 'मुडद्यांवर' या स्तंभाचा पाया उभारला असें ( ले. ८५ ) म्हटलें आहे तें कर्नल हेग याच्या मतें दक्षिणी पक्षानें परदेशी पक्षावर मिळविलेल्या तात्पुरत्या सरशीचें सूचक आहे. ही विचारसरणी मान्य केल्यास शिर्क्यांच्या शासनार्थ कोकणाच्या जंगलांत कापला गेलेला पहिला मलिकतुजार व हें प्रकरण संपून पुनः परदेशी पक्षातर्फे कासीम बे शफसीखान यास मलिकतुजार हें पद मिळून तो पुनः दौलताबाद येथें कामावर येऊन पोंचेपर्यंत निदान वर्ष दीडवर्ष लोटलें असलें पाहिजे; व या मधल्या अवधींत हा शिलालेख कोरला गेला असें म्हणतां येईल.

त्यावरून गणित करून पाहतां हा योग शके १३८० मध्यें जमतो.* नृसिंहसरस्वतींचा उल्लेख फेरिश्ता अगर सय्यदअली यांच्या ग्रंथांतून आढळत नाही. तरी गुरुचरित्रांत वर्णन केल्याप्रमाणें अल्लाउद्दीन पायाच्या व्रणानें पीडित असल्याचा उल्लेख या दोघांच्याहि ग्रंथांतून आहे. ३१४ वर्षे याला ही पीडा होती आणि त्यानें, तो मेला अशीहि वार्ता मध्यंतरी उठली आणि यामुळें शत्रू चालून आले; या दुखण्यांतून कांहींसा बरा होऊन सैन्य घेऊन तो चाल करूं शकला वगैरे हकीकत त्यांनीं दिली आहे. त्या अर्थी गुरुचरित्रांत उल्लेखिलेला बेदरचा बादशहा म्हणजे अल्लाउद्दीन बहामनी असें म्हणतां येतें. तो शेवटीं पायाच्या व्रणानेंच वारल्याचा शक या दोघांनींहि १३७९ दिला आहे; तझकरतुलमुलकमध्यें हा मृत्युशक १३८१ सांगितला आहे. नृसिंहसरस्वतींचा समाधिकाल शके १३८० असल्यामुळें त्यानंतर शके १३८१ मध्यें बादशहाचा मृत्यु झालेला असेल असें अधिक संभवनीय दिसतें. तथापि बादशहाची भेट होऊन तो बरा झाला; नंतर नृसिंहसरस्वतींनीं समाधि घेतली आणि त्यानंतर बादशहा मरण पावला असेंहि मानण्यास फारशी हरकत नाहीं. सुलतान अल्लाउद्दीन दयाळु, उदार, विद्वान व विलासी असून त्यानें आपल्या कारकीर्दीच्या प्रारंभीं अनेक देवळें मोडून मशीदी बांधल्या. तो गरीबांचा कैवारी असून दारूचें व्यसन बंद पाडण्यासाठीं त्यानें फार कडक उपाय योजले होते. शुक्रवारीं मशीदींत तो स्वतः खुत्बा वाचून कुराणाचें विवेचन करी; आणि त्यावेळीं आपण विद्वान, देवभक्त, न्यायी व दयाळु असल्याचें बोलून दाखवी. परंतु चाकणची कत्तल झाल्यापासून अल्लाउद्दीनाविषयीं तिरस्कार व्यक्त करणारे कांहीं मुसलमान होते. त्यापैकीं सय्यद अजल यानें मशीदींत अल्लाउद्दीनाच्या तोंडून वरील शब्द निघतांच "तूं लबाड आहेस; न्यायी व दयाळु नाहींस; कारण तूं चाकण येथें महमद पैगंबराच्या शुद्ध वंशांतील लोकांची कत्तल करविलीस!" असा रोखठोक जबाब दिला (बु. मा. पृ. ८०). यावरून कडव्या मुसलमानी पक्षास अल्लाउद्दीनाचीं मतें पटत नव्हतीं एवढें स्पष्ट दिसतें.

९. **परदेशी पक्षाचा उतरता काळ**— अल्लाउद्दीनामागून हुमायून सुलतान गादीवर आला. त्याची तर फेरिश्तानें फारच निंदा केली आहे; व त्याला प्रारंभापासून 'जालीम' म्हणजे क्रूर हें विशेषण दिलें आहे. याचें कारण मुसलमानांना विशेष सवलती देण्याऐवजीं न्यायाच्या बाबतींत तो कोणाचीहि भीडभाड धरीत नसे हें आहे. सय्यदअली म्हणतो "विद्वत्ता, वक्तृत्व व चातुर्य या बाबतींत समकालीन बादशहांत हुमायुनशहाच्या तोडीचा एकहि राजा नव्हता. शौर्य व शरीरसामर्थ्य यांच्या बाबतींत तर तो अनुपमेय होता. पण इतके सद्गुण असून-

---

* मात्र कुंभसंक्रांत असें म्हटलें आहे तें जमत नाहीं. त्यावेळीं मकर राशींत रवि होता. भा. इ. सं. मं. इतिवृत्त शके १८३७ पृ. १२२ पहा.

हि तो स्वभावानें क्रूर होता. अपराधी लोकांना ठार करण्याच्या कामीं अगदीं दयामाया न दाखवितां लहानसहान अपराधाबद्दल देखील मुसलमानांचें रक्त सांडण्यास तो बिलकुल भीत नसे " ( बु. मा. पृ. ८२ ). या हुमायुनाच्या कारकीर्दींतील ( शके १३७९--१३८३ ) दुसरी महत्वाची गोष्ट म्हणजे स्वतंत्र निजामशाहीच्या संस्थापकाचा जनक उद्यास येऊं लागला ही होय. विजयनगरच्या राजाशीं युद्ध करतांना अल्लाउद्दीनाच्या कारकीर्दींत जे कैदी संजरखानाच्या हातीं लागले त्यांत वऱ्हाडांतून दक्षिणेंत पळून गेलेल्या एका ब्राह्मणाचा मुलगा होता; त्याला हुमायुनाच्या कारकीर्दींत हसन बहिरी हें नांव मिळून सारंगखान हा किताब देण्यांत आला. या हुमायुनाच्या कारकीर्दींत कडवे मुसलमान अगदीं त्रस्त झाले होते व तो मेला तेव्हां परमेश्वरानें आपणावर मोठी खैर केली असें त्यांना वाटलें. आणि मनांतला हा राग व्यक्त करण्यासाठीं त्याचा मृत्यु निदर्शित करणारा जो कालश्लेष* त्यानीं योजला त्यांत 'झौक जहान' म्हणजे हा मृत्यु 'जगास आनंद देणारा' आहे अशी शब्दरचना केली.

या सर्व हकीकतीवरून या सुमारास दक्षिणी व हबशी मुसलमानांचा एक आणि कडव्या परकीय मुसलमानांचा दुसरा असे दोन पक्ष अस्तित्वांत येऊन बहामनी राज्याचीं शकलें पडण्याची तयारी होत चालली होती हें स्पष्ट आहे. तथापि हें वैमनस्य विकोपास जाऊन त्याचें पर्यवसान पांच शाह्या स्थापण्यांत होईपर्यंत २५।३० वर्षें लोटावीं लागलीं. व या अवधींत महमद

* संस्कृतमध्यें ज्याप्रमाणें एकाक्षरी कोश आहे त्याप्रमाणें फारशींत संख्यानिदर्शक एकाक्षरी कोश आहे. तो ज्या पद्धतीनें रचला आहे तिला 'अब्जद' पद्धति म्हणतात. या पद्धतींत योजलेले अक्षरांचे संकेत असे आहेत.

अ = १; आ ( आइन ) = ७०; इ = १०; उ = ६; क = २०; कं ( नुक्तेदार ) = १००; ख = ६००; ग = २०; घ ( घइन ) = १०००; च = ३; ज़ ( जीम ) = ३; जं ( जे, झे ) = ७; झ ( झाल ) = ७००; झ्व ( झ्वाद ) = ८००; झो ( झोइ ) = ९००; तं ( नुक्तेदार ) = ४००; त ( तोइ ) = ९; द = ४; न = ५०; प = २; फ = ८०; ब = २; म = ४०; य = १०; र = २००; ल = ३०; व = ६; श = ३००; स = ६०; स्व = ९०; सं = ५००; ह ( हव्वझ ) = ५; हे ( हुत्ती ) = ८..

फारशींत ज, झ, त, ह वगैरे उच्चार व्यक्त करण्यास अनेक वर्ण असल्यामुळें त्यांतील भेद व्यक्त करण्यास देवनागरी लिपींत आणखी कांहीं सांकेतिक वर्णांची भर घालणें भाग पडतें. ती घालतांना फारशींत ज्या वर्णावर नुक्ते म्हणजे टिंबे आहेत ते व बिननुक्त्याच असे भेद पाहून वर लिहिलेली अक्षरयोजना लिहिली आहे. हुमायुनाच्या मृत्यूचा कालश्लेष सांगणारीं अक्षरें अशीं आहेत—

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| झ | उ | कं | ज़ | ह | अ | न |
| ७०० | ६ | १०० | ३ | ५ | १ | ५० |

यांतील आंकड्यांची बेरीज ८६५ असून हा हुमायुनाच्या मृत्यूचा हिजरी सन आहे.

गवान नांवाच्या कर्त्या पुरुषानें कडव्या मुसलमानांचा पक्ष अधिकारारूढ करून बहामनी राज्याची मर्यादा व्यापक करून दाखविली. परंतु त्याचें वर्चस्व दाक्षिणात्य मुसलमानांना मान्य होण्याजोगें नसल्यामुळें त्यांनीं कट करून महमद् गवानाचा खून केला. या खुनानें ' परदेशी ' पक्षाचें अंतःकरण विदीर्ण झालें; आणि गवानच्या मृत्यूचा कालश्लेष ‡ ' बे गुनाह महमूद् गवान शुद् शहीद्' ( = निरपराधी महमद् गवान बळी पडला ) असा आढळतो; तो, परदेशी पक्षाचा व त्यावेळच्या मुसलमानी ग्रंथकारांचा चडफडाट अप्रत्यक्षपणें वर्णन करतो. या महमद् गवानानें मुसलमानी धर्माच्या प्रसारार्थ कसून मेहनत केली व ओरिसाच्या राजाशीं लढतांना सांपडलेल्या कैद्यांतून कांहीं ब्राह्मण निवडून त्यांची कत्तल यानें बादशहाच्या हातून करविली व 'गाझी' ही पदवी धारण करण्याचा सल्ला मुहमद्शहास दिला. त्याप्रमाणें बहामनी राजांपैकीं यानेंच काय तें ' गाझी ' हें उपपद् लावलें. पण ही गाझी पदवी अशुभसूचक होती व ब्राह्मणाच्या आशीर्वादानें हसन गंगूस मिळालेलें ब्राह्मणी राज्य मुहमदाच्या हातून लयास जाण्यास मुहमदाची ब्रह्महत्या कारणीभूत झाली असा दाक्षिणात्यांचा समज असल्याचें फेरिस्तानें नमुद् केलें आहे.§ तात्पर्य मुहमदशहा मरण पावल्याचा कालश्लेष * ' खराबी दकन ' म्हणजे दक्षिणेचा नाश या शब्दांत धर्माभिमानी ग्रंथकार करतात, याचा अर्थ; 'तो मेल्यानंतर परदेशी पक्ष दाक्षिणात्य पक्षास आवरून धरण्यास असमर्थ ठरला' असा घेतला पाहिजे.

१८ **ब्राह्मणी सुलतानाविषयींचा पूज्यभाव**– मुहमद्शहा व गवान यांच्या मृत्यूनंतर कासीम बेरीद् यानें सर्व अधिकार ताब्यांत घेऊन बहामनी सुलतानांना नामधारी बनविलें. परंतु कासीमाच्या अंगीं कर्तृत्वशक्ति बेताची असल्यामुळें निरनिराळ्या तर्फांचे सुभेदार मध्यवर्ती सत्तेस न जुमानतां स्वतंत्रपणें वागूं लागले. तथापि बेदरच्या पादशाहीविषयींची पूज्यबुद्धि त्यांच्या मनांतून नष्ट होण्यास फार काळ लागला हें लक्षांत ठेवलें पाहिजे. ' बहामनी वंशांतील पुरुषांचें अंकितत्व आम्हांस मान्य आहे; परंतु त्यांना बाहुलें बनवून कारभार करणारा परदेशी काशीम यास आम्ही आमचा धनी होऊं देणार नाहीं ' अशी या सुभेदारांची तक्रार होती. यामुळें आपापल्या प्रांतांत स्वतंत्रपणें वागूनहि आपणास ' शहा ' म्हणविण्यास ते तितके उत्सुक नव्हते. याचीं कांहीं उदहरणें नमूद् करतों. वऱ्हाडच्या फत्तुल्लानें सोळा

‡ यांतील अक्षरविन्यास असा आहेः ' बइ गनअह महमउद् गअवअन शउ् शहइद ' याची किंमत ८८६ हिजरी = शके १४०३

§ ब्रिग्ज व्हा. २ पृ. ४९७

* यांतील अक्षरविन्यास असा आहेः ' खरअबइ दकन ' अक्षरांची किंमत ८८७ हिजरी = १४०४ शके.

वर्षे स्वतंत्रपणें कारभार केल्यावर शके १४२८ मध्यें बहामनी वंशांतील नामधारी सुलतानास भेटण्याचा त्याला योग आला. तेव्हां सर्वांसमक्ष मोठ्या आदबीनें त्यानें सलाम केला! विजापूरचा इसुफअदिलशहा महमूदशहा बहामनी याच्य मदतीसाठी द्रव्य व सैन्य पुरविण्यास उत्सुक असे; आणि त्याच्या मागून इस्माइल अलिशहानें बहामनी राजपुत्रास आपली बहीण दिली त्यावेळीं 'शहा' हा किताब सोडून आपण बहामनीचा एक नोकर या नात्यानें वागण्यास तयार आहों हें व्यक्त करण्याची हरएक संधी त्यानें साधली. परंतु कासीमाच्या कचाट्यांतून सुटण्याची त्या राजपुत्राची इच्छाच दिसली नाहीं यामुळें इस्माइलाचा नाइलाज झाला. बहामनी वंशांतला शेवटला सुलतान कलिमुल्ला जीव वांचविण्यासाठीं अहमदनगर येथें बुऱ्हाण निजामशहाच्या आश्रयास गेला तेव्हां देखील बुऱ्हाणाची राजनिष्ठाप्रदर्शक लीनता इतक्या थरास गेली कीं लोक त्याबद्दल हंसू लागले, आणि "हा बहामनी सुलतान शून्यवत आहे व त्याच्याविषयीं आदरभाव व्यक्त करण्यानें कोणताहि फायदा न होतां उलट तोटाच होणार आहे" असें मुत्सद्यांनीं स्पष्टपणें बजावलें तेव्हां बुऱ्हाणानें राजनिष्ठेचें प्रदर्शन आवरतें घेतलें. गोवळकोंड्याचा कुली कुतबुलमुल्क तर १५ वर्षे स्वातंत्र्याचा उपभोग घेत असूनहि महमूदशहा बहामनी मरेपर्यंत म्हणजे शके १४४० पर्यंत त्यानें शहा ही पदवी धारण करण्याच नाकारलें. तात्पर्य दिल्लीच्या गादीविषयीं उत्तरहिंदुस्तानभर जसा पूज्यभाव होता तसा बेदरच्या गादीविषयीं दक्षिणमधील हिंदु व मुसलमान लोकांत विलक्षण आदरभाव फार वर्षे नांदत होता; यामुळें त्यास धक्का देणारें आपलें स्वातंत्र्य जाहीर करण्यास इकडील सुभेदार कचरत असत.

११ **निजामशाहीचें वैशिष्ट्य**—बहामनी राज्याचें पोट फोडून ज्या चार शाह्यां बाहेर पडल्या त्यांत अहमदनगरची निजामशाही व वऱ्हाडची इमादशाही यांची जात निराळी होती. विजापूरचा इसुफ आदिलखान व भागानगर ऊर्फ गोवळकोंडें येथील कुली कुतुबुलमुल्क हे थेट तुर्कस्थानांत जन्मलेले असून ते कडवे शियापंथी होते; आणि त्यांचा ओढा परदेशी मुसलमानांचें प्रस्थ माजविण्याकडे होतें. या दोनही ठिकाणीं दक्षिणी मुसलमान व हिंदू सरदार यांना वाव देण्याइतका सौम्यपणा बादशहांच्या अंगीं येण्यास पांच पन्नास वर्षे लोटावीं लागलीं. परंतु निजामशाही व इमादशाही यांचे संस्थापक दक्षिणी मुसलमान असून त्यांचा व शिद्दी मुत्सद्यांचा चांगला स्नेह असे व धर्माभिमानापेक्षां राजकीयदृष्टीच आपल्या भाग्योदयास जास्त उपयोगी पडेल असें पटण्याजोगी परिस्थिती त्यांच्या भोंवतीं होती; यामुळें या दोनही ठिकाणीं मराठे सरदारांना आपलें कर्तृत्व दाखविण्यास पुष्कळवेळा चांगला वाव मिळाला. पैकीं निजामशाही सरासरी दीडशे वर्षे चालली. त्या

अवधींत मुसलमानांत परदेशी व दक्षिणी, शिया व सुनी आणि हबशी व दक्षिणी असे उपपंथ व पोटभेद माजून मुसलमानी समाज कमजोर व मराठा समाज शिरजोर होत गेला. या शिवाय सभोंवारच्या इतर शाह्यांशीं लढण्याचे प्रसंगीं निजामशाही सुलतानांना मोठमोठीं सैन्यें उभारावीं लागत यामुळें देखील बहुसंख्याक हिंदू समाजांतील लोकांना लष्करी पेशा पत्करण्याचीं द्वारें खुलीं झालीं. शेवटीं अकबराच्या कारकीर्दींत दिल्लीपतींनीं जेव्हां दक्षिणेकडे लक्ष दिलें तेव्हां तर इकडील सर्वच लोकांनीं व सुलतानांनीं 'आपण दक्षिणी आहों' हें लक्षांत घेऊन एकजुटीनें दिल्लीच्या मोगलाशीं कसें झगडावयाचें हा प्रश्न उपस्थित केला. त्यावेळीं या नवीन संकटाचें व परिस्थितीचें स्वरूप प्रथम चंगीजखान नांवाच्या निजामशाही मुत्सद्यानें ओळखलें; आणि ' निजामशाहा, कुतुबशाहा व आदिलशाहा यानीं आपसांतली यादवी बंद करून एकमेकाशीं दोस्तीचा तह करावा' अशी वाटाघाटहि या मुत्सद्यानें करून पाहिली ( ब्रिग्ज. व्हा. ३ पृ. २५७ ) परंतु दक्षिणेंतील या शाह्या अंतस्थ यादवीनें इतक्या पोखरल्या गेल्या होत्या कीं, त्यांना शेजाऱ्याचा पाडाव करण्याच्या संकुचित ध्येयाच्या मानानें, इतर गोष्टी तुच्छ वाटत; इत्यादि अनेक कारणपरंपरेनें चंगीजखानाच्या इच्छेप्रमाणें बनाव घडून येण्यास फार अडचण पडली. यानंतर ' दक्षिणेंतील सर्व संस्थानिकांनीं एकजुटीनें मोगलाशीं तोंड दिलें पाहिजे; एरव्हीं त्यांचा निभाव लागणार नाहीं ' हें तत्व पटवून देण्यासाटी पोर्तुगीजांनीं फार कसून मेहेनत केल्याचें दिसतें. शके १५१७–२६ ( इ. स. १५९५ ते १६०४ ) पर्यंतचे यासंबंधीचे लिस्बन व विजापूर दरबार यांतील (एकमेकाकडे गेलेल्या) अस्सल खलीत्यांतले उतारे पणजी येथील दप्तरांतून मिळवून फादर हिरास यांनीं ( J. B. B. R. A. S. April 1925 pp. 122–5 ) प्रसिद्ध केले आहेत. त्यावरून अकबराच्या मनांतून दक्षिणेंतील सर्व संस्थानिकांना मोगलांचे मांडलिक बनवावे असें होतें; व हें ओळखून आदिलशाही सुलतानांनीं चौलच्या मलीकाशीं व पोर्तुगाजांशीं दोस्तीचा तह करावा असा आग्रह पोर्तुगीजांनीं केला याबद्दल शंका रहात नाहीं. सारांश निजामशाहीवर मोगलांचा आघात प्रथम होण्याजोगा असल्यामुळें व पोर्तुगीजांना राजकारणांत व्यापक दृष्टी असल्यामुळें ' मोगलांना तोंड देण्यासाठी दाक्षिणात्यांनीं जुटीनें वागलें पाहिजे ' हें तत्व त्यावेळच्या कित्येक मुत्सद्यांना पटलें होतें असें निश्चितपणें म्हणतां येतें.

१२ **दाक्षिणात्य सुलतानांची दोस्ती**—मोगली संकटानें दाक्षिणात्यांत जी जूट उत्पन्न केली ती स्वभावतःच डळमळीत होती. कारण मोगल बादशहांनाहि दक्षिण जिंकण्याचा डाव एकसारखा नेटानें अव्याहत चालू टेवता आला नाहीं. अंतस्थ यादवी, फंदफितूर व बंडाळी वगैरे प्रकार वेळोवेळीं मोगली साम्राज्यांत घडत; आणि त्यात्या वेळीं दक्षिण जिंकण्याचा हेतु दिल्लीपतींना तात्पुरता तरी दृष्टिआड

करावा लागे. दक्षिणेतील राजांना देखील शेजाऱ्याशीं भांडण्याचीच हौस बलवत्तर असे; यामुळें मोगलांच्या चढाईत यत्किंचित ढिलाई दिसतांच विजापूर, दौलताबाद व गोवळकोंडें येथील राज्यकर्ते व मुत्सद्दी एकमेकांच्या उरावर बसण्यांत पुरुषार्थ मानीत. तात्पर्य दाक्षिणात्य सुलतानांचें ऐक्य मनापासूनचें व दूरवर विचार करून घडवून आणलेलें नसून तें ओढून ताणून चंद्रबळ होतें. यामुळें तें त्यांना कायमचें तारक झालें नाहीं.

**१३ मलिकंबराचा उदय**– आदिलशाही व निजामशाही राज्यांतील स्नेहसंबंधाचा दुवा दृढतर करून त्याच्या जोरावर अकबराच्या सेनापतींना अहमदनगरच्या वेढ्यांत चांदबिबीनें माघार घ्यावयास लावली व त्यानंतर चांदबिबी अंतस्थ यादवींत हमीदखानाच्या हातून मारली गेली हें इतिहासप्रसिद्ध आहे. त्यानंतर मोगलानीं पुनः एकवार जोर करून अहमदनगर घेतलें. परंतु अकबराचा मुलगा जहांगीर यानें बंड केल्यामुळें अकबरास दक्षिणेकडे लक्ष देण्यास फुरसत मिळाली नाहीं. यामुळें निजामशाही व आदिलशाही यांच्यांतील दोस्तीचा संबंध ढिला पडला व निमजाशाही राज्यहि अंतस्थ यादवीनें खिळखिळें झालें. त्यांत शेवटीं मलिकंबर व मियान राजू असे दोन सरदार निजामशाही मुलूख व्यापून बसले व दोघेहि मूर्तजा निजामशाहास आपल्या कह्यांत ठेवण्यासाठीं धडपडूं लागले. या धडपडीच्या काळांत निजामशाही मुलखांत चौघे सत्ताधारी नांदत होते. अहमदनगर येथें मोगलांच्या सुभेदार खानखानान रहात असून निजामशाही राज्यांत बखेडे कसे माजतील व त्यांत आपणास अधिक मुलूख कसा गिळंकृत करतां येईल हें बकदृष्टीनें पाहणें हें त्याचें काम होतें. मूर्तजा निजामशहा आवशाच्या किल्ल्यांत रहात असून त्याला सभोवारच्या लहानशा टापूंतलें उत्पन्न लाऊन देण्यांत आलें होतें. पण ही स्थिती त्याला अपमानकारक वाटत असून मलिकंबर व राजू यांच्यांत वैमनस्य वाढवून आपल्या छापेंत राहण्यास कोण कबूल आहे याच्या चौकशींत तो होता. मियान राजू हा हिंदु होता असें ग्रँडफ म्हणतो; पण फेरिस्ताच्या ग्रंथावरून तसें म्हणण्याचें कारण दिसत नाहीं. राजूनें दौलताबादचा किल्ला व त्याच्या आसपासचा मुलूख दाबला असून 'मलिकंबराचा पाडाव करून सारी निजामशाही आपण आटपावी' अशी त्याची महत्वाकांक्षा होती. या तीघांसेरीज चौथा प्रतिस्पर्धी मलिकंबर; हा मात्र कर्ता व धोरणी होता. तो चंगीजखानाच्या तालमींत तयार झालेला असून मूर्तजाच्या कारकीर्दीच्या प्रारंभीं त्याच्याकडे असलेल्या मुलखाची सरहद्द–दक्षिणेकडे आदिलशाही व कुतुबशाही राज्यास, पश्चिमेस चौलच्या हबशी राज्यास आणि पूर्वेस व उत्तरेस मोगल व मियान राजू याच्या प्रांताशीं–भिडली होती. मलिकास राजू व मूर्तजा हे दोन अंतस्थ शत्रू असून मोगल व विजापूरकर हे बाह्य शत्रू होते

पैकीं प्रथम त्यानें बाह्य व जबरदस्त अशा शत्रूशीं तंटा न वाढवितां राजूस चीत करण्यांतच कित्येक वर्षें खर्ची घातलीं. शके १५२४ मध्यें मोगलांनीं नांदेड येथें त्याचा पराभव केला तेव्हां तो अपमान मुकाट्यानें गिळून खानखानान याच्याशीं त्यानें स्नेह केला; याचें कारण राजूचा पाडाव करण्याचें ध्येय त्यानें निश्चित केलें असून तें साध्य होईपर्यंत त्याला आपली शक्ति इतर कामांत खर्ची घालावयाची नव्हती हें आहे. मूर्तजाची मात्र काय व्यवस्था लावावी हें त्यास सुचत नव्हतें. कारण तो राजू व मलिकंबर यांच्यांत वितुष्ट वाढविण्यासाठीं धडपडत असे. यामुळें मलिकास त्याचा कंटाळा येऊन त्याला पदच्युत करण्याचाहि त्यानें एकवेळ विचार केला होता. या बाबतीत त्यानें विजापूरच्या इब्राहीम आदिलशाहाचा सल्ला घेतला. तेव्हां इब्राहिमानें 'ही कल्पना साफ चूक आहे' असें सांगितलें. इतकेंच नव्हे तर 'असें करण्यानें मोगलांना निजामशाही राज्यांत हात घालण्यास उत्तम संधी दिल्यासारखें होईल' हेंहि त्यानें मलिकास पटवून दिलें आणि मूर्तजाशीं सलोख्यानें वागण्याचा सल्ला दिला. मलिकासहि तो योग्य दिसल्यामुळें त्यानें मूर्तजाशीं सख्य केलें आणि या सलोख्याच्या जोरावर जुन्नर ही पुनः निजामशाहीची राजधानी केली व शेवटीं राजूचा पराभव करून त्यास कैद केलें आणि दौलताबादचा किल्ला व प्रदेश आपल्या ताब्यांत घेतला. तेव्हांपासून मलिकंबर सर्व सत्ताधारी बनला.

**१४ ऐतिहासिक ग्रंथांचा अभाव**—निजामशाहीचा इतिहास सांगणारे दोनच ग्रंथ उपलब्ध आहेत हें मागें सांगितलें आहे. पैकीं बुर्हाण-इ-मआसिरमध्यें अहमदनगरच्या वेढ्यापर्यंतची म्हणजे शके १५१८ पर्यंतची हकीकत दिलेली आहे. मलिकाचा व मूर्तजाचा एकोपा इब्राहिमाच्या मध्यस्थीनें घडून आला तेथपर्यंतची म्हणजे शके १५३२ पर्यंतची हकीकत फेरिस्त्यानें दिली आहे. त्यानंतरची मलिकंबराची कारकीर्द व त्यांतली शहाजीची कामगिरी सांगणारा निजामशाहीचा इतिहास उपलब्ध नाहीं. बुसातिने सलातीन नांवाचा विजापूरचा इतिहास व मोगली दरबारांतले लेखक यांनीं आपाततः निजामशाही राज्यांतील घडामोडीचे जे उल्लेख केले आहेत ते फार तुटपुंजे व अस्ताव्यस्त असल्यामुळें त्यांतून मलिकंबराच्या कर्तबगारीची देखील कल्पना येऊ शकत नाहीं; मग शहाजी अगर मालोजी यांची तर गोष्टच बोलावयास नको. त्यांचा नामोच्चारहि ते करीत नाहींत. यामुळें त्याकाळचे महाराष्ट्रांतील जुनेकागदपत्र प्रकाशित करून मलिकंबर, शहाजी व शिवाजी यांचे ऐतिहासिक स्वरूप समजून घेण्याखेरीज अन्य मार्ग राहिला नाहीं. विजापूरकर व मोगल यांच्याशीं या तीघांचा जेथें संबंध आला तेथें मोगली व विजापुरी इतिहासांतून या तीघांचे उल्लेख सांपडतात व त्यांचा समह अवश्य केला पाहिजे हें खरें आहे. पण तेवढ्यानें या तीघांच्या कामगिरीचें खरें रहस्य लक्षांत येणें शक्य नाहीं. याकरितां शिवकालीन घराण्यांतील जुने कागदपत्र छापून काढण्याचें जें

व्रत राजवाडे प्रभृति महाराष्ट्रीय संशोधकानीं पत्करलें आहे तेंच आणखी कित्येक वर्षे चालविण्यावांचून गत्यंतर नाहीं.

**१५ प्रस्तुत खंडांतील उदाहरणें**—मलिकंबराचा जुन्यांत जुना उल्लेख 'ओतूर' हा गांव शके १५२६ मध्यें त्याला '<u>अर्जानी</u>' म्हणजे प्राप्त झाला त्यावेळचा आहे ( सनदापत्रें पृ. ९ ). त्यानंतर पुढच्यावर्षी पांढेपेडगांव हा परगणा त्याला मिळाला आणि शके १५३० मध्यें जुन्नर सरकारची व्यवस्था त्याला लावतां आली. ( स. पृ. १३।१४ ) त्यावेळीं इब्राहिम आदिलशहाचा व त्याचा स्नेह असून इब्राहिमाची मदत मलिकानें घेतली होती व त्याबद्दल त्याचा शिरवळ परगणा विजापूरकरांतर्फे वाई येथील सुभेदार हैबतखान हा पहात होता असें वाटतें. प्रस्तुत खंडांतील लेखांक २ च्या यादींत हैबतखानाची कारकीर्द शके १५२६ पासून १५४३ पर्यंत १७ वर्षे होती असें नमूद केलें आहे. आणि खं. २० मधील ले. ६५ व ६८ वरून या अवधींत हैबतखान वाईचा अधिकारी होता असेंहि ठरतें. परंतु त्याच्याकडे शिरवळचा परगणा इतकीं वर्षे एकसारखा होता असा अर्थ दिसत नाहीं. 'शिरवळ परगण्याचा मोकासा वणगोजी निंबाळकराकडे होता; त्यावर आदिलशाही नामजादी झाली. त्या फिरतीमध्यें आपाजी निगुडा शिरवळ परगण्यांतील मौजे भोगवली या गांवातून पळून इदलशाही नामजादींत गेला. त्यानंतर हैबतखानास मोकासा झाला, ( पृ. १३ ). आणि वणगोजी निंबाळकर शके १५३२ मध्यें पुढें होता ( पृ. ९ ) यावरून १५३२ नंतर व १५३५ च्या सुमारास हैबतखानास शिरवळ परगण्याचा मोकास मिळाला असें दिसतें ( पृ. ७ ले. ७ ). शके १५३५ पासून १५४३ पर्यंत मलिकंबर व विजापूरकर यांच्यामध्यें सलोखा कायम होता. परंतु इतकीं वर्षे शिरवळचा ताबा अव्याहतपणें विजापूरकरांकडे नव्हता. कांहीं वर्षे निजामशाहीचा ताबा असून कांहीं वर्षे हा परगणा दोघांच्याहि संयुक्त अमलाखालीं म्हणजे दोअमली होता. कारण १५३५ मध्यें हैबतखानाचे कारकीर्दीस लंब्या विरुद्ध निकाल देण्यांत आला तो 'मुकाम लष्कर खडकी' ( पृ. ८ ) येथें देण्यांत आला. यावरून मिरासीच्या हक्काचा निकाल करण्यास निजामशाही राजधानींतच जावें लागे हें उघड दिसतें. यानंतर तिसरे वर्षी सीत अशर सालीं म्हणजे १५३७ मध्यें लंबे याच्या सांगण्यावरून हैबतखानानें विठल कायदेवास धरून वाईस नेऊन कोटांत ठेविले आणि कांहीं दिवसानीं शिष्ट लोकांच्या सांगण्यावरून त्याची मुकता-करून त्यास शिरवळच्या देसकुलकर्णीपणाचें काम सांगितलें ( पृ. २१।२२ ). त्या अर्थी त्यावेळीं वाईच्या सुभेदाराचा अंमल शिरवळ परगण्यावर चालत होता. यानंतर सन समान आशर (शके १५३९) मध्यें सुलो होऊन (सलोख्यानें) शिरवळ परगणा येदलशाया खालून सुटोन हैबतखानाचे बजावर्द होऊन हजरतीचा मुलुख

हजरतीस म्हणजे निजामशहाचा निजामशहास देण्यांत आला ( पृ. २२ व ३६ ). यानंतर काजीहुसेन हवालदार व सय्यद् अमजदुन मुल्क यांजकडे शिरवळचा मोकासा होता. पुढें हा परगणा पुनः हजरत येदुलशाह यास सुलोखाली ( सलोख्यानें ) दिला; आणि विजापूरकरातर्फे मुला महमदास मोकासा मिळून त्याचे कारकून, आगानुरा व रायाराव शिरवळ महालास आले ( पृ. ३४ ). यापैकीं रायारावाचें नांव महत्वाचें आहे. कारण त्यानें पुणें, सुपें व शिरवळ येथें वतनाच्या कामांत अनेक घालमेली केल्याचे कागद उपलब्ध असून त्याच्याच कारकीर्दी अखेर मलिक व विजापूरकर यांचा सलोखा तुटून रायारावास घालवून देण्याचें काम शहाजी भोसले याच्या मार्फत निजामशाही दरबारानें करविलें आहे.

१६ **रायाराव**—रायारावानें दिलेले महजर व लिहिलेलीं पत्रें प्रस्तुत संग्रहांत पृ. १९ पासून पृ. ३० पर्यंत आलेलीं आहेत. तीं १५४२ च्या माघ महिन्यापासून १५४३ च्या मार्गशीर्षापर्यंतच्या १० महिन्यांतलीं आहेत. 'सनदापत्रें' पृ. ४१ वर रायारावाच्या आमदानीतला महजर आहे. तो १५४३ च्या अश्वीनांतला आहे व पृ. ३९ वर त्याच्या कारकीर्दीनंतरचा आहे तो १५४४ च्या श्रावणांतला आहे. अर्थात १५४४ च्या श्रावणापूर्वी रायारावाचा अंमल संपला होता हें उघड आहे. ही रायारावाची कारकीर्द १०।१२ च महिने टिकली व अखेरीस त्याला निजामशाही लष्करानें गचांडी देऊन घालविलें हें स्पष्ट करण्यासाठीं त्या वेळची निजामशाही दरबारांतील हकीकत लक्षांत घेतली पाहिजे. १५४३ च्या कार्तिकांत निजामशाही सैन्यानें दिल्लीच्या सैन्यास हटवून बऱ्हाणपुरापर्यंत रेटीत नेलें होतें व पुढें शहाजादा शहाजहान येऊन पोचल्यावर मोगल सेनापतींनीं मलिकंबरास बऱ्याच सवलती देऊन तह केला; या तहामुळें व मलिकंबराच्या वर्तनांत कांहींसा अरेरावीचा भाग येऊ लागल्यामुळें निजामशाही दरबारांतले कांहीं मुत्सद्दी व इब्राहिम आदिलशाहा यांना मलिकाविरुद्ध कारस्थान करणें भाग पडलें. पण हा कट उघडकीस आला आणि त्यांत सामील असलेल्या एका वजीरास मलीकानें कैद केलें तेव्हां त्यानें आदिलशहाचें नांव घेतलें! याच सुमारास जाधवराव पांच हजार सैन्यासह निजामशाही सोडून मोगलाकडे गेला व तेथें त्यास १५४३ कार्तिकांत ( १६२१ च्या नोव्हेंबरांत ) मोठी मनसब मिळाली. ही हकीकत त्यावेळीं दौलताबाद येथें मलिकंबराशीं वाटाघाट करण्यासाठीं गेलेल्या इंग्रज दलालानें व बऱ्हाणपुर येथील इंग्रज बातमीदारानें त्याचवेळीं पाठविलेल्या पत्रांत लिहिली होती व तीं पत्रें उपलब्ध आहेत. यामुळें मलिक व इब्राहिम यांच्यांत वैमनस्य केव्हां आलें याबद्दल शंका राहत नाहीं ( English Factories 1618--21 pp. 318, 332 ). शिवाय या वैमन-

त्याची बातमी गोव्याच्या गव्हर्नरानें १८ फेब्रु. १६२२ रोजीं लिहिलेल्या पत्रांत पोर्तुगालच्या राजास सरकारी रीत्या कळविली आहे ( सदर पृ. ३१७ टीप १ ). यावरून रायारावाची कारकीर्द १५४३ अखेर संपली असें निश्चित होतें.

**१७ रायाराव व शहाजी**—निजामशाही व आदिलशाही दरबारांतील सलोखा संपण्याची वेळ जवळ आली हें रायारावास दिसून आलें, तेव्हांपासून त्याचें लक्ष न्यायअन्याय पहात बसण्यापेक्षां पैसा मिळविण्याकडेंच लागलें; हें प्रस्तुत खंडांतील पत्रांवरून दिसतें. " रायाराव दौलतमंगळ ऊर्फ भुलेश्वर येथें ठाणें बांधून मुलखाचा सुभा करीत होते......राज्याची चलबिचल; बोढीचा प्रसंग; रायाराव हकीम यांचा बेत कीं द्रव्य हरतऱ्हेनें बळें ( उत्पन्न ) करावें, त्या उपरी राव निजामशाही इदलशाही चाल जाली. त्या प्रसंगी...पैका सरकारांत कबूल करून बळेंच खरियाचें खोटें करावें हा निर्वाह करून इनसाफ न करतां ... मालजी भालेराव यास मजालसीतून काढून लावले.... मुलूक कामथेयापासून पैका घेऊन रावजीनीं ( रायारावांनीं ) केला पैसे ( लोक ) बोलले. तों महिना पंध्रा दिवशीं इदलशाहीची जबरदस्ती झाली. **माहाराज शाहाजीराजे साहेबास** प्रांत मजकूर ( पुणें ) देऊन त्याची फौज या प्रांतास आली. रायाराव पराभऊन गेले. माहाराजांचा अमल मुलखांत चालला." ( पृ. ९८ ). शिरवळ परगण्यांत देखील 'येदलशायाचे सुलो तुटोन हजरती निजामशाह साहेबासी मुलूक जाहला. यावरी परगणे शिरवळ राजश्री **राजेसाहेबास** मुकासा अर्जानी जाला' ( पृ. ३५ ) असें म्हटलें आहे, त्याचा अर्थ 'शाहाजी राजे' असाच घेतला पाहिजे; व त्यावरून शके १५४४ मध्यें रायारावानें व्यापलेला मुलूख सोडवून तो निजामशाहींत दाखल करून घेण्याचें काम शहाजीनें यावेळीं केलें असें ठरतें. यानंतर मलिकंबर व विजापूरकर यांतील वैमनस्य फारच विकोपास जाऊन त्याचें पर्यवसान, मोगल व विजापूरकर यानीं एकजूट करून, मलिकंबरावर चाल करण्यांत झालें; परंतु या वेळीं मलिकंबरानें या संयुक्त सैन्यास भातवडीच्या युद्धांत ( १५४६ च्या कार्तिकांत ) चीत केल्यामुळें मलिकाचा दरारा अतिशयच वाढला वगैरे हकीकत मोगली व विजापुरी इतिहासांत आलेली आहे. पण या भातवडीच्या युद्धांत शहाजीनें मोठी तरवार गाजविली हा गोष्ट लक्षांत येण्यास तंजावरच्या शिलालेखावांचून दुसरें साधन नाहीं. शिवभारतांत देखील शहाजीच्या या पराक्रमाची माहिती विस्तृतपणें दिली असून त्यानंतर शहाजी व मलिकंबर यांच्यात वितुष्ट कसें आलें व शेवटीं तो विजापुरकराकडे कसा गेला याची हकीकत दिलेली आहे.

**१८ शहाजी राजे सरलष्कर**–शहाजी राजे या नांवास 'सरलष्कर' हा किताब लावलेलीं कित्येक अस्सल पत्रें खं. १५ व २० मध्यें व इतर छापण्यांत आलीं आहेत. तीं

सर्व १५४७ च्या श्रावणापासून १५४९ चा फाल्गुन या अवधीमधलीं आहेत. त्यानंतर १५५० पासूनचीं शहाजीचीं बरींच पत्रें उपलब्ध असून त्यांपैकीं एकाहि पत्रांत त्यास 'सरलष्कर' हा किताब लावलेला आढळत नाहीं. यामुळें हा किताब शहाजीस कां लावण्यांत आला व तो काय दाखवितो याचा खुलासा केला पाहिजे. भातवडीच्या लढाईनंतर मलिक व शहाजी यांच्यांतील वैमनस्य वाढून शहाजी विजापूरकरांकडे गेला हें मागें सांगितलेंच आहे. त्यावेळच्या शहाजीच्या हालचालींचा तपशील शिव-भारतांत आहे. त्यावरून असें दिसतें कीं, 'खेलोजी प्रभृति विठोजीचे मुलगे आपला द्वेष करूं लागले व त्यांना मलिकंबराचा पाठिंबा मिळाला हें पाहून शहाजी आपल्या जहागिरीच्या प्रदेशांत येऊन राहिला. तेथें निजामशाही प्रधान त्याचें मन वळवूं शकले नाहींत. ही संधी साधून आदिलशहानें आपल्या सरदारांमार्फत शहाजीस आपल्या पक्षास घेतलें. शहाजी तिकडे गेल्यानंतर त्यानें मुधोजी फलटणकरावर स्वारी करून जय मिळविला आणि कर्नाटक व केरळ प्रांत जिंकून इब्राहिमाच्या खजिन्यांत भर घातली. पुढें मलिकंबर, इब्राहिम आदिलशहा व जहांगीर मरण पावले व शहाजहा-नानें निजामशाहीवर चाल करण्याचें ठरविलें. तेव्हां शहाजी विजापूर सोडून निजाम-शहाकडे आला.' पैकीं मलिकंबर १५४८ च्या वैशाखांत मेला व इब्राहिम आणि जहांगीर १५४९ च्या भाद्रपद कार्तिकांत वारले. त्यानंतर चार महिन्यांनीं शहाज-हानानें दक्षिणेकडे स्वारी काढण्याचा विचार केला. या गोष्टी मुसलमानी इतिहास-कारांनीं नमूद केल्या आहेत. त्याचप्रमाणें भातवडीच्या युद्धांत विजापूरकरांतर्फे मुल्लाबाबा म्हणून जो सेनापती होता त्यास व त्यानंतर आदिलशाहींतील कित्येक सेनापतींना 'सरलष्कर' हा किताब असल्याचेंहि त्यांच्या ग्रंथावरून दिसतें. या गोष्टी लक्षांत ठेवल्या असतां अस्सलपत्रांच्या सहायानें शहाजीसंबंधानें पुढील विधानें करतां येतात. शके १५४७ च्या श्रावणांत शहाजी 'सरलष्कर' होऊन म्हणजे विजापूरकरांची बाजू पत्करून पुणें परगण्यांत राहूं लागला; व त्याचे कारकून (इनाम-दारांना) ताज्या खुर्दखताचा तगादा करूं लागले (खं. १५ पृ. ४२८). त्यानंतर 'साहाजी भोसले येदिलशाही यास गोसमाल (= शिक्षा) देवयाबद्दल' निजाम-शाहीतर्फे साबाजीपंत आले (पृ. ४०). त्यानीं शहाजीस पुणें प्रांतांतून घालवून गनीमास म्हणजे विजापूरच्या सैन्यास सालपा घाटांत कोंडलें. आणि हें प्रकर्ण आट-पून साबाजीपंत चांबळीच्या मोकदमाबद्दल सेंडकर व कामथे यामधील तंटा निवड-ण्यास १५४७ च्या पौषांत बसला (पृ. ३८). तिकडे शहाजी याचवेळीं विजापूर-दरबारांत मोठी मान्यता पाऊन मोहित्यांना तळबीड व पन्हाळा येथील वतनें मिळवून देत होता (पृ. ४३) निजामशाही दरबारांतील पत्रांतून शाहाजी भोसले यास 'येदिलशाही' हें विशेषण लावण्यांत येई, त्याचवेळीं विजापूर दरबारांतील फर्मानांतून त्याला सरलष्कर हा किताब लावलेला कां आढळतो याचें कारण समजण्यास आतां

अडचण पडत नाहीं. यानंतर दोन अडीच वर्षे विजापूर दरबारीं घालवून १५४९ च्या फाल्गुनांत शहाजीराजे ' सरलष्कर ' यानें पुणें परगणा ' कबज ' केला ( खं. १५ पृ. ३४५). याचा अर्थ त्या वेळेपर्यंत शहाजी विजापूरकरांच्या बाजूस असून पुढें दोन चार महिन्यांत शहाजीराजे (आतां सरलष्कर नव्हे ) यास निजामशाहीतर्फे पुण्याचा मोकासा मिळाला ( खं. २० पृ. ३४६ ) सारांश १५५० चैत्र ते आषाढच्या दरम्यान शहाजी निजामशाहींत येऊन मिळाला असें ठरतें.

**१९ प्रो. सरकार व ग्रँडफ**—शहाजी शके १५५० च्या पूर्वींच मोठा तोलदार सरदार बनून सरलष्कर ही पदवी त्यानें मिळविली होती इत्यादि हकीकत इतिहासाचार्य राजवाडे व कै. खरे यांनीं आपल्या लेखांतून नमूद केली होती; आणि प्रस्तुत खंडांतील पत्रातून रायारावास घालवून देण्याचें काम शहाजीनें १५४४ च्या अखेरीस केलें असें म्हणण्यास आधार मिळत असल्यामुळें शहाजीच्या एका नवीन स्वारीचीं माहिती लागली; व सरलष्कर हा किताब कोणत्या दरबारामार्फत शहाजीस चालत होता याचा निर्णय करतां आल्यामुळें शके १५४७ ते १५५० पर्यंतच्या गुंतागुंतीच्या हालचालींचाहि तपशिल समजूं शकला. ग्रँडफ व प्रो. सरकार यांना शहाजीच्या या वेळच्या हालचाली कां समजूं शकल्या नाहींत याचेंहि परीक्षण या प्रसंगीं करणें बोधप्रद होणार आहे. खाफीखान व विजापूर येथील कांहीं फारशी हस्तलिखित ग्रंथ यांचा उपयोग करून व कांहीं ठिकाणीं मराठी कागदपत्रांची मदत घेऊन ग्रँडफनें शहाजीचें यावेळेचें चरित्र लिहिलें. त्यांत शके १५४२ ( इ. स. १६२० ) मध्यें मलिकंबर व मोगल यांच्यामध्यें झालेल्या एका युद्धांत लुखजी, शहाजी व फलटणचे नाईक ( जगपाळ ऊर्फ वणंगपाळ ) यानीं मोठी तलवार गाजविली असा उल्लेख, त्याला एका मराठी कागदांत सांपडला. परंतु ही गोष्ट त्याला विसंगत वाटली; कारण फारशी इतिहासांतील निजामशाही विषयक त्रोटक उल्लेख वाचून मलिकंबर व इब्राहिम आदिलशहा यांच्यांत नेहमींच वाकडें होतें असा त्याचा समज होता. The sultans of Bijapur and Golcondah did not view the rise of Mullik Umber favourably. Ibrahim Adil Shah bore him a personal enmity (Grant. Duff's History 1921, P. 79) असें त्याचें मत बनलें असून विजापूरचा सरदार निंबाळकर व मलिकंबरातर्फेचे शहाजी आणि लखुजी यांनीं एकजुटीनें वागणें म्हणजे " There was a general confederacy against the moghuls ( p.79, note 2 ) 'दक्षिणेंतील शाह्यांनीं मोगलाविरुद्ध एक जूट केली होती' असें मानावें लागतें. ही आपत्ती टाळण्यासाठीं 'वणंगपाळ हा विजापूरकरांना न जुमानता या युद्धांत सामील झाला असेल' अशी काल्पनिक तोड ग्रंडफनें सुचविली आहे. परंतु प्रस्तुत खंडांतील पत्रांच्या सहायानें दाक्षिणात्य शाह्यांची शके १५४४ पर्यंत जट

होती व त्यानंतर मलिकंबर व आदिलशाहा यांचा सलोखा तुटला वगैरे तपशील माहीत झाल्यामुळें शके १५४२ मधील ग्रंडफला आढळलेला मराठी कागदांतला उल्लेख सुसंगत आहे असें आपण म्हणूं शकतों. * ग्रँडफनंतर शंभर वर्षांनीं प्रो. सरकार यांनीं शहाजीचें चरित्र लिहिण्याचा प्रयत्न केला. त्यांत शहाजी विषयक जी नवीन माहिती उपलब्ध होती तिचा समावेश करणें त्यांचें कर्तव्य होतें. मॉडर्न रिव्ह्यूच्या १९१७ सप्टेंबरच्या अंकांत त्यांनीं असा प्रयत्न केला असून A corrective of the legendary history current among the Marathas म्हणजे शहाजीसंबंधच्या महाराष्ट्रांतील दंतकथांचा निरास करण्यासाठीं हा लेख आपण लिहितों असें त्यांनीं मुद्दाम सांगितलेंही आहे. पण मराठींतील सामग्री त्यांना मुळींच जमेस धरतां न आल्यामुळें त्यांना शके १५५० पर्यंतचें शहाजीचें चरित्र ग्रंडफ इतकें देखील रेखाटतां आलें नाहीं. शहाजीचें चरित्र लिहितांना बखरकारांनीं दिलेल्या हकीकती विसंगत व अविश्वसनीय आहेत हें त्यांचें विधान ग्राह्य होण्याजोगें आहे. पण बखरीं-खेरीज मराठींत अस्सल पत्रें आहेत व तीं जमेस धरलीं पाहिजेत हें त्यांच्या लक्षांत नटिसें आलें नाहीं. राजवाडे यांच्या ८ व्या आणि १५–२० या खंडांत छापलेलीं पत्रें, ‘ शिव चरित्र बारकाईनें समजून घेण्यास उपयोगी पडण्याजोगी आहेत ’ हें प्रो. सरकार यांनीं क़बूल केलें असून या खंडाचें, संपादकत्व चांगलेंसें झालें नाहीं ( The editing leaves much to be desired. Shivaji & his Times p. 453)आणि यांत इनाम कमिशनला फसविण्यासाठीं तयार केलेले कांहीं बनावट कागद छापले आहेत, अशी बुजगावणीवजा तक्रार केली आहे. पण या तक्रारीवरून आपण आपलें मराठीचें अज्ञान व्यक्त करीत आहों हें त्यांच्या लक्षांत आलें नाहीं. कारण, ऐतिहासिक कागदपत्रांच्या संपादनाच्या बाबतींत राजवाड्यांइतकी कसोशी बाळगणारा विद्वान दुसरा नाहीं ही गोष्ट महाराष्ट्रांत प्रत्येक जण जाणतो. आणि ज्या पत्रांबद्दल संशय वाटण्याजोगा आहे त्यांना राजवाडे यांनीं टीपा देऊन खुलासाहि केलेला आहे. त्यांतून एखाद्या पत्रावर अशी टीप देण्याचें राहिलें असेल तर ती चूक सप्रमाण दाखवून देण्याचा प्रयत्न प्रो. सरकार यांनीं करावयास पाहिजे होता. तो न करतां उलट ‘ शिवचरित्रास उपयोगी अशी सामुग्री मराठींत मुळींच नाहीं; आहे ती फारशी व इंग्रजींतच काय ती आहे असा गैरसमज प्रो. सरकार वेळीं अवेळीं आपल्या लेखांतून फैलावीत असतात. The only contemporary records of Shivaji's and even Sambhaji's times that now survive are in English and

---

* दाक्षिणात्यांनीं एक जूट करून मोंगलाशीं या वेळीं झगडा केला ही गोष्ट प्रो. सरकार यांनीं फारशी ग्रंथांच्याच सहायानें नमूद केली आहे. औ. च. व्हा. १।२ पृ. २८ पहा. तथापि त्यांना देखील दाक्षिणात्यांच्या ( Grand alliance ) या जुटीचा तपशीलवार माहिती असल्याचें दिसत नाहीं.

Persian and *none at all in Marathi.* (p. 446) In this state of things it may be patriotic to prefer the Marathi accounts ......to the accurate and contemporary Persian and English sources: but it would not be honest history (p. 447). असाहि ते महाराष्ट्रांतील संशोधकांना सरसकट टोमणा मारीत असतात. याकरितां त्यांना या बाबतींत स्पष्टपणें असें सांगणें जरूर आहे कीं, समकालीन व विश्वसनीय असा फारशी, इंग्रजी अगर अन्य कोणत्याहि भाषेंतील उल्लेख आढळल्यास त्याचा उपयोग करूं नये अगर त्यास गौण मानावें असें प्रतिपादन महाराष्ट्रांतील कोणत्याहि संशोधकानें केलेलें नाहीं. यामुळें प्रो. सरकार यांची वक्रोक्ति विगतार्थ आहे. पण उलट शहाजी व शिवाजी यांचीं चरित्रें लिहितांना प्रो. सरकार यांना मराठींतील समकालीन सामुग्रीचा उपयोग करतां आला नाहीं; हें कोणासहि सहज दिसण्याजोगें आहे. व खरें पहातां 'फारशी ग्रंथांच्या सहायानें व मराठी बखरी वाचून मीं शिवचरित्र लिहिलें आहे. अस्सल पत्रव्यवहार असलेल्या मराठींतील सामुग्रीचा मला उपयोग करतां आला नाहीं' असें त्यांनीं प्रांजलपणें ग्रंथारंभीं नमूद केलें असतें तर ते Honest history चे खरे भोक्ते आहेत असें म्हणतां आलें असतें. पण तें न करतां उलट आपण सर्व सामुग्रीचा बारकाईनें परामर्ष घेतला आहे (exhaustive and minute use of the available sources) आणि अगदी बारिक सारिक देखील विश्वसनीय अशा तपशिलाचा (every fact however small) उल्लेख केला आहे व इतरांच्या ग्राह्याग्राह्यतेची चर्चा केली आहे असें ते प्रस्तावनेंत जाहीर करतात! ही गोष्ट त्यांच्या संशोधकत्वास खास कमीपणा आणणारी आहे व यामुळेंच त्यांचें शिवचरित्र महाराष्ट्रांत प्रमाणभूत मानलें जात नाहीं. मराठींतील सामुग्री जमेस धरतां न आल्यामुळें शहाजीचें चरित्र लिहितांना Shahaji must have been a petty captain during the regency of Malik Amber and he first rose to independent and high command only under Fath Khan (the son of Ambar) who was evidently his first patron (M. R. 1917 Sept. p. 248) असें जें प्रो. सरकार यांनीं ठासून सांगितलें आहे तें त्यांच्या मराठीच्या अज्ञानाचें द्योतक असल्यामुळें जमेस न धरतां शहाजीसंबंधाचे १५५० पर्यंतचे उल्लेख असे मांडून दाखवितां येतील.

शके १५४२ शहाजी, लखुजी, निंबाळकर व मलिकंबर मिळून मोगलांचा पराभव करतात. (मंडफ).

१५४४ शहाजीची रायारावावर स्वारी (पृ. ९८)

१५४६ कार्तीक. भातवडीची लढाई व शहाजीच्या पराक्रमाचा विशेष गौरव. (तंजावरचा शिलालख व शिवभारत)

१५४७ शहाजी मलिकंबराशीं भांडून अदिलशाहीस मिळतो. यामुळें त्यास पुणें प्रांत सोडून विजापूरच्या हद्दींत जावें लागते; (पृ. ४० ) व तेथें त्यास सरलष्कर या नात्यानें मोठा मान मिळतो. (पृ. ४३)

१५४७–१५४९ शहाजी विजापूर दरबारच्या आश्रयास. १५४९ च्या फाल्गुनांत तो पुणें प्रांत जबरदस्तीनें ताब्यांत घेतो. ( खं. २० पृ. ३४५ )

१५५० शहाजी निजामशाहीच्या नोकरींत जातो व त्यास पुणें परगण्याचा मोकासा मिळतो. ( खं. २० पृ. ३४६ )

**२० जायणा लिंगरस**—शहाजी परत निजामशाहींत आल्यानंतर पुढील ७।८ वर्षांत कधीं मोगलास मिळून तर कधीं त्यांना विरोध करून त्याला जो राजकीय डाव मांडतां आला व अखेरीस जो मोडून त्याला विजापूरकरांची नोकरी पत्करावी लागली त्या डावाची माहिती अनेक लेखकांनीं दिली आहे; आणि तिच्यांत विशेष भर पडण्याजोगा महत्त्वाचा उल्लेख या खंडांतील कागदांत आढळत नाहीं, सबब त्याचें विवेचन येथें करण्याचें कारण नाहीं. मात्र जायणा लिंगरस हें जें शिरवळच्या हवालदाराचें नांव आलें आहे (पृ. ४४) तें शहाजीच्या चरित्राच्या दृष्टीनें महत्त्वाचें आहे. शहाजी मलिकंबराशीं भांडून शके १५४७ अखेर विजापूरकरांकडे गेला तेव्हां तो पन्हाळ्याच्या बाजूस होता आणि तेथें जायणा लिंगरस हा त्याच्याबरोबर होता ( शिवकालीन घराणीं इ. आणि ऐ. ले. ३७० पृ. १०१ )–पुढें ' शाहजीराजे पादशहापासून यागी जाहाले ( सदर पृ. १०२ ) म्हणजे विजापूरकरांचा पक्ष सोडून परत निजामशाहींत आले, त्या वेळीं जायणा लिंगरस यानें कोणता पक्ष स्वीकारला तें कळत नाहीं. तथापि शके १५५१ च्या पौषांतील अस्सल पत्रांत (खं. १६ ले. १६) ' एदिलशाही लोकी एउनु पा। शिरवळ कबज केलें आहे '. असें म्हटलें आहे व प्रस्तुत खंडांत १५५२ च्या भाद्रपदांत ( पृ. ४४ ) ' जायणा लिंगरस हवालदार माहालानिहाय व किले सुभानमंगळ ( = शिरवळ )" असा उल्लेख आहे; त्यावरून जायणापंत विजापूरकरांच्याच नोकरींत राहिला असावा असें दिसतें. यानंतर शके १५५७।५८ मध्यें शहाजीहि जेव्हां विजापूरकरांच्या नोकरींत शिरला तेव्हां दादाजी कोंडदेवाचा अंमल शिरवळ परगण्यावर चालू झाला. हें लक्षांत ठेवलें असतां शिरवळ परगण्यावरील हकीम म्हणजे अधिकारी सांगतांना हैबतखान, मलिकंबर, जायणापंत, यावर शहाजीचे कारकून दादाजी कोंडदेव, नंतर छत्रपति (शिवाजी) साहेब आणि राजाराम असा जो अनुक्रम पृ. ९२ वरील तकरीरीमध्यें आला आहे तो बरोबर आहे.

**२१ शिरवळ व दादाजी कोंडदेव**—शिरवळवर दादाजी कोंडदेवाचा अंमल चालत होता हें जें वर विधान केलें आहे त्यास असल पत्राचा आधार असून त्याच्या

सहांयांनें शिवाजी महाराज.च्यां पहिल्याच लष्करी हालचालीवर कांहींसा प्रकाश पडण्याजोगा आहे. शिरवळच्या कुळकर्णाचा भाऊबंदी तंटा दादाजी कोंडदेवाकडे गेला तेव्हां त्यानें शिवापूर मुक्कामीं त्या तंट्याचा निकाल गोतमुखें न करतां वाटणीच्या रूपानें केला. हा खं. २० ( ले. ५३ ) मध्यें छापलेला आहे. परंतु रामाजी विठ्ठलास हा निकाल न पटल्यामुळें त्यानें पुण्यास जाऊन जिजाबाईसाहेबांकडे तक्रार केली; आणि मातुश्री जिजाबाईनीं दादाजीपंतास सांगितलें कीं "यांचा निवाडा गोतमुखे करणें." त्याप्रमाणें दादाजीपंतानीं आपला पूर्वीचा वाटणीचा महजर रद्द करून गोतमुखें या प्रकरणाचा निवाडा करण्याचा हुकूम शिरवळचा हवालदार विठ्ठल गिरमाजी यास दिला. हा हुकूम या खंडांत छापला असून तो शके १५६८ चैत्र व. १२ मितीचा आहे ( पृ. ९६ ) या हुकुमाप्रमाणें गोतमुखें निवाडा व्हावयाचा होता; इतक्यांत 'महालांत धामधूम झाली, सवेंच दादाजीपंत मृत्य पावले ( पृ. ९५ ) त्या अर्थी शिरवळ परगण्यातील शिवाजी महाराजांची ही 'धामधूम' १५६८ च्या चैत्रापासून दादाजीच्या मृत्युपूर्वी म्हणजे १५६९ च्या जेष्ट आषाढापूर्वी झाली असली पाहिजे. आणि ही धामधूम म्हणजे 'हिंदवी स्वराज्यासाठीं' शिवाजी महाराजांनीं केलेल्या चळवळीची असावी असा संशय येतो. कारण खं. १५ ले. २६९ चें पत्र १५६८ च्या ज्येष्ठांतलें असून ( या पत्राच्या माथ्यावर शक १५६७ आहे, पण तो १५६८ पाहिजे ) त्यांत या स्वराज्याच्या चळवळीची माहिती विजापूर दरबारास कळल्यामुळें दादाजी नरस प्रभु फरारी झाला व शिरवळच्या सरहद्दीवरचा मुलूख 'वैराण' जाला वगैरे हकीकत आहे; पण त्याबरोबरच विजापूर दरबारानें हें प्रकरण न वाढवितां सरसकट माफी देण्याचें जाहीर केलें आहे. * या माफीच्या जाहीरनाम्याचा काय परिणाम झाला हें समण्यास मार्ग नाहीं. पण एवढें खरें कीं शके १५६९ मध्यें दादाजी कोंडदेव मरण पावल्यावर पुणे परगण्यावर शिद्दी अंबर हवालदार व शिवाजी राजे यांची हुकमत चालू लागली ( पृ. ५२ ); आणि १५६९ च्या कार्तिकापर्यंत शांतता होती. ( ले. २९ याच्या मथळयावरची मिती चुकली आहे. ती १५६९ कार्तिक व. ५ पाहिजे. ) त्यानंतर पांच चार महिन्यांत केव्हांतरी महाराजांनीं सिंहगड घेतला. ( शि. च. प्र. पृ. ५५ ). पुढें १५७० च्या श्रावणांत शहाजी राजे यांना मुस्तफाखानानें कैद केलें; व शिवाजी महाराजांवरही विजापुराहून सैन्य रवाना झालें त्यावेळीं शिरवळास झडलेल्या चकमकींचें वर्णन प्रस्तुत खंडांत ( पृ. ५४ ) आलेलें असून त्यांत ही महत्त्वाचीं वाक्यें आहेतः

* हिंदवी स्वराज्यासंबंधाचीं हीं दोन तीन पत्रें अस्सल नसुन नकल आहेत व त्या नकला करतांना 'अज रख्तखाने' वगैरे शब्द शिवाजीचा किताब आहे असें समजून या नकलकारानें स्मृतीनें मजकूर लिहिलेला दिसतो. या दोन शब्दावरून 'पत्र अविश्वसनीय दिसेल, परंतु मतलब खरा असावा' असा राजवाडे यांचा अभिप्राय आहे.

" शहाजी राजे धरिली त्याचा लेक सिवाजी पुरंधरी बैसोनु दिवाण नामजादीशी झगडो लागले. सर सुभेदार फत्याखान तिही शिरवळास फाजीलशहा व आशाफशा पाठविले. तिही कोट पा मा [ शिरवळ ] बळाविला. त्यावरी शिवाजी राजे धाविनले. झगडा जाला " इत्यादि. ही हकीकत आज या खंडांत प्रथमच प्रसिद्ध होत आहे.

या खंडांतील पत्रांत आलेले सर्वच मुद्दे विस्तारानें सांगणें शक्य नाहीं. सबब येथवरच्या विवेचनांत न आलल्या पत्रांतले कांहीं मुद्दे शेवटीं त्रोटक रीतीनें नमूद करतों.

ले. १ या वंशावळीचा लेखनकाल शके १६७५ च्या सुमाराचा आहे.

ले. २ यांतील अधिकाऱ्यांच्या भोगवट्यांचीं वर्षें स्थूलमानाचीं आहेत. वडा व धाकुटा असे दोघे हैबतखान पुणें व शिरवळ प्रांतांत मलिकंबराच्या वेळीं अंमलदार म्हणून वावरत होते.

ले. ३ क्रमाक्रमानें जमीनीचा सारा वाटविण्याची पद्धति निजामशाहींत होती.

ले. ४ शके १४९९ मध्यें अहमदनगरास निजामशाहीची राजधानी होती.

ले. ६ जमीन काढून घ्यावयाची ती हंगामानंतर घेत. दिवाळी म्हणजे मार्गशीर्ष शु. १

ले. ७ विठ्ठल कायदेवाच्या पूर्वजाकडे शिरवळचें देशकुलकर्ण निजामशाहीच्या प्रारंभापासून होतें.

ले. ११ मल्हारजी बिन आपाजी देशमुख श. १५३८ मध्यें मारला गेला.

ले. १९ या महजराची समंध नक्कल करून छापखान्यांत दिली होती. आर्य-भूषण छापखान्यास लागलेल्या आगींत पहिल्या बंडाखेरीज बाकीचे सर्व बंद जळून गेले.

ले. २१ शिरवळ परगण्यावरील अमलदारीची घालमेल ठरविण्यांचीं सर्व पत्रें जमेस धरलीं असतां असें ठरतें कीं निजामशाहीचा हा परगणा

श. १५३५-९ विजापूरकरांकडे सलोख्यानें देण्यांत आला होता.

श. १५३९-४२ सलोखा कायम राहून परगणा परत निजामशाहीकडे होता.

श. १५४२-४३ सलोखा कायम. परगणा विजापूरकराकडे. रायारावाची अमदानी.

श. १५४४ च्या प्रारंभीं सलोखा तुटून रायारावास घालवून देण्याचें काम शहाजीनें केलें.

ले. २४ जायणा लिंगरस हा श. १५५२ मध्यें शिरवळचा हवालदार होता. दिवटा मुसलमान शके १५४३ मध्यें हयात असावा असें ले. ३३ वरून दिसतें.

ले. २५ ‘ उटाणिया ’ असें पृ. ४५ वर छापलें आहे. तें ‘ गुळणिया ’ असें पाहिजे. या पत्रांत जगदेवराव निंबाळकराचा उल्लेख आहे.

ले. २६ व २७ बापूजी मुद्गल हा पुणें प्रांताचा हवालदार होता. हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण तर्फ खेडबारेचा देशपांडे. यानें दादाजी कोंडदेवाच्या मृत्यूनंतर कोंढाणा घेण्यास शिवरायास मदत केली. शाइस्तेखानाच्या स्वारींत गाजलेले चिमणाजी व दादाजी हे या बापूजीचे मुलगे.

ले. ३२. या पत्राचें महत्व पूर्वी सांगितलेंच आहे. १५७१ मध्यें पुरंदरचा किल्ला महादाजी नीळकंठराव यांजकडे असून त्याच्या सभोवारचा मुलूख शहाजीकडे होता व शहाजी आणि महादाजी यांचा स्नेह असे. यामुळें शिवाजी महाराजांना यावेळीं पुरंदरचा आश्रय करतां आला.

ले. ३७. श. १५७३ मध्यें कोंढाणा विजापूरकराकडे होता. शहाजीस बंधमुक्त करण्यापूर्वी तो आपणास मिळाला पाहिजे अशी विजापूरकरांनीं अट घातली होती.

ले. ३९. मोंगलांच्या गलबल्याचा उल्लेख यांत आहे. पत्राचा काल अनिश्चित.

ले. ४० या अस्सल पत्रावरून शहाजीस पुणें परगण्याचा मोकासा होता असें ठरतें. मोकासेदार हा वतनदाराप्रमाणें वंशपरंपरेचा अधिकारी नव्हता. त्याला केव्हांहि काढण्याचा हक्क विजापूरदरबारास होता. पुण्यावरील अंमलवारीचा क्रम असा दिसतो. प्रथम शहाजी, नंतर अफजलप्रसंगापर्यंत शिवशाही, पुढें मोगलाई आणि श. १५९२ मध्यें पुनः शिवशाही. ले. ५३ पहा.

ले. ४१ हा कागद अस्सल नव्हे मसूदा आहे; व त्यांत पृ. ६४ वर सुरुसन विसंगत आहे. पण हें पत्र स. प. पृ. ४४ व खं. २० ले. १८ यांशीं ताडून पाहिलें असतां सुप्याचा अंमलदारांचा क्रम याकुदखान, काटे, मंबाजी, असतखान, पुनः काटे, शहाजी व शिवाजी असा होता असें दिसतें.

ले. ४५ अफजलखान देशमुखांचीं कामें काय आहेत तें समजाऊन सांगतो.

ले. ४६ अफजल प्रसंगाचें पर्यवसान कदाचित सल्ल्यांत होईल व तहानें शिरवळ परगणा महाराजांकडे देण्यांत येईल असाहि एक संभव त्या वेळच्या लोकांना दिसत होता.

ले. ४७ भविष्य शब्दाचा अर्थ नीटसा समजत नाहीं. अफजलप्रसंगाची मित्ती यांत मार्गशीर्ष व ५ दिली आहे. तुळजापूर व पंढरपूरच्या मूर्ती हालवांव्या लागल्या यास खं. २० पृ. ३२९ मध्य आधार आहे.

ले. ५४ फ्रायर शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकाचे वेळीं रायगडास गेला होता. त्याचा सर्व ग्रंथ शिवचरित्राच्या दृष्टीनें अभ्यसनीय आहे. दोन हत्ती व दोन घोडे रायगडावर अभिषेक प्रसंगीं नेलेले पाहून इतक्या अडचणींतून ते कसे नेले असतील याचें त्यास आश्चर्य वाटलें.

ले. ५५ शिरवळ परगण्यावर मोरोपंत पेशव्यांनीं शके १५९९ मध्यें १००० होन मिरासी पट्टी बसविली.

ले. ५९ कऱ्हा नदीच्या उगमापासून कऱ्हा-नीरा संगमापर्यंतच्या खोऱ्यास कऱ्हे-पठार म्हणतात. या पठारावर तीघांचा अंमल चालत असे. 'तर्फ कऱ्हेपठार' हा पुणेकर देशमूख देशपांड्याचा; 'पा। सुपे' सुपेकरांचा; आणि 'कर्यात सासवड' सासवडकरांचा.

ले. ६० सुपे खुर्द ( थोरलें सुपें नव्हे ) हा गांव सासवडच्या दक्षिणेस दोन मैलांवर आहे. तेथील पाटीलकीच्या वादासंबंधी लिहितांना शिवाजी महाराजांनीं "जैसे पालीची पाटीलकी काळभोराची असतां उगेच खराडियानें झोंडपण केलें; सेवट रवा काढून खोटें जाहाले, तैसच हे जगथाप करिताती" असा दाखला दिला आहे. पालीच्या पाटीलकीचा महजर धुळ्याचे विद्वान् संशोधक रा. शंकराव देव यांनीं 'रामदास आणि रामदासी' या मासिकांत छापलेला महशूरच आहे.

ले. ६७. 'वृत्यंशियाची वृत्ती वृत्तिवंतास द्यावी,' 'वृत्तिवंताचें संस्थापन करणें हें स्वामीसहि अगत्य आहे' वगैरे वाक्यांत दिसणारी शिवशाहीतली राजनीति वृत्तिच्छेदोत्सुक अशा आधुनिक धोरणाहून निराळी होती.

ले. ८७. व ९२ या पत्रांच्या नकला कै. पांडुरंग नरसिंह पटवर्धन यांच्या हातच्या सांपडल्या. अस्सल पत्रें कोठें आहेत तें समजलें नाहीं.

ले. ९०. अष्टप्रधानांच्या जागा वंशपरंपरेनें दिल्याबद्दलचे महाराजांच्या तोंडचे म्हणून उद्गार सभासदी बखरीच्या या प्रतींत दिले आहेत ते विचारणीय आहेत. संभाजी व राजाराम आणि ताराबाई यांच्या कारकीर्दींत अष्टप्रधानांची पदें बहुधा वंशपरंनें चालविलीं. वाकनीसाचें नांव पंताजी असें चुकून छापलें आहे.

ले. ९१. पुरंदरास नीळकंठरावाचे पूर्वज येण्यापूर्वीं व आल्यानंतर देखील कोळी व महार यांचे प्राबल्य होतें. पेशवाईंत देखील पुरंदरच्या कोळ्यांचा दंगा बराच गाजला.

आभार—प्रस्तुत खंड छापण्याच्या व प्रस्तावना लिहिण्याच्या कामीं अनेक गृहस्थांनीं मदत दिली. प्रो. मा. त्रिं. पटवर्धन एम्. ए. यांनीं फारशी शिलालेखांचे उच्चार व शब्दांचे अर्थ सांगितले; येथील ओरिएंटल बुकसप्लाइंग एजन्सीचे मालक डॉक्टर नरहर गोपाळ सरदेसाई यांनीं इंडो मॉस्लेमिकाचे अंक पाहण्यास दिले; सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीच्या संग्रहांतला फ्रायरचा ग्रंथ वाचण्यास मिळाला; व श्री. सरदार मेहेंधळे, प्रो. पोतदार व रा. दिवेकर यांनीं आपले खासगी ग्रंथसंग्रह पाहण्यास मोकळीक ठेवली याबद्दल या सर्वांचा मी फार आभारी आहे.

पुणें मि. अश्विन व. ११ }
शके १८४८. }

दत्तात्रय विष्णु आपटे.

# शिवचरित्र-साहित्य

## खंड १ ला.

( शिरवळकर देशपांडे वगैरेंचे कागद )

# शिरवळकर देशपांडे
## यांचे कागदपत्र.



ले. १ श्री

वंशावळ निगडे देशमूख प्रा॥ सिरवल

केन पाटील यासि पुत्र २

रामजी नाईक याचा पुत्र गोरखोजी याचा पुत्र आपाजी याचा पुत्र गोरखोजी यास पुत्र मलजी याचा पुत्र आपाजी याचा पुत्र बहीरजी हाली आसे

आपाजी नाईक याचा पुत्र मल्हारजी याचा पुत्र आपाजी याचा पुत्र मल्हारजी याचा पुत्र केदारजी याचा पुत्र मल्हारजी हाली आहे

कारकीर्द मलीकांबर आपाजीनें
मल्हारजी मारिला सु॥ सबा
आशर[1] अलफ शके १५३९
पिंगलनाम संवत्सरे वर्षे १३७

कारकीर्द जसवंतराव सुरूरकर कुलकर्णी याचे दिव्य जाले त्याजवर साक्ष नाइकजी बीन आढलराव गाढवे मोकदम मौजे संडाले शके १५३४ परिधावी नाम सवछरे सु॥ सलास ओशरीन आलफ यासी वर्षे सवत्छराने सवत्सर मनांत आणिता वर्षे सुमारी १४२

वावडेकर पाटील याचा महजर जाला शके १५४२ रौद्रनाम सवछरे तेथे साक्ष येमाजी पाटील गाढवे मौजे सडाले यास वर्षे सुमार १३४

कारकीर्द दादाजी कोंडदेव पारगांवकर रिठ्यास महजर निमेचा दिल्हा तेथें साक्ष भिलोजी गाढवे मौजे संडाले याची साक्ष असे तो महजर सु॥ इसने आर्बैन या सालचा असे यास वर्ष ११२ याप्रमाणें जिजाजी पाटील निमे मौजे पारगांव याची आर्जदास्त असे

---

१ आशर पाहिजे

• ले. २ श्री

श्री शके १३१८ धातानाम संवत्छरे सु॥ सबा तिसैन मया सबयेन सन ८०६ या सालांत कन्हाड क्षेत्रीं दुर्गादेवी रुदन करूं लागली त्यानंतर शके १३३० सर्वधारी नाम संवत्छरे सु॥ तिसा मैया समानेन ८१८ परियंत वर्ष १२ प्रिथीवीवर दुष्काल पडला सारट चारण करू जागा जागा उठले ते ह्या पासून शके १३६० कालयुक्त नाम संवत्छरे सु॥ तिसा सलासीन मैया समानेन सन ८४८ परियेत वर्ष ३० तीस चारण करू याची राव होती राज्यात बेबदी जाह्ली औसे समजले शके १३६१ सिधार्थी नाम सवत्छरे सु॥ आर्बैन मया समानेन सन ८४९ या सालात बेदरचा आदील पातशाह याने राजश्री दादा नरसिह रवाना करून पराडीयाचा किला बाधिला आणि मुलखाची चकबंदी व्हावी याजकरिता काला खोजा व योरा खोजा प॥ माहल परगणे व सिवा व सिवधडे उजरून आदीलशाई बिंघे करून शंभर बिंघेयाचा चाहूर येक याप्रमाणे रकमले बांधून मुलखाची टकबदी करविली त्यानंतर चौ ठाई च्यार सुभे रवाना केले विज्यापुरी कुतबशाह व भागानगरी निज्यामशाह व देवगिरीस दौलतशाह व आमदाबाज गुजराथ या प्रांती मिरजुमशाह या प्रो च्यार सुभे चौठाई पाठऊन राज्याचा बदोबस्त शके १३६८ क्षये नाम सवत्छरे सु॥ सबा आर्बैन मैया समानेन सन ८५६ या साली केला आणि जागा जागा ठाणी बसऊन किले कोट बांधून बदोबस्त करावे म्हणून हुकूम जाला त्याजवरून भागानगरी निज्यामशाह होते त्यानी आदीलखान रवाना करून शके १३८३ वृषानाम सवत्छरे सु॥ इसने सितैन मया समानेन सन ८७१ या सालात सिरवल प्राती ठाणे बसविले त्यानंतर नवा वर्षानी शके १३९२ विक्रती नाम सवत्छरे सु॥ ईहीदे सबैन मया समानेन सन ८८० या सालात नीरे नजीक चित्रबेट टेकाड पाहून सुभामंगल नाव ठेऊन कोटास काम लाविले तो कारखाना ह॥ पासून शके १४३७ युवा नाम सवत्छरे सु॥ सीत आशर मया तिसैन सन ९२५ परियेत काम कोटाचे चालून कोट तयार केला नंतर भागानगराहून प्रथम सुभा रवाना जाह्ला

२२ महमद इसलामखान याने आपले लोक शके १४३८ धाता नाम सवत्छरे सु॥ सबा आशेर मैया तिसेन सन ९२६ ह॥ पासून शके १४५९ हेमलबी नाम सवछरे सु॥ समान सलासीन मैया तिसेन सन ९४७ परयंत वर्षे २२ आमल केला कलम १

२६ वली महमदखान याने शके १४६० विलंबीनाम सवत्छरे सु॥ तिसा सलासीन मैया तिसेन सन ९४८ ह॥ पासून शके १४८६ रक्ताक्षीनाम सवत्छरे सु॥ खमस सितैन मया तिसैन सन ९१४ पर्यंत वर्षे २६ सवीस आमल केला कलम १

७ शाह महमद याने शके १४८७ क्रोधी नाम संवत्छरे सु॥ सीत सितैन

मैया तिसैन सन ९७५ इा पासून शके १४९३ प्रज्यापती नाम संवत्छरे सुा इसने सबैन मैया तिसेन सन ९८१ पर्यंत वर्ष ७ आमल केला कलम १

१८ बहादूरखान याने शके १४९४ आगिरानाम संवत्छरे सुा सलास सबैन मया तिसैन सन ९८२ इा पासून शके १५११ विरोधकृत नाम सवत्छरे सुा तिसैन मया तिसैन सन ९९९ पर्यंत वर्ष १८ आमल केला कलम १

१४ शामीरखान याने शके १५१२ विकृतीनाम सवत्छरे सुा इहींदे तिसैन मैया तिसैन सन १००० इा पासून शके १५२५ शोभकृत नाम सवत्छरे सुा आर्बा आलफ सन १०१३ पर्यंत वर्ष १४ आमल केला कलम १

१८ हैबतखान याने शके १५२६ क्रोधन नाम सवत्छरे सुा खमस आलफ सन १०१४ इा पासून शके १५४३ दुरमतीनाम सवत्छरे सुा इसने आशरीन आलफ सन १०३१ पर्यंत वर्षे १८ आमल केला कलम

१५ दाऊदखान याने शके १५४४ दुदुभी नाम सवत्छरे सुा सलास आशरीन आलफ सन १०३२ इा पासून शके १५५८ धाता नाम सवत्छरे सुा सबा सलासीन आलफ सन १०४६ पर्यंत वर्षे १५ आमल केला कलम १

४३ न्याहरखान याचे मारफतीने आमलदार येऊन जाऊन आमल शके १५५९ ईश्वर नाम सवत्छरे सुा समान सलासीन आलफ सन १०४७ इा पासून शके १६०२ रौद्रनाम सवत्छरे सुा इहिदे समानेन आलफ सन १०९० परियंत वर्ष ४३ आमल होण्याचे आमदानीत शके १५९६ आनद नाम सवत्छरे सुा खमस सबैन आलफ सन १०८४ जेष्ट शुा ५ पंचमीस माहाराज सिवाजी राजे भोसले याजला पटा आभिषेक राज्याचा रायेगडी होऊन जागा जागा ठाणी बसविली परंतु सिरवली ठाणे बसले नाही कलम

१५ इभ्रामखान याने शके १६०३ दुर्मती नाम सवत्छरे सुा इसने समानैन आलफ सन १०९१ इा पासून शके १६१७ युवानाम सवत्छरे सुा सीत तिसैन आलफ सन ११०५ पर्यंत वर्ष १५ आमल केला कलम

२ इसलाईम मैया याने शके १६१८ धाता नाम सवत्छरे सुा सबा तिसैन आलफ सन ११०६ इा पासून शके १६१९ ईश्वरनाम सवत्छरे सुा समान तिसैन आलफ सन ११०७ पर्यंत वर्ष २ दोन आमल केला कलम

३ खोजेखान याने शके १६२० बहुधान्य नाम सवत्छरे सुा तिसा तिसैन आलफ सन ११०८ इा पासून शके १६२२ विक्रम नाम सवत्छरे सुा इहीदे मया आलफ सन १११० पर्यंत वर्ष ३ आमल केला कलम

१ कारहीबदखान याने शके १६२३ वृषानाम सवत्छरे सुा इसने मया आलफ सन ११११ इा पासून आखेर सालपर्यंत यक साल आमल केला

२ यासीनखान याने शके १६२४ चित्रभानू नाम सवत्छरे सु॥ सलास मैया आलफ सन १११२ इ॥ पासून शके १६२५ सुभानू नाम सवत्छरे सु॥ आर्बा मैया आलफ सन १११३ पर्यंत वर्षे २ दोन आमल केला कलम

३ लोधीखान याने शके १६२६ तारण नाम सवत्छरे सु॥ खमस मैया आलफ सन १११४ इ॥ पासून शके १६२८ व्ययेनाम सवत्छरे सु॥ सबा मैया आलफ सन १११६ पर्यंत वर्षे ३ आमल केला कलम

४ आसनिखान याने शके १६२९ सर्वजीत नाम सवत्छरे सु॥ समान मैया आलफ सन १११७ इ॥ पासून शके १६३२ विकृती नाम सवत्छरे सु॥ इहीदे आशर मैया आलफ सन ११२० पर्यंत वर्षे ४ आमल केला कलम

१० जानोजी नाईक निबालकर कर्मालकर यानी शके १६३३ खरनाम सवत्छरे सु॥ इसने आशर मैया आलफ सन ११२१ इ॥ पासून शके १६३२ विकारीनाम सवत्छरे सु॥ आशेरीन मैया आलफ सन ११२८ पर्यंत वर्षे १० आमल केला कलम

३१ महाराज शिवाजी राजे भोसले याचे नातू शाहूजी राजे याजकडील बालाजी विश्वनाथ पतप्रधान यानी निबालकर याचे ठाणे उठऊन कोट पाडिला आणि आपले ठाणे बसविले शके १६४२ विकारीनाम सवत्छरे सु॥ इहीदे आशेरीन मैया आलफ सन ११२९ इ॥ पासून शके १६७२ प्रमादनाम सवत्छरे सु॥ इहीदे खमसेन मैया आलफ सन ११६० पर्यंत वर्षे ३१ आमल केला कलम

त्यानंतर नारो शकर सचीव यानी पतप्रधान याजला सिंहगड देऊन त्याचा मोबदला आपल्याकडेस सिर्वलचे ठाणे घेऊन आपले ठाणे बसविले शके १६७३ प्रज्यापतीनाम सवत्छरे सु॥ इसने खमसेन मैया आलफ सन ११६१ १७५१

---

ले. २

१५६१
शके १४८३ आश्विन शु॥ ११




ई कौलूनामे अज दिवाण ठाणे पा सिरवल ताहा लखमोजी व बालो प्रज मुजेरी कसबे सिरवल पा मजकूर सु॥ सन इसने सितैन व तिसा मया कारणे दादे

कौलूनामा दिला येसा तु ........ मल्हारजी व आपाजी देस ........ मालूम केले येसेजे सेत जान ........ तलथा नजीक बहूत दीस पडिले + + बिघे ·। तीस बराये कीर्दी सन सलासा कारणे नफर मजकुरास इ॥, मु॥ ४ चौ साला देणे बि॥ ता॥

| पहिले साल सन सलास | | सन आर्बा | |
|---|---|---|---|
| नख्त | गला दे॥ | नख्त | गलादे॥ |
| ·॥ ६ तालुक देहाये | जिनसी ना | १· ता॥ देहाये | जिनसी |
| ·॥ ता॥ ठाणे | ८२॥ | १८ता॥ ठाणे | ·। |
| | गवत | २। | गवत |
| | २५ | | ५० |

| सन समस | |
|---|---|
| नख्त ता॥ देहाये | गला |
| व तालुक ठाणे | ·।~॥ |
| ३।६ | गवत |
| | ७५ |

| सन सीत | | |
|---|---|---|
| नख्त | गला | |
| २॥ ता॥ देहाये | ·॥· | |
| २८ ता॥ ठाणे | जोरी | गहू |
| ४॥ | ·।३॥ | ८१ |
| | चणे | तील |
| | १ | + |
| | गवत | कापूस |
| | १०० | ·।१ |

येसा कौलू सादर जाहालिया तकवा धरून सेत वाहील मालूम जाहाले बराये मालुमाती खातिरेसी आणोउनू कौलनामा सादीर केला आसे कवणे बादे तालुक आदेसा न कीजे कीर्दी मामुरी करूनु सुखे आसीजे सदरहू प्रमाणें पालुनू जाणिजे तेरीख ९ माहे मोहरम.

---

१५७७

• ले. ४ शके १४९९ आषाढ शु॥ ९

तालीक (तत्कालीन)

अज दिवाण रख्तखाने खास बजानेब कारकुनानी व मुकासाइयान हाल व इस्तकबाल व देसमुखानी व मोकदमानी व माहाजनानी व सेटियानी पा॥ सिरवल चिदानंद सु॥ समान सबैन तिसा मया सवदरगे ब दे ऊ हुजुरु बधगी हजरती मालूम केले जे कसबा सिवरळीचे जोतीसपण आपली आपले वडीलवडीलार्ची मिरासी आपला चुलता बळाल जोशी आ रा ध्या (!) चालविता गहदम सालाबाद

१।८।१५८

चालिले आसे दरम्यान रास जोसी मांडका हा जोतीसपणाचा करकसा करितो म्हणौउनु बलाल जोसी व रास जोसी साहार/आहामदानगरास मुनसीफीस आले साहार मजकुरी सेटिये महाजण समस्ते बैसोनु मुनसफी केली आपणास आपणास व रास जोसी यांस गोही आणविले व रास जोसी याचीया हुजती पाहिलिया त्या सोटिया म्हणौउनु बोलिले व आपण शिरवलास जाऊनु गोही घेऊनु आलो तिही गोही दीधली जे रास जोसी याच्या पूर्वजापूर्वी बलाल जोशी याचे पूर्वजा [ ची ] मिरासी होये म्हणौउनु गोही दीधलि रास जोसी गोही नाणोच सोटा जाला पलोनु गेला यावरी समस्त लोकी जयेपत्र आपणास लिहुनु दीधले ये बाबे फर्मान होये मालूम जाहाले बाा इस्यारती दिवाणआला हर दो नफराची मानसुफी साहार आहामदानगरी जाहाली जे बलाल जोसी याची मिरासी जोतीसपण होये रास जोसी सोटा जाहाला मग पलोनु गेला तेथे जोतीसपण बलाल जोसी मजकुराची मिरासी याचे दुबाला कीजे रास जोसी हरकत न करी व जोसी जमानती करुनु सोडी जे दुणे बाबत सारा उजूर न करिजे तालीक लिहोनु घेउनु असेल फिराउनु दीजे मोर्तबु तेरीख ७ माहे जमादिलाखर पाा साा जाबीतसा असेल दफतर बार आसे

---

१५८८

ले. ५ शके १५११

( फारशी गोल सिका )

ई कौळनामा आज दिवाण ठाणे परगणे सीरवल ताा बाजी कदम व प्रजा मौजे कविठे माा मजकूर सुाा तिसैन व तिसा मया बराये कीर्द सन इहिदे दादे कौळना- [ मा ] दीधला येसा तुमचे बाबे मल्हारजी व मोरसो + + + + + + माा हुजूर येऊन इळतमेसी केला पेसजीचे फितरती व आफत करिता [ पाा म ] जकूर बहुत दिवस खराब पडिले आहे ये...... [ शास ] कौळ दिधलिया प्रज कुल मेलऊन पांढरीवरी राहून मौजे मजकुरी कीर्द करील येसा कौल

| | | |
|---|---|---|
| नस्तयाती तालुक ठाणे व तालुक देहाये बाबा मौजे मजकुरीची आज रकम | गाव हुडा जकाती आज रकमेसी हाा मुाा चौ साला | |
| | पहिले साली | दुसर साली |
| का......जे असेल ते मौजे म- जकुरीचे साली म ज मी | ता न ही | निमे ग |
| | + + + | + + + |

( पुढे कागद फाटला आहे )

१६१०

ले. ६ श्री शके १५३२ आषाढ व॥ २

छ इं कौलनामे राजश्री आपाजि फर्जंद मल्हारजी देसमुख व तुकाईजी देसमुखे




प॥ सिरवल व मोकदम कसबे मजकूर ता। विठल कायेदेऊ देसकुलकरणी प॥ मा।र व वहीत जमीन कसबे मजकूर सु ॥ सन इहीदे आशर आलफ कारणे दत कौलूनामा दिल्हा येसा जे तुमचे बाबे बाऊजी आर्बा आजहती मोकदम व चौगुले गणबा मायेगुडा व दाकोजी कावला व +ऊजी सावला कसबे मजकूर येऊनु सागितले जे सेत नजीक × × × खालील विठोबाची मिरासी आहे विठोबा कटकास गेला यावरी मागे किर्दी बदल गोमाजी ढमाल त्याचे हवाला केले होते आता ते गावास आले आहेती आम्हास म्हणताती जे आपले सेत मिरासीचे जमीन चावर १॥ गोमाजी मजकुरास खुषी करूनु आपणच करीन यावरी आम्हि त्यासी बोलिलो आता पेरणीचा इगान आला आहे पेरणी करून देणे सन इसनेचे पीक घेऊनू दिवाली पासूनू तुमचे सेत तुम्ही करणे हे विठोबे कबूल करूनू निरोप दिल्हा आता सन इसने दिवाली पासून विजाहाती किर्दीस सन सलास आशर आलफ कारणे गोमाजीस दुरी करूनु विठल कायेदेऊ यास सेत दिल्हीया किर्दी करिल मनास आणोऊनू कौलूनामा सादर केला आसे गोमार्जी ढमाल दुरी केला आसे तुझे सेत तुमचे दुमाला केले आसे

दिवाण निसबती नि॥ माहार — निसबेती दिवाण नख्त टके १७
नख्त टके १० गला खडी २ — गला दोनी साजेती

हे देऊनू या सेरीज बाजे पटी बदल मुशाहिरा निसबेती मुजेरी देसकुलकरणाचा पेसजी प्रमाणे तुमचे दुमाला केली होती तेणेच प्रमाणे पुढेही दुमाल केले आसे येणे कौल कीर्दी करूनू सुखी आसणे कोण्हेया बाबे तालुक आदेशा न करणे हा कौलू सही तेरीख १५ माहे जमादिलाखर

---

१६१३

ले. ७ शके १५३५ कार्तिक शु॥ २

हैबतखान

तालीक

छ कौलुनामा अज रख्तखाने खुदायेवंद खाने अलीशान रफिअलकद्र वलमकान साहेब खुली दयामदौलतहु ता। विठल कांइदेउ देसकुलकर्णी पा। सिरवल सु॥ सन आर्बा आशर आलफ दादे कौलनामा येसा जे तुझे मिरासीवरी दरीवख्त रुद्राजी दामोधर लंबा उभा राहिला होता त्याबद्दल तुज तलब करुनु अणविले तुझे व त्याचे बरहक मुनासिफी खातिरेसी आणिता रुद्राजी मजकूर मिरासी नव्हे भोगवटा नाही लायनि गरगशा करूं लागला यावरी हमशाहि माहाल पा। पुणा वा

पा। वाई व क्रा। सासवड वा तपे गुजाणमाऊल हे विलायेतीचे देसमुख वा देसक गोही दिल्हे जे रुद्राजि मजकूर मिरासी नव्हे यासि संमध नाहीं पा। मजकूरचे देसकुलकर्णी विठल कांइदेऊ याचे मिरासी होये पिडी दर पिडी चालिविले आहे हजरत निजामशाहाचे राजतागायेत यांचे मिरासी होये येसे समस्त लोकानी गोही दिल्हे यावरी रुद्रो मजकूर खोटा लायेनी करकसा करितो म्हणोनु बाहीर घातल आतां तुझे मिरासी पा। मजकू [ र ] चे देसकुलकर्णीगी तुझे हुवाला करूनु तुज माहाजर करूनु दिल्हे असे तुवा कोणे विसी कांहीं तालुक अंदेशा न करिता पा। मजकुरींचे आपुले मिरासी देसकुलकर्णगी चाळऊनु दिवाण नफराइ वा हलालखोरी करूनु सुखे आसिजे हे कौल सही

तारीख १ माहे रमजान

---

ले. ८ 1620 शके १५४२

तालीक

छ कौलुनामे राजश्री आपाजी फर्जंद मल्हारजी देसमुख व तुकाई देसमुखीण पा। सिरवल तांहा विठल कायेदेउ देसकुलकर्णी पा। मा। सु॥ इहिदे इसरीन आलफ कारणे दादे कौलुनामा यैसाजे तुझे देसकुलकरणंकीची मिरासीवरी हैबतखानाचे कारकीर्दीस दर मोकाम लस्कर खडकी मधे लंबे पैकियाच्या बले उभे राहिले होते त्याचे व तुमचे निवाडा मुनसिफी मलीक अजम व हैबतखान करुनु लबियासी दुरी केले त्यावरी आ ........प मल्हारजीस आपाजीने मारिले हे करकरेचे दुई बदल तुह्मी हुजूर कटकासी गेलेसी मागे दरम्यान लंबे पा। मजकुरी पैदा होउनु दर खु र ले यावरी तुम्ही दिवाणीचा फर्मान व मलिक अजमाच्या कितावती घेउनु पा। मजकुरासी आलेसी त्यावरी विलायेतीच्या मोकदम व तमाम देसक सेटिये माहाजन व बारा बलुते व समस्त मिरासी लोक पा। मजकुरीचे व इमशाही विलायेतीचे मेळउन ते बोलिले जे विठल काइदेउ याची मिरासी देसकुलकर्णकी व गावकुलकर्ण पा। मजकूर पिढी दरपढी चालिले असे आजी तागाईत खादले यैसे खलकासी ठाउके असे याचे हाते कुलकर्णकीचा कारबार घेत जाईजे लंबे गैरमिरासी आहेती यासी बिलतीमधुनु बाहीर घालवणे म्हणोनु बोलिले त्यावरी मनास आणिता लंबे गैरमिरासी यैसे जाहाले हे खातिरेसी आणुन अम्ही व खल खुला मिळोन लबीयासी बाहीर घातले असे आता तुवा आपली मिरासी देसकुलकर्णकी पा। मा। व गावकुलकर्णे चालउन आपले मुशाहिरा व हक लाजिमा देसकुलकर्णेकीचे सालाबादप्रमाणे खाउनु आपले सेत व मले करून असीजे कांहीं चिंता न कीजे काही चिंता न कीजे हे आपला कौलु इमान सती असे यासी जो कोणी इसकील करील व इमानासी चुकेल त्यासी देवाची आण असे व आपल्या वडीलाच्या बेतालिसाचे इमान साक्ष व आपले इमान सती असे हा कौलु सही

१६१०

ले. १ — १५३२ श्रावण व. १३ तालीक

माहजर बितेरीख २६ माहे जमादिलोवल हजीर मजालसी पाो सिरवल

काजी सेखन हकीम सेरा पाा मजकूर
नरसो लाहामाजी मजूमदार पाा मजकूर
मल्हारजी बिन आपाजी व अपाजी बिन गोरखोजी देसमुख पाा मजकूर
जसवंतराऊ नेब गैबत पाा मजकूर
निलो देउजी मुशरीफ पाा मजकूर
विठल कायेदेऊ देसकुलकर्णी पाा मजकूर

( या खालीं सेटिये, हसम, नाईक, चाकर ठाणे परगणे मजकूर, चौगुला, चौधरी वगैरेंचीं नावें व ' मोकदम कर्याती परगणे मजकूर ' या मथळ्याखालीं अहिरे, पाडळी, भादे, पलसी, नाहावी, वडगाव, भादवडे, मांडकी वगैरे १३ गांवच्या मोकदमांचीं नांवें आहेत. )

सुाा इहिदे असर अलफ श्रीसके १५३२ साधारण संवत्सरे श्रावण वदि त्रयोदशी मगलवार जाहाला महजर ऐसा जे मौजे भोगवली पाा माार तेथील कुलकर्णा- बदल विसाजी बिन नारोबा म्हसवडा व नागोजी बिन कोंडभट पटवर्धन जोसी माौ मजकूर यांस करकसा होता साल मजकुरी आग्रवादी विसाजी बिन नारोबा मसवडा व पछमवादी नागोजी बिन कोंडभट पटवर्धन उभे राहोनु वेव्हार भाविला जे बितपसलि

विसाजी बिन नारोबा मसवडा अग्रवादी येणे वेव्हार भाविला जे मौजे भोगवली पाा मजकूर तेथील कुलकर्ण आपलीया वडिलाची मिरासी आपण खात होतो हाली वणगोजी निबालकर पुंड पाा मज- कूर मुकासा खात होते त्यावरी नामजा- दिया जालीया ते फितरतीमधे आपाजी देसमुख मोकदम मौजे मजकूर गाव सोडुनु बाहेर गेले त्याबराबर आपण गेलो मागे नागोजी बिन कोंडभट पटव- र्धन जोसी मौजे मजकूर कुलकर्ण चालऊ लागला तरी नागोजी जोसी मजकुरासी कुलकर्णासी समधु नाही याच्या वडिलापूर्वी आपलिया वडिलाचा भोगवटा मिरासी मौजे मजकूरचे कुल- कर्ण हे उतर सत्य दिवी रवा साधीन

नागोजी बिन कोंडभट पटवर्धन जोसी मौजे मजकूर पसमवादी येणे वेव्हार भाविला जे मौजे भोगवली पाा मजकूर तेथील कुलकर्ण आपली मिरासी विसाजी बिन नारोबा मसवडा आप- लिया वडिलाचा ठेवणाईत कुलकर्ण आपली मिरासी होये हे उतर सत्य

यावरी राजमुद्रा बोलिले जे सदर्हु तकरीरा उभे वर्गी लेहुनु दिधलिया आहेत हा अमल कैसा आहे म्हणोन साहेबी समेस पुसिले यावरी समस्त सभा बोलिले जे दोघे वेवादी साहेबापासी उभे राहिले आहेत याचा धर्मता निवाडा केला पाहिजे यावर राजमुद्रा व समस्त सभा मनास आणून केदारस्थानी दिव्य देऊन निवाडा करणे येसे केले हे हरदो वादियासी उभे वर्गास मानले यावरी सणवारी आयवादी विसाजी बिन नारोबा मसवडा दिव्यास उभा राहिला नफर मजकुराचे हातीची निशाणे लेहून नखे काढून साबण व निंबे लाऊन हात धुतला खलेती घालुनु लाखोटा केला यावरी पसमवादी नागोजी बिन कोडभट पटवर्धन याची नखे काढोन साबण निंबे लाऊन हात धुतला खलेती घालून लाखोटा केला कोटात राखिले दुसरे दिसी स्रावण वदी येकादसी आदीतवार केदारस्थानी समस्त सभा बैसोन आयवादी विसाजी बिन नारोबा मसवडा व पसमवादी नागोजी बिन कोडभट पटवर्धन यास परिटाच्या पडदणिया देउनु केदारबावीस आघोली करुनु नंदकेस्वरापुढें केदारा सन्मुख उभे राहिले तूप व तेल ताउनु थाली साडसे धरोनु ताम्हणामधे बोतिली सावीत (?) मडले चालोनु विसाजी नारायेण आयवादी येणे रवा काढिला नागोजी पटवर्धन पसमवादी येणे साउली केली विसाजी नारायेणे रवा काढोन समेसी दाख-ऊनु खाले टाकिला कासेस हात घालुनु देवास परदक्षणा करुनु आला मग त्याचे हाती खलेती घालुनु लाखोटा केला व नागोजी पटवर्धन पसमवादी याचे हाती खलेती घालुनु लाखोटा केला दोघे वेवादी दुर्गात राखिले तिसरे दिवसी मंगलवारी समस्त सभा बैसोनु हरदो वेवादीयासी बोलाउनु लाखोटा तोडोनु विसाजी नारायेण मसवडा आयवादी याचा हात पाहिला खरा निघाला रवा उतरला नागोजी पटवर्धन मजकुरे हरविले खोटा जाला यासी मौजे भोगवली पा मजकूर तेथील कुलकर्णास समंधु नाही विसाजी बिन नारोबा मसवडा येणे मौजे भोगवले मजकूर तेथील कुल-कर्ण मिरासी जितिली हा महजर * सही

---

ले. ११ — १६१६ — शके १५३८ चैत्र व. १०

तालीक ( तत्कालीन )

महजर ब तेरीख २३ माहे रबिलोवल बी हुजूर हजरती खाने आलीशान हैबत-खान साहेब खुली दयाम दौलतहु व हजीर मजालसीयानि बी॥

---

* या पत्राच्या पाठीवर " महजर म्हसवडियाचा त्याची नकल " असा मजकूर आहे.

वजारत माह खाने
आजम आलीखान
मखुरल आनाम
नरसिंग राऊ
मायेणा पंडित पेशवे
मखुरल आनाम खुस्तार—
राऊ शबनीस
पतगराऊ
संभूजी जाधवराऊ सरदार
खुराजी निंबालकर सरदार
खुरेराऊ कर्जखोपक सरदार
शाऊजी देसाई कर्याती सासवड
नरसिंगराऊ आकुशराऊ सरदार

खाने आजम आनुजाब
खान हवालदार
खोज हाफीज
खा। जमालखान
जसवतराऊ हवालदार
खा। सादूलखान सरदार
भानजी आहिरेकर सरदार
जाऊजी मुगुटराऊ धुमाल सरदार
माहालोजी घोरपडा सरदार
न माजी सितोला सरदार
सबाजी सिकरा सरदार

सके १५३८ नंळ[1] संवछर चैत्र वदी दसिमी सु॥ सन सीत आशर आलफ जाहला माहजर येसाजे विठल काईदेऊ देसकुलकर्णी पा। सिरवल याचे देसकुलकर्णावरी रुद्राजी दामोधर वा बाबाजी भूपालराऊ लंबे उभे राहून लाईनी गैरत मालूम करून विठल काईदेऊ वा त्याचे मुरजंद व खेलखाने वा दोस्त खरावत तमाम दस्त करुनू वाईत नेऊनू मार करविले यावरी पा। वाईचे देसमूख वा सेटे महाजन वा देसकाचे आर्दास आले जे देसकुलकर्णी काये बदल धरले आसे त्याचे माथा काही गुनोगारी नाही त्याचे मिरासीवरी रुद्राजी वा दादाजी मजकूर गैर मिरासी उभे राहून त्याचे तकटबाद करविले मिरासी होऊनु येसे करवीत नाही पा। मजकुरीचे देसकुलकर्ण विठल काईदऊ याचे मिरासी आहे याचे वडील वडिलानी खादले आहे लंबे यासी समंध नाही वा आपुले वडील वडिलानी काही सागितले नाही साहेबी नजर इनायेत फर्माऊनू विटल कायेदेऊ मजकूर हुजूर नेऊनु मुनसिफि खातिरेसी आणिले पाहिजे म्हणेऊन् यावरी विठल मजकुरासी हुजूर आणविले याचे वा लंबेचे मुनसिफि खातिरेसी आणिता विठल कायेदेऊ यासी बहुत दिवस भोगवटा असे याचे वडिल वडिलानी चालविले आहे लंबे मजकूर गैर मिरासी लाईनी खोटाई लाऊनू गरगशा करितो यासी पा। सिरवलचे देसकुलकर्णसी समध नाही येसे हमशाई माहालीचे देसमुख वा देसकुलकर्णी वा सेटे माहाजनचे गोही गुदरले हाजीर मजालसी बरहक पाहतां रुद्राजी वा बाबाजी भूपालराऊ लंबेसी निसबत नाही येसे निवाडा जाहाला यावरून माहजर करूनु दीधला असे अपूर्ण

---

१ ‘नळ’ च्या ऐवजी ‘अनल’ पाहिजे

१६१८

ले. ११

१५४० मार्गशीर्ष व. १

नकल

महजर व तेरीख १६ माहे जिल्हेज बी हुजूर मजालस प्रा सिरवल

काजी शेखन काजी इमाम शरा पा सिरवल
गंगाजी विस्वनाथ हवालदार पा मजकूर
हरी नारायेण निगावन पा मजकूर
आपाजी फर्जंद मल्हारजी देशमूख पा मजकूर
हांऊजी आढा मुतालिक कसबे मजकूर
येमाजी मायेगुडा व गोमाजी डमाल चौगुले कसबे मजकूर
मुला मोज मुला कसबे मजकूर
यमाजी गणपती मजमूदार प्रा मजकूर
बिठोजी सरगुन्हा चाकर पा
नाग सेटी व काल सेटी सेटींये पा मजकूर
माहाजन का मजकूर
पलि सेटी गुळंबा पाये सेटी सका चाप-सेटी ताठा गोम सेटी सेटगा
खंडसेट माहाजन पेठ बन्हाणपुर कसबे मजकूर *

सुा तिसा आसर आलफ कारणे जाला महजर येसाजे नागोजी बीन कोडभट पटवर्धन जोसी व कुलकर्णी मौजे भोगवली यांचा वडील आजा दादोबा तो मौजे मजकूरचे कुलकर्ण मिरासी चालवीत होता आपण येक न प सी दो चौ गावी कुलकर्णाचा बोभाट चालविला नव जाये म्हणौन आपला मेहुणा नारोबा बीन सोनभट म्हसवडा जोसी कुलकर्णी मौजे आलंदे तपे हिरडस मावल तेथून आणून मौजे मजकूरच्यां कुलकर्णास ठेवणाईत ठेविला यावर येका दो वरसा नारोबा बीन सोनभट यापासून मौजे मजकूरच्या कुलकर्णाचा मान भाग टका येक बाधोन चौघांचे गोहीनसी लिहीले घेतले याप्रमाणे सात पांच वरसे दादोबा मजकूरास मानभाग देऊन मौजे मजकूरचे कुलकर्ण चालवीत होता यावर दादोबा मजकुरें आपला पुतण्या कोडभट मौजे मजकुरी जोसीपण व कुलकर्ण चालवावया ठेविला यासीही नारोबा मजकुरें दोनी च्यार वरसें मानभाग देत गेला यावर नारोबा बिन सोनभट म्हसवडा याणें आपाजी गोरखोजी निगुडा मौजे मजकूरची मोकदमी करीत होता त्यासी मिलकत करून मौजे मजकूरच्या कुलकर्णाचा मानभाग नेदींच यावर हर दो जणास मौजे मजकूरीच्या कुलकर्णाचा करकसा लागला यावरी नारोबा वा सोनभट म्हसवडा मयेत जाला याचा लेक विसोबा तोही वग वसालत करून मौजे मजकूरचे कुलकर्ण चालवीत होता पा मजकूर वणगोजी निबालकर यासी मुकासा होता यावर इदल-शाई नामजादी जाली याते फितरतीमधें आपाजी गोरखोजी निगुडा मौजे मजकूरी-हून पलोन इदलशाई नामजादीमधे गेला यावर वणगोजी निबालकर याचेवर तरफ

* ह्यापुढें सरासरी १२५ सह्या निरनिराळ्या गांवच्या व अधिकारी लोकांच्या आहेत. त्या येथें घेतल्या नाहींत.

जाले यावर पा। मजकूर खाने आजम हैबतखानास मुकासा जाला ते कारकीर्दीस आपाजी गोरखोजी मौजे मजकूरास आला त्यापासी दादोबा पटवर्धन उभा राहिला जे मौजे मजकूरच्या कुलकर्णास नारोबा बीन सोनभट म्हसवडा आपण ठेविला होता हाली मौजे मजकूरच्या कुलकर्णाचा मानभाग बाधोनु गोहीसी लेहीले घेतले आहे नारोबा मजकुराचा लेक विसोबा माझे कुलकर्ण मज देत नाही मौजे मजकूरचे कुलकर्ण माझी मिराशी माझे दुमाला करणें यावर आपाजी गोरखोजीने मौजे मजकूरचे कुलकर्ण दादोबा मजकूराची मिरासी दादोबाचे दुमाला केली यावर दादोबा मजकूर मौजे मजकूरचें कुलकर्ण येक वरीस चालविलें दुसरे वरसी कोटभट मजकूराचा लेक नागोजी मौजे मजकूरचे कुलकर्ण चालऊ लागला यावर खाने आजमाचे कारकीर्दीस विसोबा बीन नारोबा याने विठल कायेदेऊ आगापूरकर वकील करून मौजे मजकूरचे कुलकर्ण आपली मिरासी नागोजी बीन कोटभट पटवर्धन जोसी मौजे मजकूर तो खातो म्हणोन ठाणा मालूम केले यावर नागोजी मजकुरास तळब करून ठाणीयासी आणून राखिले यावर हरदोजणासी मुनसिफी न करितां विसोबा मजकूराचे हाती सणवारी पिसवी घातली श्रीशके १५१२ साधारण संवछरे श्रावण वदी येकादसी वार रविवार तदिनी केदार माहास्थानीं राजमुद्रा मुख्य करून व देसमुख व सेटे माहाजन सभा बैसली या विद्माने हर दोघाजणाची नेमउतर बि॥ ता॥

आधवादी विसोबा बिन नारोबा म्हसवडा यांचे नेम उतर यैसे जे मौजे भोगवलीचें कुलकर्ण नागोजी बीन कोटभट पटवर्धन जोसी मौजे मजकूर यापूर्वी आपल्या बापे खादले हे उत्तर सही बिंदी उतरे

पश्चमवादी नागोजी बीन कोटभट पटवर्धन जोशी मौजे मजकूर याचे नेम उतर यैसेजे मौजे मजकूरचे कुलकर्ण आपल्या वडील वडिलाची मिरासी आपला आजा दादोबा येक न पसी म्हणोन मौजे मजकूरच्या कुलकर्णासी विसोबाचा बाप नारोबा बीन सोनभट म्हसवडा ठेवणाईत ठेविला हाली नारोबाचे हातीचे लिहिले आहे हे सत्य यैसे आपण खावली करिन विसोबा मजकुराने माझे सदरहू नेंमउतर ठीक म्हणोन रवा करणे

हर दो जणाची सदरहू नेम उतर कागदी लिहीलियावर आबा जोसी बलाऊन ताडपत्री नेम उतर लेहविली आबा जोसी मजकूर सदरहू मजलसी देखता बोलिला जे विसोबा मजकूर सदरहू नेम उतर केले आहे याप्रमाणें रवा घेऊ नये आपणास ताडपत्री लिहीले नव जाये जरी यैसे नेम उतर करील जे नागोजी बिन कोटभट

जोसी मौजे मजकूरचे कुलकर्ण आपल्या वडील वडिलीं मिरासी खादली आहे आपला बाप दादोबा मजकूराचा ठेवणाईत नव्हे हे उतर सत्य दिधी उतरे येसे नेम उतरास विसोबा मजकूर राजी होऊन रवा करील तरी आपण सद्रहू नेम उतर ताडपत्री लेहीन यावर देशमूख व सेटे माहाजन यासी गोष्टी मानली यावर विठल कायेदेऊ आगापूरकर जसवत राऊ हावालदार पा। मजकूर यासी बोलिला जे रवा न करीच आपल्या नेम उतर प्रमाणे रवा केला नागोजी मजकूर सद्रहू मजालसी देसतां बोलत असे जे माझा वडील आजा दादोबा तेणे तुझा बापू नारोबा मौजे मजकुरीचे कुलकर्ण चालवावया ठेवणा ठेविला याचे हातीचे लिहीले चऊष ब्राह्मण त्याचे गोहीनिसी आसोनू जुलूमे रवा आपले नेम उतर प्रमाणे करीतोसी तो करूं नको माझा आजा दादोबा याचा ठेवणा आपला नारोबा येसा रवा करी त्यास आपण राजी आहे सद्रहू नेम उतर नागोजी मजकुराचे प्रमाणे रवा न करीच आपल्या नेम उतर प्रमाणे रवा करूनू मौजे मजकुरीचे कुलकर्ण हु कु ला मु शा हा खात होता खान अजमाचे वर तर्फ जाले हजरती साहेबास अर्जानी जाले त्यावरी हजरतीच्या कारकुनापासी नागोजी मजकूर आड पडला मौजे मजकूरच्या कुलकर्णाची सद्रहू हेकती सांगितली त्यावरी हजरतीच्या कारकुनी रामाजी बीन विसोबा मौजे मजकुरीचे कुलकर्ण चालवीत होता त्यास तलब करून ठाणीयास आणिले, सद्रहू कुलकर्णाची हकीकती रामाजी मजकुरास पुसिली तो बोलिला जे आपला बापू विसोबा कटकीं आहे त्यास ठावकें आहे त्यास बोलाऊन आणीन तो येऊन निवाडा करील यावरी रामाजी मजकूर जमान देऊन विसोबा मजकुरास आणावयाची मुदती केली ते मुदतीस हाजीर न करीच म्हणोन मौजे मजकुरीच्या कुलकर्णाचा हक अमानत केला त्यावरी पा। मा।र साहेबास मुकासा आर्जानी जाला रतनोजी विस्वनाथ ठाणदार याचे कारकीर्दीस नागोजी आबा जोसी विसोबा मजकुराचे नेम उतर ताडपत्री लिहीना तर काये हिलग पडिला आहे जे विसोबा मजकुराचे नेम उतर कागदी लिहिले आहे तोच कागद विसोबा मजकुराचे कपाली बाधोन रवा घेणे यावर आबा जोसी मजकुरासी दूर करून सद्रहू नेम उतर विसोबा मजकुराचे कागदी लिहिले होते तो कागद कपाली बाधोन विसोबा मजकुराकडून रवा करावेला सद्रहू आपले नेम उतरे प्रमाणे विसोबा मजकूर रवा उतरला विसोबा मजकुरास महजर करून दिधला तो महजरी विसोबा मजकुरें नेम उतर करून रवा केला ते नेम उतर लिहिले नाहीं तेथें आणिक पालटूनू नेम उतर लिहिले जे आम्रवादी विसाजी बीन नारोबा मसवडा याचे नेम उतर येसेजे मौजे भोगोली पा। मजकूर तेथील कुलकर्ण आपली वडिलांची मिरासी आपण खातो हाली वणगोजी निबालकर पुढ त्यास पा। मजकूर मुकासा होता त्यावरी नामजादीया जाल्या त्या फितरतीमधें आपाजी देशमूख मोकदम मौजे

मजकूर गांव सोडून बाहेर गला त्याबरावरी आपण गेलो मागें नागोजी बीन कोडभटे पटवर्धन जोसी मौजे मजकूर कुलकर्ण चालऊ लागला तर नागोजी जोसी मौजे मजकूर यास कुळकर्णासीं समंधू नाही याच्या वडिलांपूर्वी आपला वडीलाचा भोगवटा मिरासी मौजे मजकुरीचें कुलकर्ण हे उतर सती दिवीं साधीन नागोजी बीन कोडभट याचें तकरीर नेम उतर प्रमाणें विसोबा बिन नारोबा मसवडा मार ठाणा उभा राहिला सद्रहू हकीकती कुलकर्णाची सागितली तीही रामाजी मजकूरास तलब करून आणिले सद्रहू आमल कुलकर्णाचा पुसिला त्यावरी रामाजी मजकुरें नेम केला जे आपला बापू विसोबा महिनीया दिढा ठाणा हाजीर करनि म्हणोन काकोबा बिराजर रामाजी मजकुरें त्याणें नेम करून तलब देऊन गेला यावरी रामाजी मजकूर सद्रहु मुद्तीस हाजीर न करिता साहेबाचे खुर्दखत आणिले छ ४ माहे जमादिलाखर सन समान तेथे लिहीले जे काकोजी बिराजर कुलकर्णी मौजे भोगावली पा मार हुजूर येऊन मालूम केले जे आपले कुलकरण मौजे मजकुरीचे कदीम बाप आजा पणज्या पासून चालविले आहे का सा हैबतखान आपल्या बापें दीव केले खरे जाहाले ते महजर आहेत ऐसे असोनू आपला वादीया नागोजी पटवर्धन मौजे मार यास कुलकर्ण देऊनू आपला भाऊ रामाजी ठाणा राखिला आहे तर दाद सरजामी होये मालूम जाले रामाजी कुलकर्ण मौजे भोगोली पा मार तो ठाणा राखिला आहे सु॥

कुलकरण मिरासीचे दुमाला करणे त्याचा वादीया नागोजी पटवर्धन मिरासी नसता त्याईनी मिरासीदारासी राखोन गैरमिरासी यासी कुलकर्ण देणे हे काये मालूम अहे आता मिरासीदाराचे कुलकर्ण दुमाला करणे वादिया हरे येईल तरी त्यास हुजूर पाठवीजे निवाडा होईल त्यावरून नागोजी मजकुरास ठाणा बोलाऊन सांगितले जे हुजूरून साहेबाचे खुर्दखत सादर जाले आहे जे हर दो जणांस हुजूर पाठवणे तर तुम्ही दोघे वादे हुजूर जाऊन निवाडा करून घेणे यावरी नागोजी मजकूर बोलिला जे आपण हुजूर जाईन पर रामाजी मजकुराचा आजा नारोबा याचे हातीचे लिहिले चौघाचे गोहीनसी आहे त्या गोही यामधे दोग मयत जाले बिता

सेमाजी रामाजी जोसी — वामन भट आसलेकर
का॥ मजकूर — हाली दोग गोही अहेत
अंतभट मौजे का॥ मजकूर — रघुनाथ भट जोसी कुलकर्णी मौजे कवीठे पा॥ मजकूर

या गोही यासि बोलाऊन सद्रहू कुलकरणाचा अमल पुसिला यावरी सद्रहू जीतपत्र गोही ठाणा बोलाऊन देशमूख व सेटे माहाजन व देसक बैसोन गोहीदारांसी उभे करून थामार कुड काढून मांगी माहारीचे वस्तर जो खोटे बोलेल त्याचे पूर्वजाचे तोंडी ऐसी आण घालून पुसिले तीही आपले सर्व सती खुमरोन

गोहि दिधलीं जें दादोबा पटवर्धन याणे मौजे भोगोलीच्या कुलकर्णास नारोबा बीन सोनभट ठेवणा ठेविला मानभाग टका येक बाधोन लिहिले दिधले तेथे आम्हां चौघाची गोही आहे या पैकी दोग मयेत जाले हालीं आम्ही दोग आहों मराया टेंकलों आहों आता आम्ही लटकें कशा कारणें बोलों यावरून हरदोजणाच्या सदरहू मजालसीचे दिगीयास उभा राहोन निवाडा करणे यावरी रामाजी मजकूर दि यास राजी जाहाला यावरी सणवारी नागोजी मजकुराचे हतीच्या खुणा लिहून नखे काढून हात धोऊन हाती पिसवी घातली यावरी श्री सके १५४० कालईक संवछरे मार्गस्वर वदी प्रतीपदा वार आदितवार कसबे मजकुरी केदार माहास्तानी सदरहू मजालसी वैसोन हरदोजणाची नेम उतरे जाहाली बी तपसील

आमवादी नागोजी बीन कोंडभट पटवर्धन याचे नेम उतर यैसेजे आपला आजा दादोबा पटवरधन त्याची मिरासी मौजे भोगलीचे कुलकर्ण त्याणे आपला हाता कुलकर्ण चालवावया रामाजी विस्वनाथ मसवडा याचा आजा नारो सोनदेऊ मसवडा ठेविला होता हे सत्य उतर

आपला आजा नारो सोनदेऊ मसवडा तो कोंडभट पटवर्धन याचा आजा दादोबा पटवर्धन याचा ठेवणाइत नव्हे मौजे भोगवलीचे कुलकर्ण चालवावया ठेविला नाही मौजे भोगोलीचे कुलकर्ण आपलीया आजीयाची मिरासी होये हे उतर सत्य

दिवीं उतरें

हरदोजणाची नेम उतरे ताडपत्री लिहिलीं दिवाणांतून हसम नाईक बराबरी देऊन तेल व तूप आणिले वजन करून थालीमधे घालून तापवयास दिधले हरदोजण बावीस आघोली करून आणिले देवा समोर उभे केले सदरहू नेम उतराची ताडपत्रे हरदोजणाचे कपाळीं बाधोन तेल व तूप ताऊन आणून ताम्हणामधे बोतिले गोहीसी तकरीला लेहून घेतलीया हरदोजाणास ठाणाची आर्दास व सदरहू गोहीयाच्या तकरीराच्या तालिका लेहून देऊन काकावा बिरादर रामाजी मजकुराचा व नागोजी मजकूर हुजूर कटकास पाठविले हरदोजणाचे बोलणे मनास आणून कतबे लेहून घेतले यावरी हुजरून साहेबी नागोजी मजकुरास खुर्दखत देऊन पा मजकुरास पाठविले नागोजी मजकूर ठाणा येऊन खुा येऊन दाखविले तेथे लिहिले जे सदरहूप्रमाणें नागोजी मजकूर रवा करील विसोवा मसवडा साऊली करील जो खरा होईल त्याचे दुमाला मौजे भोगोलीचे कुलकर्णाची मिरासी करणे यावरी विसोवा मजकूर कटकीहून अला नाही मग रामाजी बीन विसोबा त्यास ठाणा बोलाऊन अणून सांगितले जे नागोजी मजकूर हुजरून खुा घेऊनू आला आहे माहाली आपला व विसोबाचा रवा घेणे तरी त्यास हाजीर करी नाहीतरी तू निवाडा करावयास उभा राहा त्यावरी रामाजी मजकूर बोलीला जे आपणास रोज २० मुदती देणे मी आपला बापू विसोवा हाजीर करीन यावरून रामाजी मजकुरास सदरहू

मुदती दिधली त्यावरून सदरहू मुदती टलोन महिना दीड जाला मग रामाजी मजकुरास तलब करून ठाणीयास आणिलें जे तो मुदती नेमिली होती ते टलोन महिना दीड जाहाला तो आपला बाप विसोवा हाजीर केला नाहीं आतां तों नागोजी मजकुरा बराबरी नागोजी मजकूर सात मंडले चालोन ताम्हणा जवली आला यावरी ताम्हणामधे रवा टाकिला रामाजी मजकुरे साउली केली नागोजी मजकुरे तेलात हात घालून रवा काढून हिंवसा करून रामाजी मजकुराचे हातीं दिल्हा यावर सदरहू मजालसीने तेल तापले की नाही म्हणौन ताम्हणांमधे भात टाकिले लाह्या जाहलीया नागोजी मजकुराचे हाती पिसवी घातली लासोटा करून हरदोजण कोटांत ठेविले यावरी तिसरे दिवसीं मगळवारी सदरहू मजालसी देखतां नागोजी मजकुराचे हातीची पिसवी काढून हात पाहिला नागोजी मजकूर खरा जाहाला मौजे मजकुराचे कुलकर्ण देवमुखे व सभामुखे जितिलें सदरहू मजालसी देखतां नागोजी मजकुरासी तश्रीफ व पाने देऊन मौजे मजकुरीचा वडज पाटील चौगला व दोन पाटील सुरबा व सोनजी लंका वा समस्त कुणबी मौजे मजकूर हात पाहावयास आले होते त्याचे हातीं नागोजी मजकुरास दिधले जे यापासून कुलकर्णाचे काम घेत जाणे यावरी सदरहू महजर मौजे मजकुरीच्या कुलकर्णाचा नागोजी मजकुरास दिधला कुलकर्ण कुलकर्ण लेकुरांचें लेंकुरी चालवणे रामाजी मजकुरास व मौजे मजकुरीच्या कुलकर्णास लेकुराचे लेकुरी समधू नाही रामाजी मजकूराचा बाप विसोबा त्याणे आपले तकरीर प्रमाणे रवा केला होता त्याचा महजर खान अजम हैबतखानाचे कारकीर्दीस करूनू घेतला होता तो रद् असे पुढें रामाजी मजकुरास लेकुराचे लेकुरी समंधु नाही जो कोण्ही हिला हरकती करील त्याणे दिवाणी होनू ५०० देणे हा महजर सही.




---

१६१८

ले. १२ — शके १५४० ज्येष्ठ शुद्ध ८

१. (फारसी अक्षरे) मुताबिक असल — मलिकंबर

अज दिवाण [ र ] रस्तखाना खासा बजानेब कारकून अजाहाती मोकासियानि हाल व इस्तकबाल देशमुखानी व मोकदमानी फर्जंद मलारजी आपाजी देशमूख

---

१ ही नकल असून याच स्थितींत मिळाली.

पा॥ मजकूर बदगी हजरत मालूम केले जे आपला वालीद मलाहारजी देशमूख पा॥ मजकूर यासी इनाम हक व बाजे कारियाती पा॥ सिरवल आहे

देहाये मौजे गुणद हक लाजीमा बदल देसमुख का॥ पा॥ मजकूर भोवटा तरीकाती प्रमाणे

जमीन चावर व बाग दर सवाद बाजे का॥ वी [ त ] पसील पा॥ मजकूर

| जमीन चावर | बाग |
|---|---|
| ८ | १ |

सा॥

| का॥ सिरवलचा॥ | मौजे मोगोली चा॥ |
|---|---|
| ४ | ३ |
| मौजे सागवी चावर १ | बाग खुा॥ + सुकुरवीरा १ |

येणे प्रमाणे गहदुम सालाबाद भोगवटा तरीकात व इनाम मलाहारजीचा चालत आहे तेणे प्रमाणे आपणासहि चालत आहे कदीम हुजती व भोगवटियाचे कागदहि जाम जाहाले मलाहारजी आपला वालीद होता ते साल गुदस्ता सबा आसर मारा जाहाला ते वख्तती मलाहार देसमूख आपले वालीद मारिला वर्तमान हुजती व भोगवटीयाचे कागद गेले माहाली हुजती बदल इस्केल केली आहे यावरी आपण हुजूर येऊन ममलकत मदार अजमास मालूम करून सदरहूप्रमाणे कारकीर्दी दर कार कारकीर्दी गहदुम सालाबाद भोगवटा व तसरुफाती चालिले असेल त्याप्रमाणे फर्मान करून देवणे म्हणऊन बादनीस सन समान असरीन अलफ छ + माहे रबिलासर बाबे फर्मान मराहामत होय मालूम जाले + हाती इशारती दिवाण अली बराये इलतमेश देविले आपाजी फर्जंद मलाहारजी देसमुख पा॥ सिरवल + + + दरहू इनाम बदल देसमुखी हुजती इनाम मलाहारजी बीन आपाजी देसमूख होते यात मलाहारजी बीन आपाजी साल गुदस्ता सन सबा आसरेनामधे मारा जाहाला मलाहारजी मारिला हुजती गेली यावरी हाली हुजरून + + निसबती मलाहारजी बीन आपाजी प्रमाणे सदरहू इनाम बदल देसमुखी इनाम अपाजी फर्जंद मलाहारजी यासी करार केले असे देहाये येक चावर व बाग व हकलाजीमा बदल देसमुखी सालाबाद चालिले असे तेणे प्रमाणें चालवीजे भोगवटीयाचे कागद व हुजती मारीयात गेली याचे उजूर न कीजे तालीक ले(होनू) घेऊन असल फिराऊन दीजे

देहाये देह येक मौजे गुणद हक लाजीमा बराये देसमुख का। का। पा। मजकूर

जमीन चावर व बाग बांजे का। मजकूर
जमीनचा बाग १
बर ८
ता।
का। सिरवल चा। मौजे भोगो (व)
४ ली चा।
३
बाग येक खु। मौजे साग-
ना। खुकूर- वी चा। १
बारा १

तेरीख ६ जमादिलाखर सबा असरैन अलफ

---

ले. १२ १५४२ माघ शु. ११

महजर बतेरीख ११ माहे जमादिलेवलू बी हुजूर हाजीर मजालसी.

काजी हुसैन बीन काजी सेखजे हाकीम शरा पा। सिरवल
(फारशी मजकूर)

मसुरल हजरती राया राऊ साहेबू
(फारशी शिक्का)

दखो दामोदर मजमूदार पा। सिरवल

बी॥ दस्तुर दखो दामोधर गंगाजी पिसाल देशमुख पा। वाई (मराठी शिक्का)

सूर्याजी येशवतराऊ देसमूख तपे मालेखोरे

करणाजी बादल देसमूख तपे हिरडस मावल

देसमूख तपे रोहिडा

नरसोजी व धर्मोजी कान्होजी खोपडे ——— जेधा

इसम नाइकवाडी सिरवळ

आगा अजम आगा नुरा ++
(फारशी शिक्का)

सलकबाद ठाणेदार पा। सिरवल
(फारशी शिक्का)

सलकबाद ठाणेदार पा। + वल
(फारशी शिक्का)

मालोजी नरसिंगराऊ व विठोजी सितोले +++ पा। पुणा

माऊजी देसमूख का। सासवड
(अष्टकोनी शिक्का)

बाबाजी अढलराऊ देसमूख तपे वेहलवडखोरे
(शिक्का अस्पष्ट)

आप जि बीन मल्हारजी निगडे देसमूख पा। सिरवळ (शिक्का)

सेटीये माहाजन

(यापुढे सरासरी दीडशें व्यक्तींची नांवें आहेत. तीं येथें घेतलीं नाहींत.)

॥ सु॥ इहिदे इसरैन अलफ केला, महजर येसा जे विठल कायीदेऊ देसकुलकर्णी पा॥ सिरवळ हुजूर मालूम केले जें पा॥ मजकुरीचें देसकुलकर्ण आपली मिरासि सालाबाद गहदम पिढी दरपिढी आपले वडील वडिलां तागाईत चालविले आहे व हालीही चालवितो यामधे रुद्राजी दादो वा दादाजी भूपालराऊ व रंगोजी भूपालराऊ लंबे हे दरम्याने कारकीर्दी खाने अजम वडे हैबतखान यांचे फर्जंद हैबतखान त्याचे कारकीर्दीस सन अरबा असर अलफ त्या सालापासून पैदा होऊनू आपणांसि कुसूर करितातिति त्यांचा व आपला वेव्हार दोनी चारी मोर्तबे जाला असोनु लाईनीच हरकती करून राहात नाहीत हल्ली साहेबास पा॥ मजकूरू अर्जाने जाला आहे आपण साहेबाचा नफराई करितों आणि गणो रुद्र लंबा तो गावातु राहोनू फितवा फादडे करितो तरी साहेबी त्यास हुजूर बोलाउनु खातिरेसी आणोनु ये व तमाम फर्मावला पाहिजे यावरून गणो रुद्र लंबा हुजूर बोलाउनु त्यास खबर पुसिली त्याणे मालूम केले की पा॥ मजकुरीचें देशकुलकर्ण आपली मिरासि आपले वडिली विठल काई-देऊ याचा आजा उखोवा ठेविला होता त्यावरी आपले वडील थोरथोर व्यापार करावयासि गेले ते तागाईत आपले कुलकर्ण विठल काइदेऊ खातो परी कुलकर्ण आपले येसे बोलिला यावरि हाजीर मजालसीस आपणासि पुसिले कीं गणो रुद्र म्हणतो जे आपली मिरासि तरी हे खबर कैसी आहे म्हणोनु आपणासी पुसिले यावरी आपण उभा राहोनु बोलिलो कीं पा॥ मजकुरीचे देस-कुलकर्ण गहदम सालाबाद पिढी दरपिढी आपलीया वडील वडिलापासून मिरासि आपली जोवरी बा॥ साहेबांची पातस्याही तोवरी आपण खातो हे खलक जाहीर आपले हमस्याहि महाल आहेती त्यास व पा॥ मजकुरीचे देसमुख व सेटीये महाजन व गावगना मोकदम व कोने कुटे बलुते आदीकरुन समस्तास जाहीर आहे आपलीया पिढ्या गुदरलिया आहेती यामधें आपणास ठाऊके आहे जे आपला पणजा विठल महादेऊ त्याने कुलकर्ण केले त्याचा फर्जंद लुखो विठल त्याने कुलकर्ण केले त्यास उमरसाले ७० तोवरी न्याला त्याने मरतोवरी कुलकर्ण केले त्याऊपरी आपला बापे कान्हो लुखदेऊ त्याणे कुलकर्ण केले त्यास उमर वरिसे ७५ तोवरी होतो तो जीत असताच आपण विसा वरिसांचा जालो त्या तागाईत कुलकर्ण चालवितों आपणासि उमर हली वरिसे ७० जाली आहेती येसे चालवीत असतां इतुकियामधें कोण्ही लंबा देखिला नाहीं हल्लीं दरम्याने कारकीर्दी ख॥ धाकुटे हैबतखान यांचे वेलेसी लस्कर मुक्काम मौजे खडकी न॥ दौलताबाद तेथें रुद्राजी दामोदर लंबा खाने अजमाचे वंदगीस उभा राहोनु मालुम केले कीं पा॥ सिरवलीचें देसकुलकर्ण आपली मिरासी विठल काईदेऊ आपला ठेवणाईत तो दखल होऊनु चालवितो आपली मिरासि येसा रवा करीम म्हणवुनु मालुम केले त्यावरून खाने अजम आपणासि तलब करून हुजूर नेले यावरी रुद्राजी दामोदर लंबा व आपणासि हुजूर उभे करून

मजालसीस मातबर लोक होते त्यास फर्मांविलें कीं या हरदोजणाची मुनसिफी बरहक करून सांगणे यावरी हजोर मजालसीस रुद्राजी दामोदर लंबा यास खबर पुसता तेणे तकरीर केली येसीजे पाा सिरवलीचे देशकुलकर्ण आपली मिरासि विठल काईदेउ हा आपला ठेवणाईतु दखल होऊनु चालवितो आपली मिरासि येसा रवा करीन म्हणवुनू सदरहू मालुमाती केली होती तेणेच प्रमाणे तकरीर केली यावरी आपणासि पुसतां आपण तकरीर केली येसीजें सदरहु देसकुलकर्ण आपली मिरासी पिढी दर-पिढी आपलीया वडीलवडिलापासून कुलकर्ण चालविलें आहे जोवरी हजरती यांची पातस्याही तोवरी कुलकर्ण चालविले आहे तोवरी लंबे कोण्ही आपण देखिले माहीत मिरासि आपली होये येसे हमस्याही गोही दाखवीन साहेबीं खातिरेसी आणिलें पाहिजे म्हणोनु तकरीर केली यावरी हाजीर म[ जाल ]शीचे लोक बोलिले कीं मिरासिचे कामे आहे यासि आधी तसरुफाती व गोही खातिरेसी आणिले पाहिजे त्यावरून पाा मजकुरासि मुतसील महाल खाने अजमसाहेबाचा मुकासा महाल होते त्या महालीचे देसक हुजूर आले होते त्यांस हुजुरून महालदार पाठऊनू बोलाविले बीता।

देसमूख व देसक पाा सिरवल

देसमूख व देसक पाा पुणा

देसमूख व देसक पाा वाई

देसमूख व देसक ताा गुजण मावळ

देसक काा सासवड

या विलायेतीचे देसमूख व देसकुलकर्णी वा देसक हुजूर बोलाऊनू त्यास पुसतां तीहीं गोही दिधली कीं विठल काईदेऊ याची मिरासि पाो सिरवलीचे देसकुलकर्ण होये पिढी दरपिढी खादले असे हा कदीम मिरासि म्हणोनू आपले वाडिले वडिली सागितल असे रुद्राजी लंबा गैर मिरासि देसकुलकर्णाचा भोगवटा नाही वा याचे वडील वडीलानें कोण्ही चालविले नाही येसी गोही गुदरली यावरी हुजुरूनु खाति-रेसी आणोनू पाा सिरवलीचे देसकुलकर्ण विठला कायेदेऊ याची मिरासि होये येसा महजर व कौल व लुगडी व पाने देऊनू माहालासि बहुडाविले आपण माहा-लासी येऊनू आपली मिरासि कुलकर्ण चालऊ लागलों यावरी तिसरे साली सन सीत असर आलफमधे रुद्राजी दामोदर व बाबाजी भूपालराऊ लंबे हे उभे राहोनू खाने अजम हैबतखान साहेबापासि आपली गैरतीं लाईनी चाला घाली करून खाने आजमाची धरणी पाठउनू आपणासी व आपली लेकुरे बाले व दोस्त बराबत व विले व सालती तमाम जानी हातीचे लोक धरून पाा वाईस नेऊनू तेथे कोटातू राखिले रोज बरोज मार करीत आण पैके (ट)के मागती आपण बोलिलो कीं आपली मवेसी होती ती तुम्ही दस्त केली आतां आपणापासि रुका द्यावयासि नाहीं आपले जीव आहेती ते देऊनू येसा मार करितां आपणापासूनू रुका निनघेच माणुसें व आपण बेहाल मरावे येसे जालों मग आपले बाबे देसमूख पाा वाई वा सेटीचे माहाजन मोदतस लोक मिलोनू खाने अजम साहेबाचे बंदगीस अर्जदास्त लिहिली

की विठल काईदेऊ देसकुलकर्णी पा। सिरवल हा मिरासि याचें कुलकर्णावरी रुद्राजी दामोधर व दादाजी भूपालराऊ लंबे हे उभे राहिले तीही साहेबाचे बंदगीस गैरती घालूनू त्याची लेकुरें बाळें व खेलखाना व दोस्तखराबत दस्त करून आणोनू पा। मजकुरी कोटातू राखोनू मार करिताती तरी याचे माथी काही गुन्हा दिसत नाहीं तरी साहेबी विठल काईदेऊ यास हुजूर नेऊनू याची मुनासिफि केली पाहिजे येसी अर्जदास्त खाने अजम साहेबाचे बंदगीस पाठविली त्यावरून आपणासि हुजूर नेऊनू रुद्राजी दामोधर व दादाजी भूपालराऊ लंबे यांची आपली मुनसिफि आपणा हुजूर खाने अजम खातिरेसी आणोनू लंबे गैर मिरासी येसे मुनसीफदाराचे तोंडे जालें त्यावरून दुरी केले आणि आपणासि लुगडी व पाने व महजर देऊनू माहालीसि पाठविलें व आपली मवेसी व गुरे ढोरे वस्तभाव जे काही नेले होतें ते तमाम जराबजरा आपले देविलें आपण माहालास येऊनू आपले कुलकर्ण चालऊ लागलों लंबे मजकूर लस्करामधें राहोनू ततबीर करीत आहेती येसीयामधें सन समान असर अलफ मुलूक खुलेखालें हजरती साहेबास दिधला विलायेतीस तमाम काबिजाती चालिलीया परगणा मजकुरासी काजी हुसेन ठाणेदार पाठविले ते वस्ती दराफती करून दतोवा लंबा याणे काजी आजमाची मुलाखती घेऊनू मालूम केले की पा। सिरवलीचे देसकुलकर्ण आपली मिरासि आपण कदीम मिरासि आपले वडिली विठल कायेदेऊ याचा आजा लुखोवा ठेऊनू आपण थोर थोर व्यापार करावयासि गेले ते तागाईत विठोबा कुलकर्ण खातो ये बाबे आपण खाजे अजम धाकुटे हैबतखान याचे कारकीर्दीस दोनी वेळा उभे राहिलों तिही आपली मुनसिफि बरहक करून येह तमाम केला नाही आतां हाली मुलूक हजरती

साहेबास अर्जानी जाला आहे आपली बाद्दी होईल म्हणोनू आपण बहूत खूशनूद जालों आहों तरी साहेबीं आपली दादी केली पाहिजे म्हणोनू मालूम केले यावरी काजी अजम बोलिले कीं आपण माहालास पैवस्ता जालीया वरी खातिरेसी आणोनू येसे बोलोनू त्यास रजा दिधली यावरी काजी अजम स्वार होऊनू माहालास पैवस्ता जाले देसक व आपण भेटलों यावरी दतोवा लंबा पैदा होऊनू आपलीया कुलकर्णासी हजरती साहेबाची दुराई दिधली कीं कुलकर्ण आपलें तुम्हा व आपला निवाडा होई तोवरी लेहो नको म्हणोनू दोही दिधली यावरी काजी अजम ठाणदार ईही आपणासि खबर पुसिली कीं हा काये अमल आहे यावरी आपण बोलिलों कीं देसकुलकर्ण आपली मिरासि पिढी दरपिढी आपलीया वडिलापासून जोवरी हजरती

साहेबांची पातस्याही त्या तागाईत कुलकर्ण चालवितो तोवरी लंबे कोण्ही देखिले नाहीत दरम्याने कारकीर्दी खाने अजम धाकुटे हैबतखान लस्कर मुकाम खर्डा तेथे रुद्राजी दामोधर व दादाजी भूपालराऊ लंबे हे दोनी वेळा उभे राहिले होते आपण त्याचेच कारकीर्दीस त्यासी वेव्हार सागितला वेव्हार करितां रुद्राजी

दादो व दादाजी भूपालराऊ लंबे हे खोटे जाले आपण खरा आलों ये थावेचे महजर खाने अजमाचे सिकीयाचे आपणापासि आहेती व हाली आपले कुलकर्ण चालवितो व मागे पिढीया गुदरलीया आहेती तोवरी लंबे कोण्ही देखिले नाहीत मिरासि आपली येसे खलक जाहीर आहे आतां हाली मुलूक साहेबास अर्जानी जाला आहे साहेब अमीर माहालास आले आहेती जे रजा फर्मावील ते सिरावरी येसे बोलिलों यावरी काजी अजम बोलिले कीं आम्हास मुलूक नवा जाला आहे व आपणही नवेच काबिजातीस आलों आहों पेसजीचा अमल आपणास काही दखल नाहीं दतोवा लंबा मजकुर हा उभा राहिला आहे जे आपण कदीम मिरासी हैबतखानाचे कारकिर्दीस आपली मुनसिफी बरहक केली नाहीं ह्मणौनू हाली तुज दोही दिधली आहे आपण माहाली तुम्हा दोघांची मुनसिफी खातिरेसी आणावी तरी मलीक अजम साहेबाची साहेबी येकवजा आहे तू आपली तसरुफाती बहुता दिसांची सांगनोस आणि दतोवा लंबा म्हणतो जे आपले वडिलीं तुह्मा आजा ठेविला होता भांडणाची बुनादी खातिरे आणिता हैबतखानाचे कारकिर्दीपासून लंबे भांडताती येसें दोघाचे तकरीरे वरून कलते तरी ममलकत मदारीसाहेब विसां वरिसांचा भोगवटा मोडीत नाहीत या अमलास तरी बहूत दिस दिसताती या कारणे हे मुनसिफी माहाली निवाडा करिता नये व साहेबांचा दोही असता तुजही कुलकर्ण चालऊ नये आता कुलकर्ण अमानत ठेऊनू तुम्ही हर दो वादी हुजूर जाऊनू निवाडा करणे हुजूरून ज्यास कुलकर्ण फर्मावितील तो खाईल येसी रजा फर्माविली कुलकर्ण आमानत केले मग आपण स्वार होऊनू मुकाम फतेनगरास जाऊनू ममलकत मदारी साहेबाचे बंदगीस दादनीस उभा राहोनू आपला अहवाल मालूम केला यावरी साहेबी रजा फर्माविली कीं खातिरेसी आणोनू विले देखोन त्यावरून आपण हुजूर राहिलों यावरी पा। मजकुरीचे देसक साहेबाचे बंदगीस आले ते वस्ती रुद्राजी दादो व दादाजी भूपालराऊ व रगोजी भूपालराऊ लंबे उभे राहिले यावरी आपण मागतेन दादनीस उभा राहोनू मालूम केले कीं आपले वादी आले आहेती त्यावरून लंबे मजकुरास हुजूर आणोनू आपली व त्याची मुनसिफि खातिरेसी आणिली आणि रजा फर्माविली कीं तुम्ही हर दो वादी हुजूर असणे हुजूरून माहालदार पाठऊनू हमश्याही माहाल आहेती तेथील गोही आणऊनू आणि विले लाऊनू येसी रजा फर्माउनू सिरवलासी मुतसील माहाल ४ नेमिले ता। पा। सुपे पा। पुणा कर्याती सासवड ता। खेडेबारे

या माहालास खुर्दखते लेहोनू माहालदार रवाना केले ते जाऊनू सदरहू माहालीचे कारकून व देसमुख व देसक याचा अर्जदास्ता गोहीच्या घेऊनू हुजूर आले त्यावरून आपणास व लंबे यास हुजूर नेऊनू माहालदारापासि आर्दासा सडीच्या होतीया त्या आणऊनू आपणा हुजूर लाखाटे तोडिले आणि दबिरास रजा फर्माऊनू

येक बयेक आर्दासा वाचिलीया आणि रजा फर्माविली की तीन माहाल पुणे व सुपे व सासवड सडी आहे की विठल काईदेऊ तीन पिढीया कुलकर्ण करितो लंबे तिघेही कधी केले नाहीं खेडेबाराचा महजर कीं विठल काईदेऊ तीन पिढीया खातो परी मिरासी लंबीयाची होये येसी गोही आहे तरी तीन गोही आहेती तेच मसमू असेती विठल काईदेऊ मिरासी होये लंबे दुरी करून विठल काईदेऊ यास फर्मान बसिके खास व खुर्दखत करून देणे म्हणौनू खोज दिला व रास परवानगी दिधली त्यावरून फर्मान व सुर्दखते दिधली आहेती तेथील मजकूर.

" आज दिवाण रुस्तुमखाने खास बजानेबू कारकुनानी व देसमुखानी व मोकदमानी पा। सिरवल बिहानंद सुा। तिसा असर अलफ विठल काईदेऊ कुलकर्णी पा। मजकुर व रुद्राजी दादो व दादाजी भूपालराऊ व रघोजी भूपालराऊ लंबे देसकुलकर्णाबदल भाडत हुजूर आले होते यावरी हुजूरून माहालदार व सुर्दखते माहाल ४ ता। पा। सुपे व पा। पुणे व कयाती सासवड व ता। खेडेबारें येसे पाठविले होते तेथूनू सडी आलीया तीन माहाल पुणे व सुपे व सासवड की विठल काइदेऊ पिढी या तीन देसकुलकर्ण करितो लंबे तिघे कधीं केले नाहीं खेडेबाराचा महजर कीं विठल काइदेऊ तीन पिढीया खातो परी मिरासी लंब्याची होये माहाजर आलीयावरून लंबे मजकूर दुरी केले विठल काइदेऊ करार केला पा। खोज दिलावरखान दादनी तिसा असर अलफ छ २५ माहे जमादिलाखर तालीक घेऊनू असली परतोनू देणे मोर्तब सुद छ १९ रजबू सबा इसरेन अलफ दफतरदार पा। हुजूरू येणे प्रमाणे हजरती साहेबाचा फर्मान बसिके खास व सुर्दखत मुस्तेद जाले यावरी आपण मागतेन दादनीस उभा राहोनू मालूम केले की आपण मिरासि पा। सिरवलीचे देसकुलकर्ण आपली मिरासी आपणापासि हजरती

अजरख्तखाने सुदायेबद मलीकसके मलीक अंबर खुलीद्याम दौलतहू व बजानीबू कारकुनानी हाल व इस्तकबाल व देसमुखानी व मोकदमानी व रयानि पा। सिरवल बिहानद सुा। तिसा असर अलफ विठल काईदेऊ देसकुलकर्णी व रुद्राजी दादो व दादाजी भूपालराऊ व रगोजी भूपालराऊ लंबे पा। मजकुरीच्या देसकुलकर्णा बदल भाडत हुजूर आले होते येबदल हुजुरून माहालदार व सूर्दखते ४ पा। पुणा व पा। सुपे व सासवड व खेडेबारें येसे पाठविले होते तेथूनू सडी आलीया बी ता। माहाल ३ पा। पुणा व पा। सुपे व सासवड की विठल काईदेऊ विठल काईदेऊ पिढीया तीन देसकुलकर्ण करितो लंबे तिघे कधी केले नाहीं व खेडेबाराचा माहाजर कीं विठल काईदेऊ तीन पिढीया खातो परी मिरासी लंब्याची होये येसा महजर आले यावरून लंबे मजकूर दुरी केले विठल काईदेऊ करार केला यास फर्मान व सूर्दखत हुजती करून दीजे पा। खोज दिलावर दादनी छ २५ जमादिलाखर तालीक घेऊनू असली दीजे मोर्तब सुद तेरीख २५ जमादिलाखर

येणेप्रमाणे हजरती* साहेबाचा फर्मान वसिके खास व साहेबाचे खुर्दखत आसोनु माहालीं दुसरा कुलकर्ण करितो तरी आपले कुलकर्ण आपले दुमाला करविले पाहिजे त्या वरून मलीक अजम मलीक अमजदल मुलूक मुकासाई पा। मजकूर यांचा हेजीबु खाडो विश्णू साहेबी हुजुर बोलाऊनु ताकीद केली जे बिठल काईदेऊ देसकुलकर्णी पा। सिरवल याच्या कुलकर्णाचा निवाडा जाला याचे वादी लंबे खोटे जाले नफर मजकुरापासि फर्मान व खुर्दखत असोनु या पासूनु कुलकर्णाचे काम घेत नाहीत काये माना असे आतां आपले खुर्दखत देऊनु याचे कुलकर्ण याचे दुमालां करणे म्हणोनु खाडो विस्णूस ताकीद केली तेणे येऊनु मा। अजम अमजदल मुलूक मुकासाई यास खबर मालूम केली त्यावरून खुर्दखत छ १० रमजान दिधलें तेथें मजमू कीं अज रस्तखाने खुदायेवद मलीक अजम अमजदल मुलूक पुणा दौलतहू बिजानेबू कारकुनानी हाल व इस्तकबाल व देसमुखानी व सेटीये माहाजनानी व मोकदमानी पा। सिरवल बिदानद सु॥ इसैन अलफ छ ९ रमजान हजरती ममलकत मदारी साहेबू दादनीस बैसले होते येसीयामधें बिठल काईदेऊ देसकुलकर्णी पा। मजकूर उभा राहिला जे आपण मिरासी आपले देसकुलकर्ण पा। मजकुरीचें आहे आपणापासि हजरतीचा फर्मान व हजरती साहेयाचें खूर्दखत आहे आणि हाली दुसरा कुलकर्ण करितो आपले आपणास देववणे यावरून हजरती ममलकत मदारी साहेबी मा। आनाम खाडो विस्णु हेजीबु यास बोलाऊनु रजा फर्माविली जे याचे कुलकर्ण आहे यापासि फर्मान व खुर्दखते असोनु यापासूनु कुलकर्णाचें काम कां घेत नाहीत आतां तुम्ही आपले खुर्दखत देऊनु नफर मजकुरास माहालासी पाठवा यापासूनु कुलकर्णाचें काम घेत जाणे म्हणोनु रजा हेजीबु अवघा अमल पेसजीचा हजरत ममलकत मदारी साहेबांचे बंदगीस मालूम केला रजा जाहाली जे खुर्दखत देऊनु माहालासि पाठवणे बा। रजा बिठल काईदेऊ देसकुलकर्णी पा। मजकुरू माहालासि पाठविला असे यापासूनु पा। मजकुरीच्या देसकुलकर्णाचें काम घेत जाणे तालीक घेऊनु असली ना। मजकुरास फिराऊनु दीजे म्हणोनु खुर्दखत दिधले यावरी सदरहू फर्मान व ममलकत मदारी साहेबांचे खुर्दखत व मलीक अजम अमजदल मुलूक साहेब मुकासाई याचे खुर्दखत येसे कागद देऊनु आपला वडील फर्जंद रामाजी माहालासी पाठविला तो माहालासि आला तव लंबे मजकुरू गंगाजि विस्वनाथ ठाणेदार माहाली होते त्याचे आग निघोनु हरकती केली व त्यासि लाऊनु देऊनु आपलीया वाडीयाच्या भिती पाडिलीया व आपलीया वाडीयामधे अड आहे त्याचे चिरे काढून नेवविले आकस करू लागले त्यावरून आपला फर्जंद रामाजी फत्तेनगरास आपणापासि आला यावरी आपण

* येथें मागील पृष्ठावरच्या डाव्या रकान्यांतील शेवटच्या ५ ओळी वाचाव्या. त्या तेथें चुकून छापल्या गेल्या आहेत.

मागतेन ममलकत मदारी साहेबाचे बंदगीस दाद्नीस उभा राहोनू मालूम केले त्यावरून साहेबी खुर्दखत देखिले तेथील मजमू अज जानीबू मा। अखर ता। कारकुनानी प्रा। सिरवल बिदानद् सु॥ इ [ स ] रैन अलफ विठल कायेदेऊ देसकुलकर्णी प्रा। मजकुर हुजूर मालुम केले जे आपले देसकुलकर्ण आहे पेसजी रंगोजी भूपालराऊ लंबे आणिक नफर दोघ लंबे भांडत होते ते बाबे निवाडेयाचे खुर्दखत व फर्मान आपणापासि दिधले आहे यावरि रंगोजी भूपालराऊ महालासी जाऊनु हरकत केली आपलीया घराच्या भिंती पाडविलीया व अडाचे चिरे काढिले म्हणोनु मालूम केले यावरून रंगोजी भूपालराऊ हुजूर आणिला होता त्यास पुसतां सदरहू नाट गेला जे यैसा अमल आपण केला नाही म्हणोनु तरी याची तहकिकी करून सही असेल तरी त्यास ताकीद करणे बा। फर्मान व खुर्दखत अमल कीजे निवडीया अमलास हरकती करून मालुमातीचे खुर्दखत आणील तरी त्यास मवसर पाहोनु गुन्हेगारी घेणे मफलीस असेल पाच से जेरबंद मारणे प्रा। रामाजी धोंडो सबनीस दाद्नी छ. २३ सवाल मोर्तबू यैसे खुर्दखत जालें यावरी रंगोजी भूपालराऊ लंबा जाऊनु काजी हाकीम शरापासी उभा राहोनु इलामी पाठऊनु आपणास बोलाऊनु नेलें हाकीम शरा आपणा हुजूरू दोघांचा वेव्हार तमाम खातिरेसी आणिला आणि हजरती ममलकत मदारी साहेबास मालूम केले त्यावरून आपणासि खुर्दखत दिधले यैसे तेथील मजमू की अज जानीबु मा। अखरता कारकुनानी व देशमुखानी परगणे सिरवळ बिदानद् सु॥ इहिदे इसरैन अलफ विठल कायेदेऊ देसकुळकर्णी प्रा। मजकुर मालूम केले जे प्रा। मजकुरीचे देसकुलकर्ण आ [ प ] ली मिरासी गहदम सालाबाद् पिढी दरपिढी आजी तागाईत आपण खातों दरीवकस्थ रूद्राजी दादो व बाबाजी व रघोजी भूपालराऊ लंबे हरकती करून कुलकर्णा बा। हुजूर भांडत आले हुजुरुन त्याची व आपली बरहक मुनसिफी करून सदरहु नफर मजकुरु खोटे करून दुरी केले आपणासि कुलकर्णे सालाबाद् बरहुकुम करार करून निवाड्याचा फर्मान व खुर्दखत दिधलें यैसे असोनु मागतीने लाईनी हरकती करिताती मुकासाई त्याची रया करितातीं म्हणोनु तरी हुजूरून निवाडा होऊनु खुर्दखत व फर्मान सादीर असोन हरकती करणे काये अंदाजा आहे आतां निवाडा होऊनु फर्मान व खुर्दखत असे तेणे बरहुकूम कुलकर्णपणाचे काम विठल मजकुरापासून घेत जाणे निवाडलियास ते हरकतील त्यास ताकीद कीजे तालीक घेऊनु असली फिराऊनु दीजे प्रा। काजी दाद्नी छ. २९ जिल्हेजु पेसजी निवाडा होऊनु फर्मान व खुर्दखत सादर आहे तणे बरहुकूम अमल कीजे निवडलिया अमलास हरकती करील त्यास मवसर पाहोनु गुन्हेगारी घेणे मफलीस असेल तरी पाच से जेरबंद मारणे मोर्तबु तेरीख २९ जिल्हेजु सदरहु फर्मान व खुर्दखत येकबयेक घेऊनु आपण महालासी आलों महाली कृस्णाजि रुद्र ठाणेदार होते त्यास भेटोनू तमाम कागद दाखविले तीही तेच वर्की काजी

हकीमशरा व देसमुख व सेटीये महाजन व देसक बोलाऊनु हजरती साहेबाचा फर्मान व ममलकत मदारी साहेबाची खुर्दखते सदरहू किते ३ व मुकासायी यांचे खुर्दखत येसे पाहोनु निवाडा मनास आणोनु अर्जदास्त छ ४ सफर लेहोनु हुजूर पाठविली तेथील मजमू येसी की सदरहू फर्मान व खुर्दखते वाचुनु तेथील मजमू येकबयेक मनास आणोनु देसमुख व देसक बोलिले की दोघा जणास हजरती साहेबांचे बंदगीस पाठविणे त्यावरून हरदो जणास वाटे लाविले त्यावरी काजी हकीमशरा बोलिले की जे फर्मान व खूर्दखत निवाडा हुजूर जाला आहे बरहक मुनसिफी करून विठल कायेदेऊ देसकुलकर्णी पा। मजकुर करार करून रुद्राजी दादो व दादाजी भूपालराऊ व रंगोजी भूपालराऊ लंबे दुरा केले येसे आसोनु विठल कायेदेऊ देसकुलकर्णी पा। मजकुरासी हुजुर पाठवणे येसी रजा नाही रजा आहे जे विठल कायेदेऊ मजकुरापासोनु देसकुलकर्णचे काम घेणे त्यावरून पाने दिधली देसकुलकर्णाचे काम फर्माविलें रंगोजी भूपालराऊ व गणो रुद्र लंबे हरदो जणास बाहेरी घातले बंदगी रोसन होये म्हणौनु सदरहु प्रमाणे फर्मान व खुर्दखताची मजमू घालुनु अर्जदास्त लिहिली आहे येसा अमल असोनु लंबे मजकुर हरकती करु राहात नाहीत तरी साहेबीं बरहक निवाडा खातिरेसी आणोनु आपला येह तमाम फर्माविला पाहिजे येसी विठल कायेदेऊ देसकुलकर्णी पत्र सिरवल मालुमाती केली यावरून गणो रुद्र लंबा महाली हजीर होता त्यास सदरहू हजीर मजालसीस बोलाऊनु पुसिलें की तुज व विठल कायेदेऊ मजकुरासि कुलकर्णाचा वेव्हार कैसा आहे तो सागणे यावरून गणो रुद्र लंबा बोलिला जे पा। मजकुरीचे देसकुलकर्ण आपली मिरासि आपले वडील चालवीत होते तिही विठल कायेदेऊ याचा आजा ठेविला आणि आपण व्यापार करावयासि गेले त्या तागाईत कुलकर्ण विठल कायेदेऊ मजकूर खातो याचा आजा व बाप आपले वडिलांचे ठेवणाईत म्हणवीत असे की येसे बहुत दिवस कुलकर्ण केलें यावरी आपलीया वडीलाची मिरासी म्हणोनु आपण उभे राहिलो आहो साहेबी बरहक मुनसीफ करणे येसीया हरदोनाच्या तकरीरा खातिरेसी आणोनु हजरती आगा अजम साहेबु बोलिले जे हरदो नफरा-पासि पेसजीचे भोगवटेयाचे कागद कैसे आहेती व भोगवटा तसरुफाती कोणास कैसी आहे व हक हमशाही गोही कैसी देताती हे तहकीक खातिरेसी आणोनु सागणे म्हणोनु सदरहू हजीर मजालसीचे लोकांस फर्माविलें त्यावरून हजीर मजालसी लोक होते तीही हरदोजणाची मुनसिफी खातिरेसी आणितां विठल कायेदेऊ देसकुलकर्णी पा। सिरवल याचा भोगवटा विचारितां हमशाही पा। मजकुरीचे मिरासि लोक बहुत उमरेचे म्हातारे जे हजीर होते त्यास व बाजे मिरासीयास पुसता तिही सांगितले की आपले वडिली आपणासी सांगितले आहे जे विठल कायेदेऊ याचे वडिली

कुलकर्ण केले आहे व आपले उमरेमधे तरी विठोबाचा बाप कान्होबा बहुता दिवसाचा म्हातारा होये तोवरी त्याणे कुलकर्ण केले त्यावरी विठोबा विसा वरिसापासुनु चालविती यासही हली वरीस ७० जाली आहेती इतुकियामधे कोण्ही लंबा देखिला नाहीं याचे भाडण खाने अंजम हैबतखानाचे कारकीर्दीमधें धाकुटे हैबत याचे कारकीर्दीस सन अरबा असर अलफ लस्कर मुक्काम मौजे खडकी ना। दौलताबाद तेथे रुद्राजी दामोधर लंबा मिरासी आपण म्हणोनु उभा राहिला त्यापासूनु जोवरी हजरती ममलकत मदारीं साहेबाची कारकीर्दी तोवरी पैदा जाले आहेती या पलीकडे लंबे आम्हांस ठावूक नाहीत यैसे सदरहू मिरासि लोक बोलिले यावरी हजीर मजालसी बोलिले जें खा। हैबतखानाचे कारकीर्दीपासूनु हरदो जणाचे वेव्हार जाले आहेती ते कागद् कोणापासि कैसे आहेती ते येन कागद् आणवावे म्हणोनु गणो रुद्र लंबा यास पुसता तो काही कागद् न दाखवचि मग विठोबास पुशिले की तुजपासी निवाड्याचे कागद् कैसे आहेती ते असल कागद् सिके सनदेशी आणी त्यावरून विठल कायेदेऊ कागद् घेऊनु आला कारकीर्दी हैबतखान महजर किते २ व कारकीर्दी ममलकत मदारीसाहेब फर्मान व बखिके खास व खुर्दखते ममलकत मदारी साहेबाची किते ३ व अमजदल मुलूक मुकासाई याचे खुर्दखत येक यैसे असल निवाडीयाचे कागद् आणिले यावरी हजीर मजालसी मुनसिफी खातिरेसी आणिली ते तमाम बयाजवार अगा अजम साहेबाचे बंदगीस मालुम करून विठोबाचे कागद् पुढे ठेविले साहेबी येक बयेक कागद् वाचून पाहिले व फर्माना वरी पारसी लिहिली आहे ते वाचिली यावरी गणो रुद्रासी पुसिले की तुजपासि काये हुजती आहे ते आणि यावरी गणो रुद्र काही कागद् न दखवीच जबानी तकरीर सदरहू बोलिला होता तेच सांगो लागला की विठोबाचा आजा आपले वडिली ठेविला होता यैसे जबानी बोलिला परी कागद् काही न दखवीच त्यावरून अगा अजम अगा साहेब बोलिले जे लंबे हैबतखानाचे कारकीर्दी तागाईत भाडतो पेसजी काही इसकील दिसत नाही अगर लंबियापासी निवाडीयाची हुजती नाही व हैबतखानाचे कारकीर्दीस दोनी वरूता निवाडा जाला तेथे लिहिजे आहे जे विठल कायेदेऊ देसकुलकर्णी मिरासी खरा लंबे खोटे त्यावरी ममलकत मदारी मलिके अजम अपणा हुजूर मुनसिफी खातिरेसी अणऊन सिरवलास पुसतील महाल ४ पा। पुणा व पा। सुपा का। सासवड व ता। खेडेबारे या महालास खुर्दखते व महालदार पाठौनु महालो महालीच्या सही गोही आणौनु फतूर निवाडा करून लंबे खोटे केले विठल कायेदेऊ खरा मिरासि यैसे निवाड्याचे [का] गद् फर्मान बखिके खास व आपली खुर्दखते कितीन व मुकासायासि ताकीद् करून देविले खुर्दखत १ यैसे कागद् सिके सनदेशी आहेती व महाली कृस्णाजी रुद्र ठाणेदार याणे सदरहू कागदावरून काजी हकीमशरा व

देसमूख व सेटी महाजन व बाजे मिरासी बहुत उमरेचे मोखतस लोक मेलवुनु मुनसिफी खातिरेसी आणिता ते मजालसीस लंबे गैर मिरासी खोटे झोड येसें जालें त्यावरून रगोजी भूपालराऊ व गणो रुद्र लंबे बाहेरी घातले येसी अर्जदस्त हुजूर लिहिली आहे विठल कायेदेऊ मिरासी खरा येसे हकीम खरा व बाजे मिरासीदाराचे मालुमातीन जाले त्यावरून पाने देऊनु कुलकर्ण विठल कायेदेऊ मजकुरासी फर्माविले व हली हजीर मजालसीस मुनसिफी खातिरेसी आणिता मोद्तास मिरासी बहुत उमरेचे सांगताती जे हैबतखानाचे कारकीर्दीमधें धाकुटे हैबतखानाचे कारकीर्दीस सन आरबामधे लस्कर मुकाम खडकी ना। दौलताबाद तेथें रुद्राजी दामोद्र लंबा उभा राहिला या पलीकडे आपणास दखल नाहीत येसे सागताती तरी या बोलास हिसेबु पाहता साले ८।९ आठ अगर नव जाली या पलीकडे कोण्ही इसकील सागत नाहीत व हली गणो रुद्र हजीर आहे यास पुसता यापासी काही कागदपत्र नाही जबानीचे भांडण भांडतो यावरून रोसन जाले जे लंबे खोटे झोडाई करिताती यास व कुलकर्णीस काही निसबती नाही येसे बहुताचे माकुलतीने जाले त्यावरून गणो रुद्र लंबा दुरी केला असे विठल काईदेऊ मिरासी खरा यास पा। सिरवलीचे देसकुलकर्ण दुमाला करून पाने देऊनू महजर करून दिधला असे औलाद व अफला-[ द ] कुलकर्ण खावूनु सुखे असीजे लंबे खोटे यास काही निसबती नाही पेस्तर जो लंबा उभा राहेल तो दिवाणाचा गुन्हेगार +

---

१६२१

ले. १४ शके १५४३ कार्तिक शु॥ ७

जनाब खलकबाद् ठाणदार व कारकुनानी व देसमुखानी पा। सिरवल यास रायाराव सलाम सु॥ इसने इसरैन अलफ पा। मजकुरीच्या देसकुलकर्णाचा मुशाहिरा जो काही कारकीर्द हैब [ त ] खान चालिले तेणे प्रमाणे कुलकर्णी मजकुरास गावगना ताकीद करून देववणे मोर्तबू छ ५ माहे जिलहेज

---

१६२१

ले. १५ ( फारशी शिक्का ) शके १५४३ मार्गशीर्ष वा। ९

तुकाई देसमुखीण व ताम्हाजी निगडा पा। सिरवल मालूम बाद् सु॥ इसने आसरीन अलफ तुम्ही आपाजीची आर्दास पाठविली त्याचा जाब पाठविला आहे तो कटकास पाठवणे त्याणे विठल कायेदेऊ देसकुलकरणी याचे बाबे लिहीले तरी तुम्हापासूनु व तुमचे वंसी ब्राह्मणहत्या सात पिढीया जाली नाही पुढेही घडेना ये बाबे आमचा खातिरजमा आहे व धायेगुडे याचे ये बाबे गुमान धरावे तरी विठल

---

+ सबंद ओळ न ओढतां एक दोन शब्दांना मिळून, शब्द लिहिल्यानंतर, लहान ओळी काढल्या आहेत.

कायेदेऊ यामधे व धायेगुडे यामधे सात पिढीया तोवरी मैत्री आहे त्यापासूनु येसा आमल घडेना हे आम्हास ठाउके आहे हा आमल कान्हीया पासून घडला आहे तरी त्यासी येसे होईल की त्याची मेदवुन्याद न ऱ्हाये तुम्ही विठोबावरी जैसी कृपा करीत होते ते तैसीच रामाजी विठलावरी करीत जाणे छ २३ माहे मोहरम

फारशी शिक्का

---

१६२१

ले. १६ शके १५४३ मार्गशीर्ष वा। १०

जनाब सलद ठाणदार व कारकून पा। सिरवल अजी रायाराऊ सलाम सु॥ इसने अशरीन अलफ रामाजी विठल देसकुलकर्णी पा मा। हुजूर येऊनू मालूम केले जे आपला देसकुलकर्णाचा मुशाहिरा व हक लाजिमा सालाबाद कारकीर्दी दर कारकीर्दी चालिला आहे तेणे प्रमाणे सुर्दसत होये म्हणौनु तरी देसकुलकर्णाचा हक लाजीमा व मुशाहिरा सालाबाद प्रमाणे कारकीर्दी दर कारकीर्दी चालिला असेल तेणे प्रमाणे रामाजी विठलाचे दुमाले कीजे तालीक घेऊनु असल फिराऊनु दीजे छ २४ माहे मोहरम.

---

१६२१

ले. १७ शके १५४३ मार्गशीर्ष वा। १०

जनाब सलक यद ठाणदार व कारकून पा। सिरवला यासि रायाराऊ सलाम सु॥ सन इसने आसरीन आलफ रामाजी विठल देसकुलकर्णी पा। मजकूर हुजूर येऊन मालूम केले जे विठल कायेदेऊ आपला बाप देसकुलकर्ण चालवीत आसता आपणास जकाती खरीद फरोक्त सीव घोडे व बादी हरबाब बैल व म्हैसी व गला व हरयेक खरीद फरोख्त जिनस माफ तागाईतु कारकीर्दी दर कारकीर्दी चालिली आहे * हाली आपला बाप विठल कायेदेऊ यासी आकस कोसीस करून गुमखुदपणे मारा करून जिवे मारिले आपणास सदरहू प्रमाणे जकाती खरीद फरोख्तही माफ येसे सुर्दसत देणे म्हणौऊनु तरी रामाजी ... ... ... ... पा। मजकूर सदरहू प्रमाणे खरीद फरोख्त करील यासी जकाती माफ केली आसे दरहर साल सुर्दसताचा उजूर न कीजे तालीक लेहून घेऊनु आसल परतून दीजे मो ( फारशी मोर्तब ) तेरीख २४ माहे मोहरम

---

ले. १८ शके १५४३ मार्गशीर्ष वा। १०

आपाजी फर्जंद मल्हारजी देसमूख पा। सिरवल मालूम बाद खुा। इसने इसरैन अलफ अर्दास पाठविली मालूम जाली लिहीले की आपले वऱ्हाड करून बंद-

---

* येथें बाजूस फारशी शिक्का आहे.

गीस येईन मालूम जाले बहुत बरे वऱ्हाड करून येणें व विठल काईदेव देसकु-लकर्णी याचे बाबे लिहिले तरी येकीन आहे तरी तो तुमचा देसकुलकर्णी व तुम्हा पासूनु व तुमचे वेली वंसी ब्रह्महत्या घडली नाही पुढेंही घडेना ये बाबे आमचा खातीरजमा आहे व धायेगुडीयाची गुमान धरावी तरी विठल काइदेऊ यामधे व धायेगुडीयामधे सात पीढीया तोवरी मैत्री आहे त्याहीपासून येसा अमल घडेना हा आमल कान्होवाने केला आहे त्यास येसे होईल की त्याची मेद्‌बुन्याद न होये तुम्ही विठोबावरी जैसी कृपा करीत होतेती तैसीच रामाजी विठलावरी करीत जाईजे छ २४ माहे मोहरम

---

१६२१

ले. १९ शके १५४३ फाल्गुन वा। २

बिहुजूर हाजीर मज्यालसी पा। सिरवल छ १६ माहे रबिलाखरू

| | |
|---|---|
| विस्वासराऊ ( फारशी शिक्का ) | खलकबाद ठाणेदार पा। मजकूर |
| कोनेरीपंत मजमूदार बी॥ उ | ( फारशी शिक्का ) |
| खखसेटी व विठलसेटी सेटी कसबे मजकूर | आपाजी फर्जंद मल्हारजी देसमूख व तुकाई देसमूखीण पा। मजकूर |
| सुराजी मोकदम नाहावी | हसम नाईक ठाणे पा। मजकूर |
| बाऊजी आडा | गणोजी माईगुडा चौगुला |
| गोमाजी गुलवा | धाऊजी + + बालाजी पारगा |
| धाकोजी कावला | बाजी खाडिगा |
| दाऊजी पाचा | तान्हाजी महीदकर |
| रखोजी माडिका | विठल जोसी माडका |
| नाव सुतार व कान्हा सुतार | नाऊ वाठा व यन वाठा व काऊ वाठा परीट* |
| जान दारणा गुरव व वाल दारणा गुरव | |

---

१६२३

ले २० १५४५ वैशाख शु. ११

( पहिला भाग गहाळ )

...... कसबा मजकूर [ सु॥ ] सलास इशरैन अलफ बा। खुर्दखत रख्तखाने मोकरम छ २६ जमादिलाखर पैवस्तगी छ + रजब सादीर आहाले तेथे रजा ( जे ) रामाजी विठल देसकुलकर्णी आपली मिरासी आपला बाप विठल काइदेऊ चालवीत होता त्यासी आकस कोसीस करून गुमसूद + + मारा करून जिवे मारिला यावरी आपणासी मखुरल रायाराऊ हुजूर बोलाउनु तश्रीफ देउनु सरफराज

---

* या पुढील मजकूर वेळेवर हाती आला नाहीं सबब येथें दिला नाहीं.

करून आपली मिरासी आपले हुमाला केली यावरी आपण बोलिलो जे आपण जनोबदार आहे आपणासी देसकुलकर्णाचा हक पुरत नाही व आपला बाप मयेत जाला याकरितां बहुत फिकीरजादा जालो आहे तरी साहेबी नजर अनायेत करून आपणासी काही इनाम मन्हामती केला पाहिजे म्हणउनु आपण रायारायासी अर्ज केला यावरी तीही अपणावरी नजर ठेविली की याचा बाप मारिला गेला व आपण नफर कीर्दी मामुरीचा दौलतखोह आहे म्हणउनु आपणासि इनाम अजरा मन्हामती दर सवाद् कसबे मजकूर बा। सुर्दसत बि तेरीख २४ माहे मोहरम सु॥ इसने इशरईन अलफ जमीन चावर येक रास १ बेक बि त॥

सेत वडाचे नजीक नागझरी चावर ०॥० सेतमलेखालील नजीक खुकविहिरा चावर ०॥०

देखील नख्तयाती व माहासूल व पायेपोसी व बाजे पटी कुलबाब कुलकानु दिल्हे आहे येणेप्रमाणे चालिले असे येसियास पा। मजकूर साहेबास .मुकासा अर्जानी जाला माहाली कारकून ताजिया खुर्दसताचा उजूर करिताती सुर्दसत होये मालूम जाले रामाजी विठल देसकुलकर्णी पा। मजकूर याचा बाप मारिला गेला आहे व नफर मजकूर दिवाण नफर कीर्दी मामुरीचा आहे अजी सबब यासी इनामतीं दर सवाद् कसबे मजकूर जमीन चावर १ बितपशील

सेत वडाचे नजीक नागझरी चावर नीम ०॥० सेत माडेखालील नजीक खुकविहीरा चावर नीम ०॥०

दे॥ नख्तयाती माहासूल व पायेपोसी व बाब बाजे पटी कुलबाब कुलकानु ब॥ हुजती रायाराऊ त॥ सन इसने तसरुफाती व भोगवटा चालिले असे येणेप्रमाणे मोकरर केले असे अवलाद् अफलाद् चालवणे दरहर साल ताजिया सुर्दसताचे उजूर न करणे तुम्ही तालीक घेउनु दफ्तरी विले लाऊनु असली सुर्दसत नफर मजकुरापासी फिराउनु देणे उजूर न करणे म्हणउनु रजा रजेबरहुकुम रामाजी विठल देसकुलकर्णी पा। मजकूर यासी इनाम जमीन चावर १ येक बि त॥

सेतवडाचे नजीक नागझरी चावर नीम ०॥० सेत माडेखालील नजीक खुकविहीरा चावर नीम ०॥०

ब॥ नख्तयाती व माहासूल व पायेपासी व बाजे पटी कुलबाब कुलकानु दिधले असे तसरुफाती भोगवटा चालिले असेल तेणे प्रमाणे हुमाला कीजे अवलाद् अफलाद् चालवीजे दरहर साल सुर्दसताचा उजूर न कीजे तालीक घेऊन असली फिराऊन दीजे त॥ सन इसने चालिले असेल तेणेप्रमाणे चालवणे मोर्तब तेरीख ११ रजब

१६२३

• ले. २१ शके १५७५ वैशाख वा १२

( चार फारशी अक्षरें )

माहजर बि तेरीख २५ माहे रजब बि हुजूर हाजीर मजालसी सदर ठाणे परगणे सिरवल

काजी सेखन बिन काजी खुदो हाकीम शरा

( फारशींत 'सेखन' )

नरसो तमरस मजमूदार मोतेब

आपाजी फरजंद मल्हारजी देसमूख व मो कसबे मजाार

आपाजी मल्हारजी देसमूष

( नांगर )

( श्री अक्षरे वाटोळया शिक्यात आहेत व सभोवती सोळा दळे दाखविली आहेत )

विस्वासराऊ हवालदार

( फारशी शिक्का, तेरा दळी )

देवाजी दामोधर निघावान

इसम नाईक + चा ठाणे पा मा

खोपू नायक

( कट्यार )

बलवत राऊ

विसाजी गु+ ( कट्यार )

( या खालीं डावे व उजवे बाजूस मिळून सेटीये, महाजन, मोकदम, जोसी, गुरव, सुतार, इजाम, कुंभार, जिनगार, प्रजा, कोळी, तेली, माहार, जुनारदार, भोई, उपाध्ये, जंगम, पाणसारे वगैरेंचीं आपापल्या निशाणीसह सुमारें १७५ नांवें आहेत. विस्तारभयास्तव तीं येथें गाळलीं आहेत. )

सुा सन सलास इशरैन अलफ कारणें जाहला माहजर ऐसा जे रामाजी फर्जंद विठल काइदेऊ देसकुलकर्णी पा मजकूर आपले देसकुलकर्णाची मिरासी आपण चालवीत असतां दरीवख्त खुर्दखत रख्तखाने राजश्री राजेसाहेब मुकासाई पा मजकुरु छ ५ माहे जिलकादी पैवस्तगी छ माहे मोहरम सादीर जाहाले गणो रुद्र लंबा घेउनु ठाणा पा मजकुरास आला तेथे मालुमातीवरून रजा लिहिले की रामाजी विटल देसकुलकर्णी पा मजकूरु यासि दुरी करून भूपालराऊ लंबा यापासून देसकुलकर्ण व कसबा व पेठ बुरानपूर व देखील मजरे केसुरर्डी कामगारी घेत जाणे म्हणौउनु यावरून रामाजी विठल देसकुलकर्णी पा मार ठाणाचे सदरे हुजूर बोलिला जे देसकुलकर्ण पा मजकूर व कसबा व पेठ बुरानपूर व देखील मजरे केसुरर्डी हे आपले मिरासी असे आपले सालाबाद गहदम पिडी दर पिडी वडीलवडिलानी तागाईत चालविले आहे व हाली आपणहि चालवितो जोवरी हजरती साहेबाचे पादशाई तोवरी चलऊनु आपण खातो हे खलक जाहीर आहे ऐसे असतां दरम्यानें दरीवख्त खाने अजम हैबतखान

धाकुटा याचे कारकीर्दीस लस्कर मोकाम खडकी नजीक दौलताबाद दरसाल सन आरबा असर आलफ या सालामधे खान मशारनुले यासी रुद्राजी दादो व दादाजी व रगोजी भूपालराऊ लंबे पैदा होउनु उभे राहिले त्यावरून आपले बाप विठल काइदेऊ हुजूर जाऊन बहरकं मुनसिफी निवाडा करून लंबे मजकूर खोटे केले आपण खुर्दखत व माहजर घेउनु पा मजकुरास येउनु देसकुलकर्ण चालवीत होता यावरी पा मजकूर खानमशानुलेचे मुकासा बजावर्द होउनु परगणे मजकूर अमानत होऊन मलीक अजम ममलकत मदारीचे हवालदार काजी हुसेन व कारकून माहलासी अले तिही आपले बाप विठल काइदेऊ त्यासी आकस कोसीस केली तेणेकरिता आपले बाप विठल काइदेऊ हजरती मलीक अजम साहेबाचे बंदगीस हुजूर गेला होता मागे माहाली गणो रुद्र लंबा ठाणियात दखल होउनु देसकुलकर्णाचा कारबार करू लागला हे खबर हजरती बंदगीस आपले बाप विठल काइदेऊ मालूम करून हजरतीचे तलफ करून हुजूर बोलाऊनु हजरतीनें मुनसिफि निवाडा केला हमशाही माहालासी गोहीचे खुर्दखत मुदाम माहालदार पाठविलें बिा

पा सुपे  पा पुणे  कर्याती सासवड  तपे खेडेबारे

हे महालीचे कारकून व देशमुख व देसक याचे जाब गोहीच्या अदासा माहालदार घेऊन हुजूर आले यावरून मुनसिफी निवाडा करून लंबे मजकूर खोटे जाहले ते बाहीर घातले आपला बाप विठल काइदेऊ देसकुलकर्णाचा फर्मान व खुर्दखत घेऊन माहलासी येत होता तव पा मजकूर मुकासा सेद आमजदन मुलुकासी सादीर जाहला त्याचे कारकून माहालास आले त्यासी रगोजी भूपालराउ व गणो रुद्र लंबे भेटोन कारकुनासी मेळऊनु घेऊन गांवात राहून माहली हरकत फितवा केला यावरी सैद आमजदन मुलूक साहेबासी आपले बाप विठल काइदेऊ भेटोनु हजरतीचे फर्मान व खुर्दखत दाखऊन व त्याचे खुर्दखत घेऊन माहालासी अला कारकुनासी फर्मान व खुर्दखत दाखऊन लंबे मजकुरास बाहिर घालून देसकुलकर्ण आपले आपण चालउ लागला यावरी पा मजकूर सैद अमजदन मुलूख साहेबाचा मुकासा बजावर्द होऊन हजरती शाहाअलमपन्हा येदलशाह त्यासी खुलोखाली मुलूख दिल्हा हजरतीन पा मजकूर मुला महमदासी मुकासा सादर केला त्याचे कारकून व आगानुरा व रायेराउ माहलासी आले यावरी लंबे मजकूर हुजूर जाऊनु मुला साहेबाचे खुर्दखत घेऊन आले माहाली आगानुरा व रायेराऊ होता त्यापासी हमशाही विलायेतीचे देसमुख व हक जवारीचे मोकदम आले होते व पा मजकुरीचे देसमुख व देसक व सेटिये माहजन व बाराही बलुते तमाम बोलावुनु बैसविले बरहक मुनसिफी निवाडा केला

लंबे मजकूर खोटे करून बाहिर घातले आपला बाप विठल काइदेऊ त्यासी माहा-जर करून दिधला आपले बाप विठल काइदेऊ देसकुलकर्ण चालवीत असता आकसकोसीस करून सन इसने इशरैन अलफमधे गुमसुद मारा करून आपले बाप विठल काइदेऊ त्यासी जिवे मारिले यावरी आपण देसकुलकर्ण चालवितो यैसे आपले व लंबेचे दोनी च्यारी मोर्तबे निवाडा होऊन लंबे मजकूर खोटे करून बाहीर घातले होते यावरी मुला महमदाचे मुकासा बजावर्द होऊन येदलशायाचे खुलो तुटोन हजरती निशामशाह साहेबासी मुलूक जाहला यावरी पा मजकूर राजश्री राजे साहेबासी मुकासा अर्जानी जाहला हाली रगोजी व दादाजी भूपालराऊ व गणो रुद्र लंबे राजे साहेबापासी उभे राहून मालुमातीचे खुर्दखत घेऊन गणो रुद्र लंबा ठाणियास आला तरी साहेबी पा मजकुरीचे देशमुख व देसक व सेटिये माहाजन व बाराई बलुते बोलाऊन त्यावरी इमान घालून सद्रहु अहवाल मनास आणोऊन खोटे यांसी ताकीद फर्मावणे त्यावरी साहेबानी देसमुखासी व सेटिये माहजनासी व मोतबर लोकासी बारा बलुते व कोनेकुर्टे लोकासी बोलाऊनु त्यावरी इमान घालून पुसिले ते आपले इमाने बेतालीस खुमरोन बोलिले जे लंबे मजकुर कधी कोण्ही यैकिले नाहीत रामाजी विठलाचे वडीलाचे वडील पिढी दर पिढी गहदम सालाबाद पा मजकुरीचे देसकुलकर्ण चालवीत आले आहेती भोगवटा व तसरु-फाती कारकीर्दी दर कारकीर्दी तागाईत चालत आले असे लंबे मजकूर दरीवस्त उभे राहिले ते दोनी च्यारी मोर्तबे खोटे करून बाहीर घातले होते हाली मागुत्याने हरकती करून राजेसाहेबापासी उभे राहून मालुमातीचे खुर्दखत राजेसाहेबांचे घेऊन आले तरी हे मिरासीचे काम असे मालुमातीच्या खुर्दखतावरून मिरासी कैसी साधेल आता रामाजी विठलासी घेऊन हुजूर राजेसाहेबापासी आपण देसमुख व देसक मिलोन जाऊन यैसे बोलिले त्यावरून गणो रुद्र लंबा न पुसताची हुजूर गेला यावरी पा मजकुरीचे आहवाल मालूम करावया कारणें हावालदार व कारकून व देसमुख व देसक व सेटीये माहाजन व रामाजी विठल देसकुलकर्णी यैसे हुजूर गेले माहालीचे हाल अहवाल राजेसाहेबाचे बंदगीस मालूम करून देसमूखसी व देसकासी व रामाजी विठलासी लुगडी देते वरुती रगोजी व दादाजी भूपालराऊ व गणो रुद्र लंबे उभे राहून रामाजी विठलासी दुराई देउनु खोलविले यावरी राजे-साहेबी देसमुखासी व देसकासी व सेटे माहाजनासी पुसिले जे देसकुलकर्ण कोणाची मिरासी यैसे पुसिले यावरी देसमुख व देसक व सेटीये माहाजन बोलिले जे देसकुलकर्ण रामाजी विठलाचें वडील वडील पिढी दर पिढी गहदम सालाबाद कारकीर्दी दर कारकीर्दी चालवीत आले व हाली रामाजी विठल चालवितो याची मिरासी होये यैसे बोलिले लंबे मजकूर कधी कोण्ही देखिले व आईकिले नाहीत दरीवस्त सन आर्बा आशर अलफ कारकीर्दी धाकुटा हैबतखान येदलशाही यापासी

उभे राहिले होते त्याणेही बरहक मुनसिफी निवाडा करून बाहीर घातले यावरी मुलुकाचा सुलो होऊन येदलशायां खालून मुलूक सुटोन हैबतखानाचे बजावर्द होऊनु हजरतीच मुलूक हजरतीस आर्जांनी जाहाला यावरी लंबे मजकुरु मलीक आजम ममलकत मदारीपासी उभे राहिले होते तेयेही मलीक आजमसाहेबी बरहक मुनासिफी निवाडा करून लंबे मजकूर खोटे करून बाहेर घातले येसे येक दोनी मोर्तबे निवाडा जाहाला आहे हाली मागुत्याने साहेबापासी उभे राहिले तरी साहेबी निवाडा करून खोटे यासी ताकीद फर्मावणे यावरी राजे साहेबु बोलिले जे तुम्ही माहालासी जाणे रामाजी विठलाचे व लंबे मजकुराचे निवाडा करून रामाजी विठलासी माहालासी पाठऊनु देऊनु यावरी हवालदार व देसमूख व देसक व सेटीये माहाजनासी लुगडी देऊनु रजा घेऊन माहलासी आले यावरी हुजूर राजे साहेबी रामाजी विठल देसकुलकर्णी याचे व लंबे मजकुरांचे मुनासिफी पाहतां रामाजी विठल बोलिला जे देसकुलकर्ण आपली मिरासी होये आपले वडील वडील पिढी दर पिढी चालवित आले गहदम कारकीर्दी दर कारकीर्दी चालत आसे तैसेची आपण चालवितो आपला बाप विठल कायेदेऊ आसता पेसजी खा आजम हैबत-खान धाकुटा येदलशाई त्याचे कारकीर्दीसी सन आर्बा आशरमधे लंबे मजकूर पैदा होऊन कुसूर करीत होते त्यावरून आपले व त्याचे मुनसिफी निवाडा केला निवाडेचे माहजर व खुर्दखत आपणापासी आहे लंबे मजकुरासी खोटे करून बाहेर घातले त्यावरी मागुतेन मलीक आजम ममलकतमदारी साहेबापासी उभे राहिले तिही बरहक मुनसिफी करून निवाडा केला निवाडेचे फर्मान व मलीक अजमचे खुर्दखत आहे लंबे मजकूर खोटे करून बाहेर घातले होते यावरी मागुतेन मुला माहमद येदलशाही वजीर त्यापासी उभे राहून मालुमातीचे खुर्दखत घेऊन आले माहाली कारकून व आगानुरा व रायेराऊ होता त्याणी बरहक मुनिसिफी केली निवाडेचे माहजर व खुर्दखत आपणापासी आसे लंबे मजकूर खोटे करून बाहीर घातले होते हाली मागुतेन उभे राहिले तरी साहेबी बरहक मुनसी [ फी ] निवाडा करणे यावरी लंबे मजकुरासी पुसता ते बोलिले जे रामाजी विठलाचे वडील आपले ठेवणाईत होते देसकुलकर्ण आपली मिरासी होये साहेबी निवाडा करणे येसे बोलिले यावरून रामाजी विठलाचे व लंबे मजकुराचे कागद पत्र मनासी आणिता रामाजी विठलाचा भोगवटा व तसरुफाती बहुत दिवस चालत आले आसे रामाजी विठलांच्या पिढीया दर पिढीया गुदरलीया आहेती व हाली आपण चालवितो लंबे मजकूर दरीवख्त पैदा होऊनु लाईनी झोडाई करिताती येसे कलो आले मग लंबे मजकुरासी राजे साहेबी बाहीर घातले यावरी लंबे मजकूर बोलिले जे रामाजी विठलासी व आपणासी मलीक आजमाचे बंदगीस पाठवणे तेथे निवाडा होईल त्या वरून रामाजी विठल वा लंबे मजकूर हरदोजणा बराबरी मसुरल आताजी हेजीब

रुखसाने मोकरम साघाते देऊन पाठविले तेथे मुनसिफी मलीक आजम ममलकतं-मदारी साहेबी छ २४ माहे जमादिलाखर हाजीर मजालसीयां हुजूर केली रामाजी विठल देसकुलकर्णी व लंबे मजकुराचे कागदपत्र आणोउनु पाहिले रामाजी विठल बोलिला जे आपला बाप विठल काईदेऊ आसतां साहेबानी आपले व लंबे मज-कुराचे निवाडा केला होता हमशाही माहलासी सडी पाठऊनु गोहीच्या आर्दासा आणविले त्या मनासी अणून त्यावरून लंबे मजकूर खोटे जाहले आपला बाप विठल काईदेऊ यासी फर्मान व खुर्दखत दिल्हे देसकुलकर्ण आपला बाप विठल काईदेऊ माहालासी येऊनु चालवीत आसतां कारकीर्दी मुला माहमद येदलशाही त्याचे कारकीर्दीस गुमसुद आकस कोसीस करून मारा करून आपला बाप मारिला गेला हाली आपण देसकुलकर्णकी चालवीत आसे तरी साहेबीं खातिरेसी आणौन लंबे मजकुराचे व आपलें बरहक निवाडा करणें त्यावरून रामाजी विठलाचे व लंबे मजकुराचे कागदपत्र मनासी आणोउनु लंबे मजकूर खोटे जाहले लंबे मजकुरापासी मालुमातीची खुर्दखत होती ती फाडिलीली लंबे मजकूर खोटे करून बाहीर घातले ते पलोनु गेले रामाजी विठल देसकुलकर्णी पा। मजकूर खरा करून पाने व ताजे खुर्दखत व पहिले कागद फर्मान व खुर्दखते व माहाजर दिल्हे राजेसाहेबापासी बराबरी अंताजी हेजीब घेऊन आला त्यावरून राजेसाहेबी रामाजी विठल देस-कुलकर्णी यासी पाने व तश्रीफ लुगडी दिल्हे व आपले खुर्दखत देउनु माहालासी पाठविले माहाली कारकुनापासी खुर्दखते दाखविली खुर्दखती रजा जे रामाजी विठल देसकुलकर्णी याचे व लंबे मजकुराचे निवाडा मलीक आजम ममलकतमदारी हुजूर जाहला लंबे मजकुर खोटे जाहाले त्याचे कागद फाडून बाहीर घातले रामाजी विठल देसकुलकर्णी खरा जाहाला माहाली माहजर करून देणे म्हणोऊन रजा रजे बरहुकूम माहाजर करून दिल्हा रामाजी विठलाचे देसकुलकर्ण व कसबा पेठ बुरानपूर देखील मजरे केसुरडीं याची मिरासी होये आपली मिरासी आपण चाल-ऊनु सुखे असावे लंबे मजकूर गैर मिरासी त्याच कुसूर तुटला त्यासी निसबती नाही आता रामाजी विठल देसकुलकर्णी याचे आवलाद व आफलाद लेकुराचें लेकुरीं देसकुलकर्ण चालऊन आपले हकलाजिमा खाऊन सुखे आसावे पेस्तर कोण्ही लंबा उभा राहील हरकत करील तो दिवाणीचा गुनेगार व गोताचा अंन्याई हा माहाजर सही* मोतबाचा शिक्का.

---

* जोडावर शिक्के विश्वासरावाचे.

१६२५

ले. २२ शके १५४७ पौष शु. १

महजर व तेरीख २९ माहे रबिलोवल सु॥ मौजे निंबोडी पा॥ पुणा बि हुजूर हाजीर मजालेसी

साबाजि अनत

फारशी शिक्का

गोदजी विश्वनाथ हवालदार पा॥ मा॥र

फारशी शिक्का

पदमाजी निरो मजमूदार पा॥ मोर

निळकठराऊ नाईकवाडी किले पुरधर

मालोजी नरसिगराऊ व विठोजी शितोले देशमूख पा॥ मा॥

अस्पष्ट शिक्का

हैबतराऊ सेलबकर देसाई ता॥ गुजण-मावल

तिमाजि थोराथ मोकदम मौजे पिपलगौ पा॥ मा॥र



पदमोजी मोकदम मौजे लोणी काल-भोर पा॥ मा॥र



महमदजी सरनोबत

फारशी शिक्का

बगत्यारखान मुकासाई मौजे चा॥मिली पा॥ मा॥र

राघोजी पडित नाजीर किले पुरधर

नाईकवाडी ना॥ कोट का॥ पुणा

बगोजी बालोजी गणोजी

कृष्णाजि बादल देसा+ ता॥ हिरडस मावळ

सोमाजी दिनकरराऊ सरदार बि॥ मोक-दम मौजे निंबूत व पागारे पा॥ मा॥र

फारशी शिक्का

विठोजी सोनवणी मोकदम मौजे राहू पा॥ मा॥र



नाऊजी मोकदम मौजे पा॥ मा॥र



सु॥ सीत इसरेन अलफ कारणे महजर येसाजे राघोजी बीन पील पाटेलू सेडकर मोकदम मौजे चामिली पा॥ पुणा यामधे व हाऊजी बीन साऊजी कामिथा हरदोजणामधे मौजे मजकुरीचे मोकदमी बदल करकसा लागला याबदल कान्होजी सेडकर बिराजर राघोजी सेडकर व हाऊजी कामिथा हुजूर जाऊनु तमाम आपला मुदा हुजूर मालूम करून माहालास खुर्दखत सन इसरेना कारणे आणिले तेथे रजा की कान पाटेलू सेडकर व हाऊजी कामिथा हरदोजण मौजे चामिलीचे मोकदमी बा॥ करकसा करितातीं तरी तुम्ही व देसमूख व हमशाही गावीचे सर मोकदम व मौजे मा॥रचे बारा बलुते व प्रजा हुजूर बोलाउनु बरहक अमल खातिरेस अणौनु मुनसफी करणे आकस कोसीस न करणे हुजूर खबर लिहीणे म्हणौनु यावरी रजे हुकूम माहाली कारकुनी तमाम हमशाही गावीचे मोकदम व साठी प्रजा व बाराही बलुते हुजूर नेऊनु मुनसफी करणे तव हमशाही गावीचे मोकदम व देसमूख पा॥ मा॥र अर्ज केला की अजी सचणीचा वख्त

आहे हरदोजणाचे करकसेयानी गावीची सचणी जाली नाहीं तरी साहेबी दिवाली कारणे हरदोजणाचा निवाड केलीया गावीची सचणी होईल म्हणोनु अर्ज केला तो कारकुनानी खातिरेस आणोनु गावीची सचणी दोघाचे सिरी देऊनु मोकदमीचा हक लाजीमा अनत करून दोघाचे जमान घेऊनु फर्माविले कीं दिवाली होये तो वरी गावीची सचणी उगवणी करणे येक तास पडो न देणें आणि दिवाली जाली उभे रोहोनु निवाड करणे जो उभे न व्हाये तो गुन्हेगार येसे + + + कतबे घेऊनु गावास पाठविले यावरी गावीची सचणी उगवणी ते साली हरदोजणी केली सन इहिदे कारणे पा। मा। मुला महमदास देताति म्हणोनु गावीचा उसूल जाला पाहिजे या-करिता तेही साली निवाड जाला नाहीं यावरी अखेर साली पा। मा। मुला महमदास मुकासा दिधला माहालासि रायाराऊ आले यावरी सन इसने कारणे हाऊजी बिन साऊजी कामिथा राऊ आजमापासि फर्यादी होऊनु माहालाहून तलब काहाडूनु मौजे मार मालजी भालेराऊ सेडकर होता त्यास धरूनु मुनसफी खातिरेस नाणिता व गावीच्या प्रजास व बाराही बलुते यासि व हमशाही गावीचे मोकदमास मोकदमीची खबर न पुसता येकायेकी हाती पिसवीया घालुनु रवा करविला आणि मालजी भालेराऊ सेडकर त्याचा हात न पाहाता उगाच खोटा जाला म्हणोनु हाऊजी बीन साऊजी कामिथा याणे महजर करून घेतला यावरी मालजी भालेराउ सेडकर त्याणे मौजे मार येऊनु तमाम प्रजास व बाराही बलुते यासि हात दाखविला तो हात खरा जाला आहे हातासि काही नव्हते यावरी हमशाही गावीचे व सिवसेजारील गावीचे मोकदमास हात दाखविला आणि रायारायानजीक दो चौऊ गावीचे मोकदम हुजूर चाकरी करीत होते त्यास हात दाखविला यावरी तिही राऊ अजमापासि नेऊनु हात पाहिला तो हातासि काही जाले नाही येसे रायाराये आपले नजरेस देखोनु कान्होजी सेडकर यासि हुजूर बोलाविले अणी मौजे मारचे मोकदमीचा अमल पुसिला यावरी कान्होजी सेडकर बिराजर राघोजी सेडकर याने आपला मुदा अर्ज केला की आपणावरी लाइनी बरकस करूनु हाऊजी कामिथा यासि महजर करूनु दिधला आहे आणि साहेबी कारकून माहाली ठेविले आहेती त्याणी मालजी माले-राया सेडकर त्यास खोट लाईनी केले आहे तरी साहेबी आपणा हुजूर हाऊजी कामिथे याचा व आपला निवाड केला पाहिजे यावरी रायाराऊ तेणे कौलू दिधला जे हा वख्त निवाडीयाचा नव्हे पेसजी निवाडा केला तो खोटा केला आहे हाऊजी कामिथे यासि महजर करून दिधला तो रद आसे पेस्तर तुम्हा व हाऊजी कामिथे याचा निवाडा बरहक करूनु म्हणोनु कौलु दिधला व गावास सुर्दसत दिधले तेथे रजा जे कान्होजी सेडकर व हाऊजी कामिथा हुजूर आले होते सेडकर खरा जाला आणि मुनसफीदारी सेडकरासि खोटे करुनु बरकसे करुनु हाऊजी कामिथे यास

महजर करुनु दिधला आहे तरी तो रद् आसे जोवरी मोकदमीचा निवाड होये तोवरी मोकदमीचा हक लाजीमा आमानत केला आहे म्हणोनु खुर्दखत दिल्हे आणि गावास पाठविले यावरी पा मा साहेबासि अर्जानी जाले माहालास कारकून आले त्या नजीक कान्होजी सेडकर बिराजर राघोजी सेडकर उभा राहिला यावरी तिही हाऊजी कामिथे यास तलब केली आणि गावास खुर्दखत सादर केले जे मौजे मा।रचे मोकदमीचा निवाड जाला नाहीं तरी जोवरी मोकदमीचा निवाड होये तोवरी मोकदमीचा हक लाजिमा अमानत केला आहे यैसे सादर आसोनु ठाणीयासि न येच व हक + + उचापती केली दोहींसही मानीत नाही यैसे जुलूम केला यावरी साहाजी भोसला येदीलशाही यासि गोसमाल देवया बा। साहेब नामजादी घेऊनु आले शाहाजीसि गोसमाल देऊनु गनिमास सालपा घाटी कोडिला हे खबर आपण आईकोनु हुजूर आलो हुजूर आकस कोसीस कोण्हाची चालत नाही साहेब आपणा हुजूर बरहक मुनसफी खातिरेस अणोउनु निवाड करिलाती हे देखोनु साहेबास तमाम अपला हवाल मालुम केला यावरी हाउजी कामिथा मुकासाई याणी हुजूर अणीला होता त्यास आपणा हुजूर अणोनु मोकदमीची खबर पुसता का।* रायाराऊ माहाली महजर करुनु दिधला होता तो दाखविला यावरी देसमूख पा। मा। यास बोलाउनु फर्मांविले की राघोजी सेडकर व हाउजी कामिथा मौजे चामिलीचे मोकदमी बा। भाडताति तरी हाउजी कामिथा यापासि महजर आहे व राघोजी सेडकर यापासि कौलु व खुर्दखत आहे जे महजर रद् असे हे का। रायाराऊ कागद् आहेती तरी तुम्ही व गावगना मोकदम हुजूर आहेती याचा कैसा अमल आहे तो दखल करणे यावरी हरदोजणास पुसता हाउजी कामिथा बोलिला की का। रायाराऊ अपला व राघोजी सेडकर याचा निवाड जाला आहे ये बाबे अपणास महजर दिधला आहे आता राघोजी उभा राहोनु म्हणतो की निवाड जाला नाहीं तरी जे वख्ती निवाड जाला ते वख्ती गावगना मोकदम हे ते त्याच्या नागरेसी आपण जाब आणीन यैसे बोलिला यावरी राघोजीस पुसता तो बोलिला की मालजी भालेराऊ सेडकर यावरी जुलुम करुनु मजालसी अकस कोसीसेने यास खोटे करुनु महजर केला ते वख्ती मावजी भालेराये आपला हात गावगना मोकदमास दाखविला आहे व रायेराये कौलु खुर्दखत दिल्हे आहे ते हुजूर दिल्हे गावगना मोकदमास ठाऊके आहे रजा होईल तरी याचे जाब अणोनु यावरी हर दो जणाचे बोले + + साहेबा हुजरून अर्ज केले यावरी हरदोजणास फ फर्मांविले की रोजा अठामधे जो जाब घेउनु येईल तो खरा न ये तो खोटा म्हणौउनु फर्मांविले यावरी मालजी भालेराऊ बिराजर राघोजी सेडकर ते च वख्ता जाउनु रोजा साता गावगना मोकदमाचे गोहींचे कागद आणिले बिता।

---

* का। = कारकीर्द असें तत्कालीन नकलेवरून ठरतें.

पा। पुणा

सूर्याजी मोकदम मौजे नायगों देऊ
जानोजी मोकदम मौजे वाधापूर
राघोजी राजवंट
मोकदम मौजे + + खुंन
मोकदम मौजे आंबिले
मोकदम मौजे जोगवडी
विरोजी बिन कराऊ बिराजर
मोकदम मौजे निबूत व पा। मार
मोकदम मौजे वाळुज
नाइकजी मोकदम मौजे सोनवरी
गोविंदराऊ मोकदम मौजे करजे

पा। सुपा

अताजी मोकदम मौजे मुरठी
तिमाजी मोकदम मौजे मायेवडी का। सासवड
मोकदम मौजे दिपा
लहोजी मोकदम
मोकदम मौजे जेजुरे
जाउजी मोकदम मौजे सिगापूर
माउजी देसाई का। मार

सदरहू गावीचे मोकदमाच्या अर्दासा आणिलेया तेथे लिहिले जे सेडकरामधे व कांभिथियामधे मौजे चामिली पा। पुणा तेथिले मोकदमीबदल करकसा होता यावरी का। रायाराऊ दिव जाले मालजी भालेराऊ सेडकर दिव केले आणी रोज ६ मधे पुणाहून आम्हापासि येउनु भेटला आणि हात दाविला आम्ही मालजी भालेराऊ सेडकराचा हात पाहिला तो मालजी सेडकर खरा जाला होता चोखट होता मालजी सेडकरे महजर करून गेला जे आपण खरा निघालो आणि अपणावरी हैफ होतो आकस कोसीसे जाली आहे म्हणौनु गाऱ्हाणे देउनु गेला आणि जाते वेळे हात पाहिला तो हात चोखट होता हे सत्य आपले बेतालिस स्मरोनु गोही लेहून पाठविली आहे आता साहेब अरीफ आहेती रजा ते सिरावरी म्हणोनु मोकदमाच्या आर्दासा हुजुर आणौनु दिधलिया त्या खातिरेस आणिता महजर कुली आकस कोसीसेने केला आहे यावरी हाउजी बिन साउजी कामीथा व चाहुजी कामीथा यासी फर्माविले की तुवा गोहीचे कागद आणिले नाहीत तरी तुवा कोणे अमलास कबूल आहेस यावरी त्याणे अर्ज केला की आपणाबरावरी का। रायाराऊ मालजी भालेराऊ सेडकर येणें दिव केले पर निवाडा जाला नाही म्हणोनु राघोजी सेडकर उभा राहिला आहे तरी आता मालजीस आपण कबूल नाही राघोजीनें रवा करावा आपण साउली करीन खरा होईल तो मोकदमी खाईल यावरी राघोजी सेडकरास पुसता तो बोलिला की आपण रवियास कबूल आहे यावरी अलफचे रोजी दोघास अदूघसान देउनु फर्माविले की पाचा सेर तेल व पाच सेर तूप तते करुनु दोघाचे हात यकवट घालुनु जो खरा होईल त्यास लुगडी देउनु मोकदमी हवाला करुनु खोटा होईल त्याची गर्दन मारुनु गुन्हेगारी होनु पाचशे घेउनु येसा नेमु केला यावरी

दुसरे रोजी नवगजीस हाजीर मजालसी हुजूर हर दोजण उभे केले तेल व तूप आणविले ते व ( स्ती ) हाउजी बिन साउजी व चाहुजी बिन हाउजी कांमिथे बोलिला की पेसजी आपण व सेडकर दिव जाले व हुजरुनं सुर्दसते माहालास आणिली पर निवाड होउनु कुसुरु तुटला नाही आता साहेब मायेबाप आहेती अपला व +·+ ( सेडकरा ) चा निवाड होउनु कुसुरु तुटे ते केले ( पाहिजे ) दोघे जण भाडता येक खोटा होईल ( तरी आपण ) दिव्यास कबूल नाही साहेब निवाड करितील त्यास कबूल आहे यैसे बोलिला पर रवियास ( नाट ) गेला यावरी देसमूख पा। मा। यास फर्मावले ( की ) हाउजी व राहुजी कामिथे का। रायाराऊ महजर दाखविला त्यात मोकदमाची नावे लिहिले होती त्याचे गोहींचे कागद नाणीला व हाली रवियास कबूल करून नाट गेला आणि हरदो जणाची समजाविस होऊनु कुसुरु तुटे ते करणे म्हणोनु अर्ज करितो तरी तुम्ही व जे मोकदम हुजूर आहेती ते बैसोनु राघोजी सेडकर व हाउजी व चाहुजी कामींथा याचे नेमु करुनु कुसुरु तुटे समजावीस ( होऊनु ) गावीचा करकसा दुरी होये ते करुनु आम्हास नजीक येउनु येणे हुजुर खातिरेस अणोनु निवाड करुनु म्हणोनु फर्मावले यावरी देसमूख पा। मा।र येही हाजीर मजालसी हुजूर दोघास बोलाउनु पुसता दोघी जणी नेमू केला की तुम्ही गोत मायेबाप आहा करकसा करिता खराबीच होती तरी, तुम्ही जैसा निवाड कराल त्यास आपण कबूल आहो त्यावरी हरदोजणास फर्मावले की तुम्ही अजी येक बोलता दुसरे रोजी आणी नेमू करिता तरी जो नेमु कराल त्याच्या जमानता करण

| | |
|---|---|
| यावरी जमानता केलिया बि॥ हाउजी | राघोजी बिन पील पा + सु व माळजी |
| बिन साउजी व चाहुजी बिन हाउजी | भालेराऊ सेडकर यास जमान ( सो। ) |
| कामीथे यास जमान जाउजी मोकदम | माजी दिनकरराऊ बिरादर मोकदम मौजे |
| मौजे गराड पा। मा।र | निबुनं व पागारे पा। मा।र |

हर दो जणासि जमान घेतले यावरी हाउजी व चाहुजी कामिथे व राघोजी भाले· ( सेडकर ) यासि हाजीर मजालशीस उभे केले यावरी हाजीर मजालसी सदरहू अमल खातिरेस अणोनु हाउजी व चाहुजी कामीथे महजराचे गोहीचे कागद मोकदमाचे नाणीच व दिव्या कबूल केले ( हो ) ते त्यास नाट गेला होता यैसे गुन्हा माफ करुनु फर्मावले की तुवा कोणे निवाड्यास कबूल आहेस यावरी हाउजी व चाहुजी कामीथा बोलिला की अपण निमे मोकदमी करणे व निमे राघोजी सेडकरास देणे या निवाड्याने कुसुरु तुटल यास आपण कबूल आहे यैसे बोलिला यावरी राघोजी सेडकरासी पुसता तो म्हणो लागला की अपण दिव्यास कबूल आहे अगर साहेब व हाजीर मजालसी व गोत व देसमूख जे करितील त्यास कबूल

आहे येसे हर दो जणाचे बोल खातिरेस अणोनु निमे मोकद्मी राघोजी बिन पील पाटलु सेडकर याणे करुनु अपले तरफेची सचणी उगवणी करावी व ह्राहुजी व बाहुजी कामिथे याणे निमे मोकद्मी गावीची करुनु अपले तरफेची सचणी उगवणी करावी हरदोजणी द्विवाणात पाने व लुगडी यकवाट उभे राहोनु यावी व बाजे उत्पन व इनाम व हरयेक लाजिमा निमे कामिथे पाने व निमे सेडकराणी घेणे व वऱ्हाड व पाट अपलाले तरफेने घेणे येसा नेमु करुनु फर्माविले की सद्रहू प्रमाणे निवाड जाहला अता निवडिलेया अमलास जो हिला हरकत व कुसुर करील तो गोताचे खोटा व द्विवाणाचा गुन्हेगार याणे द्विवाणी पाचा सिसे व होनु पाचासे देणें निवडिले प्रमाणे निमे गावीची मोकद्मी राघोजी बिन पील पाटेलु सेडकर व निमे गावीची मोकद्मी बाऊजी बिन साऊजी कामिथे येणे प्रमाणे लेकुराचा लेकुरी पिढी दरपिढी चालउनु अपलाले तरफेचे सचणी उठावणी करुनु सुखे आसणे हा म(हजर सही)

---

ले. २३ — १६२५ (१५४७ पौष व. ९)

( सिका )

( नकल फरमान पाद्शाई पारसीची )

फरमान पाद्शाई सादर जाहाला बनाम वडे सरदार आलीशाहा आलीज्याहा मामलेदार बमर्द बहादारी कारकुनान किले पनाला दरविला इतजपना रफातदस्तगा सुज्यात इस्तीव आमदहुल उमराय लायेक मेहेरबानगी व लायेक रुपा शाहाजी भासले सरलस्कर याणी अर्जदास्त केला कीं बद्रगा पाद्शा सिलेमान आशा दरबारात आहेत त्यास देसगत कार्यांत तलबीड व हक घाट किले मजकूर पुरुष दर पुरुष मिरास समजी व धारोजी मोहिते यासी यावी हाली देसगत मजकूर वसाड पडली आहे देसगत चालवण्यास कोणी नाही याजकरिता पाद्शा याणी मेहेरबानगी करून मोहिते मजकूर यास देसगत प्रातप्रमाणे देवयाविसी हुकूम व्हावा त्याजवरून देसगतीची मेहेरबानगी बिना आवरा अज सुरुसन सीत अशरीन अलफ देसगत कर्यात मजकूर व हक घाट ब हुकूम सदरी लिहिल्याप्रमाणे देणे समजी व धारोजी मोहिते यास मुकरर करून दिल्ही असे वुमाला करणे मोहिते मजकूर नमायत व महायत आज देसगत मशारनिल्हे याजकडे ज्यारी इनाम पर्ववत प्रमाणे चालवणे व भोसले सरलष्कर व मशारनिले याचा अर्ज पाद्शा याणी खातरेस आणून देसगतीची बाहाली करून दिल्ही असे दरी बाब ताकीद जाणून फरमानाची तालीक दफ्तरात घेऊन असल फरमान मोहिते याजकडे देणे

बरहुकूम फर्मान बेहुजूर देसगत चालवणे ताहारीर फी तारीख २१ माहे रबिलाखर *
सन १०३५

---

१६३०

ले. २४ शके १५५२ भाद्रपद वा ७

मा हा राजेश्री जायेणा लिंगरस हवालदार माहालानिहाये व किले सुभानमंगळ

मा राजेश्री अपाजी मल्हारजी देसमुख किळे सुभानमंगळ ता रामाजी विठल देसकुळकर्णी किळे मजकूर सु॥ इहिदे सलासीन आलफ कारणे तुम्ही येउनु समाचार सागितला जे आपले वाडे मिरासीचे कोटा नजीक होते व सेटियाची घरे व बाजे लोकाची घरे होती ती मोडिली सेटियाची ( शिका ) व बाजे लोकास घरास जागे करून दिल्हे आपणास जागा अपल्या वाडियाचा निमोना पाहोनु देणे आम्ही वाडे बाधोनु यावरी राजसेटी व काळसेटी सेटियां व माहाजन व बाजे लोके मातबर बोलाउनु विचार करून तुमच्या वाडियाचा निमोना पाहोनु तुम्ही चौग भाऊ रामाजी विठल व केदार विठल व रतनाजी विठल व सुखो विठल चौघा भावासि जागा करून दिल्हा बितपसील

हैबतराऊ धणगर हसम नाइक चा ठाणे व धणगर खुटकरी हे पहिले कसबिया बाहेरी धणगरवाडा होते फितरतीकरिता यासि च्यारी दिवस कसबियात जागा करून दिल्हे होता त्यासि अणीक जागा करून दिल्हा हा जागा व अतभट मोन्या याचा वौश बुडाला आहे हा जागा येसे दोन्ही जागा यावरी रामाजी विठल व सुखो विठल वाडे बाधोनु इमारती करून नादणे सदरहू दोन्ही जागे

कमा दिवटा मुसलमान होता तो मयेती जाला त्याचे फर्जद गाव सोडून गेले अहेती तो जागा केदार विठलास मिरास करून दिल्ही आसे साऊजी व चाहुजी आदकारी मयेती जाला त्याचे लेक जागा टाकून बहुत दिवस कोकणात गेले तो जागा रतनाजी विठलास मिरासी करून दिल्हा आसे

---

* हें पत्र " इतिहास आणि ऐतिहासिक " या मासिकांत शिवकालीन घराणीं या सदराखालीं ( ल. ३७१ ) छापलें आहे. तें येथें संदर्भाच्या सोईसाठीं उद्धृत केलें आहे. सदर मासिकांत या पत्रावर ' १५४६ माघ वद्य ८ ' अशी मिती घातली आहे. परंतु त्या ऐवजीं ' १५४७ पौष व. ८ ' अशी मिती पाहिजे. त्याचप्रमाणे ' कयेक ' च्या जागीं 'लायक', ' वसगत 'च्या जागीं ' देसगत ' असा फरक करून हें पत्र येथें उतरलें आहे. शहाजीस सरलष्कर हा किताब १५४७ च्या श्रावणापूर्वी होता ( खं. १५ पृ. ४२८ ); व तो १५४९ अखेर त्याला लावलेला आढळतो ( खं. २०, पृ. ३४५ ). या अवधींत शहाजी आदिलशाहाकडे होता. तो शके १५५० मध्यें पुनः निजामशाहींत आला ( खं. १५ पृ. ४३६ ) तेव्हां सरलष्कर हा किताब त्यानें सोडला.

रामाजी विठल व सुभो विठल यासि
मिरासी करून दिल्ही आसे

सदरहू चौघा भावासि वाडे नेमून यावयासि मा। हा। राजश्री पंत हवालदार माहालानिहाये ते व आम्ही व सेटे माहाजन व समस्त वाडे हिंडोनु द्रिस्टीस पाहोनु सदरहूप्रमाणे तुम्हांसी वाडे नेमून मिरासी करुनु दिल्हे आहेती यावरी तुम्ही वाडे बाधोनु इमारती करून नांदणे सदरहू जाग्यावरी हैबतराऊ धणगर व आद्कारी व कमा दिवटियाचे वोसीचे हरकोण्ही व मोनियाचे वोसीचे हरकोण्ही व खुटेकरी धणगर उभे राहीले तरी त्यासि काही उभे राहावयासि निसबती नाही समुदिया कसबियाची घरठाण याचि रदबदल जाली आहे तुम्ही सदरहू प्रमाणे चौघे भाऊ सदरहू प्रमाणे जागे नेमिले वाडे दिल्हे या वाडियावरी इमारती बाधोनु लेकुराच्या लेकुरी नांदणे ये बाबे मा। हजरती राजेश्री पंताच्या कौलु सदरहू प्रमाणे दिल्हा आसे व आमचाहि कागद इमानपूर्वक दिल्हे आसे सुखे इमारती बांधोनु लेकुरांचा लेकुरी नादणे या पत्रासि आनसारिखे करू ते सिरी आण आसे हे पत्र सही

तेरीस २० माहे सफर

---

ले. २५

राजश्री रामाजी विठल देसकुलकर्णी पा। सिरवळ यासि मल्हारजी आपाजी देसमूख पा। सिरवल त्याहावया कारण येसा ( जे ) आपला बाप आपाजी कर्णेद मल्हारजी देसमूख देसमुखी करीत होते कारकीर्दी जायेणा लिगरस हवालदार मा। मा। व माहालानिहाये त्याचे वेलेसी उटणीया पडोनु देखा जाली यावरी लोकीकी वार्ता उठली की विश-प्रलयो जाला यावरी कोण्ही कोण्ही तुमचे नाव घेऊ लागले यावरी तुम्ही आमच्या घरास येऊनु बोलिलेसी जे लोकवार्ता लोक बोलताती जे रा ( माजी विठलाने ) वीश घातले तरी आपले........घेणे यावरी ( अस्पष्ट सिक्का ) आम्ही तुम्हासी बोलिलो जे आम्ही होऊनु तुम्हास काही हाटकिले नसता तुम्ही येकायेकी पारवीस लोकाच्या बोले उभे राहिलेसी तरी तुम्हापासून घडिले नाही येसे आमचे आम्हास कलो आले देसमूख आपमरणे मेले यावरी तुम्ही मा। राजेश्री जायेगापंतापासि सदरहू समाचार सागितला त्यापासी पाळीस उभे राहिलेती तिही गगाजी गगेस बरावरी देऊनु तुम्हापासि पाठविले जे रामाजी पाळीस उभा राहिला आहे यासि पाळी घेणे यावरी आम्ही व राजेश्री तुकाईजी व गुजाई आई व येसाई आई बसोनु तुम्हास व गंगाजीस बोलाउनु बोलिलो जे हा आमल रामाजी विठला पासूनु जाला नाही हे आमचे आम्हा बाबे कलो आले लाईनी मुदई नसता पाळी देनो याचा काये माना आसे हा समाचार राजश्री पंतापासि गंगाजीन सागितला

पंतही बोलिले जे मुदई नसता पाळ घेऊ नये यावरी तुम्हास आम्ही......नू पाने देऊनु तुमचे समाधान केले यावरी किले पुरधरी राजश्री जगदेराऊ निंबालकर व बारा मावलीचे देसमूख + रोहिडेकर सबनीस निलकठराऊ + + + + येसे येक जागा मिळाले होते त्यापासि दिवाण कामाबदल तुम्हास व कृस्णाजी निगुडी यासि पाठविले होते तेथे कोण्ही कोण्ही लोक बोलो लागले जे अपाजी देसमुखासि रामाजीने विश दिल्हे हे दखल तुम्हास कलोनु तुम्ही मा। राजश्री जगदेराऊ व रोहिडेकर व पुरंधरकर व हाजीर माहाली देसमूख त्यापासि उभे राहिलेसी जे लाईनी आपले माथा अपसब्द आला याचे पाखी घेणे खरा जालो तरी ब्रुतीवरी राहीन खोटा जालो तरी देसत्याग करीन येसे नेट करून तुम्ही बोलिलेती आण पाखीस उभे राहिलेती यावरी राजश्री जगदेराये आम्हास पुसावया पाठविले जे मुदई नसतां रामाजी विठल पाखीस उभा राहिला आहे याचा काये विचार यावरी आम्ही राऊ गोसावीयासि पत्र पाठविले की हा आमल रामाजी पासूनु जाला नाही या पासूनु लाईनी पाखी न घेणे यावरी तुम्हास राऊ गोसावी व सदरहू समस्तानि बोलाऊनु बोलिलेती कीं ज्याचे तीं म्हणताती रामाजी पासून हा आमल घडला नाही तरी तुम्ही लाईनी पाखी देऊ नये यावरी राऊ गोसावी याचे कागद व रोहीडकराचे व पुरं (दर) कराचे व बारा मावलीयाच्या + + + कागद घेऊनु आलेती कीं रामाजी पाखीस उभा राहिला होता तुमच्या कागदावरून या पासून पाखी घेतली नाही हा खरा येसे खलक जाहीर होऊनु कलो आले ते कागद आम्हास दिल्हे सदरहू वर्तमान कलो आले आता तुम्ही कोण्हाच्या बोलावरी नव जाणे आमचे आम्हास बरे कलो आले कीं हा आमल तुम्हापासून जाला नाही आता तुम्ही आपले समाधान करून पहिले जेसा कारभार करीत होतेसी तैसाच करीत जाणे आम्हापासि दुजाभाव नाही यासि तकरार आसे तरी आम्हासी आमच्या पूर्वजाची आण आसे व सिरी आण आसे

---

१६३८

• ले. २६ (पुंणे देशपांडे दफ्तर) १५६० ज्येष्ट व. १२

(महजर हाजीर मजालसी कसबा खेडेबारे)

छ २५ माहे मोहरम

मशुरल हजरती राजश्री दादाजी कोंडदेव सुभेदार नामजाद किले कोंढाणा व महालानिहाये

सिका पारसी

देशमुख व देशक माहालानिहाये

देशमुख ता। खेडेबारे — देशमूख ता। गुजनमावल

(निशाणी) — बापूजी हैबतराव

(निशाणी)

बाबाजी जुझारराव देशमुख ता। कानदखोर



सुलतानजी व मल्हारजी देशमुख कर्यात मावळ प्रा। पुणें



दसपाटील मोकदम मौजे हिवरे प्रो पुणें



माउजी मोकदम मौजे निगडे ता। खेडेबारे



राहुजी मोकदम मौजे केतकवले ता। खेडेबारे



बाबाजी हैबतराव व बाजी नाईक



बाबाजी आवलराव देशमुख ता। वेलवंडखोर



मोरोजी मोकदम मौजे गराडे प्रा। पुणे

कृष्णाजी मोकदम मौजे परीचे प्रा। पुणे

बाजी मोकदम मौजे दिवडी ता। खेडेबारे



सोनजी मोकदम मौजे कांबरे ता। खेडबारे



सु तिसा सलासेन आलफ कारणे महजर केला ऐसाजे बाबाजी मोकदम नेलेकर मौजे कोंढीत प्रो पुणे हा मोकदमी करीत आसे यावर नफर मजकूर तुटला खायाचे घेयास नवते तुटकपणाकरितां गाव लावेना म्हणोन बाबाजी मोकदम जनाजी खैरा यास मोकदमी निमे दीधली जे तू गाव लाव आणि मोकदमी खा। आणि निमे आपण खाईन नागर बाबाजीने करावा नाव आधी बाबाजीचे त्यामागूनी खैन्याचे दिवाणातून खैरायाचे पान लुगडीं आधीं बाबाजीचे त्या मागून जनाजी खैन्याचे येणे प्रो नेम करून कागद देऊन जनाजी खैरा गावास आणिला यावर जनाजी खैन्याच्याने गाव लावेना म्हणोन बाबाजीमध्यें व जनाजी मध्यें कुसूर पडला मग बाबाजी रुद्राजी जाधव परिचकर यासी म्हणो निघाला जे आपण जनाजी खैन्यास निमे मोकदमी दिधली आहे पर त्याच्यानें गाव लावेना आणि कुसूर करितो तर जनाजी खैन्यास तुम्हीं आम्ही मिलोन बाहेर घालून आणि खैन्यास निमे मोकदमी दिधली आहे ते च तू निमे खाणे म्हणोन ऐसे बोलून नेम करून कागद देऊन रुद्राजी जाधव परिचकर गावास आणिला यावर बाबाजी आणि रुद्राजी जाधव येक होऊन भांडोन खैन्यास बाहेर घालावे म्हणोन खैन्यासी भांडो लागले दिवाण व गोत उदंड जाले परंतु खैरा हडेचना मग दिवाणे गोते दिव्य नेमून खैन्याने दिव्य करावे मग श्री देव महास्थल मौजे ( मोहोरी–

नेसरापूर ) ता गुजनमावळ तेथे जाऊन जनाजी सेरा दिवी बोलला जे बाबाजीने आपणास निमे मोकदमी दिधली आहे हे उतर सरें म्हणोन बोलून रवा काढून बाबाजीचे हाती दिधला जनाजी सेरा खरा जाला यावर जनाजी सेन्यास निमे मोकदमी दिधली निमे उसली त्या बा बाबाजी व रुद्राजी भाडो निघाले त्या बोलास बहुत दिवस जाले मग समस्त बैसोन मनास आणिता सेराची ती निमे मोकदमी दिधली त्याचा पहिलेच तडका तुटला आहे निमे मोकदमी उरली आहे त्याची मनसबी करिता बाबाजीचा पुतण्या कृष्णाजी मोकदम कदीम होय आणि रुद्राजीने हि दिवाणात आवणात पैके दिले आहेत व रोझ्या मोझ्याहि सोसला आहे याकरिता रुद्राजी हि तोडता नये म्हणोन समस्त गोते हरदोजणाचा येणे प्रो निवाडा केला आज मोजा चावर ९ नव यापैकी सेरा निमे. तकसीम गावची ४॥ साडेच्यार वजा करून निमे तकसीम गावची चावर ४॥ साडेच्यार राहते ते मागती दो ठाई करून सवा दोन चावर बाबाजीचा पुतण्या कृष्णाजी त्याने खावे सवा दोन चावर रुद्राजीने दोघानी दो ठाई वाटून बराबरी खावे व समेदा चावराचे मोकदमीचा हाक बाबाजीचा पुतन्या कृष्णाजीनें खावे आणि सवादोन चावराचे हाक रुद्राजीनें खावे त्या वेगळे पाढरीवर जे मोकदमीचा हाक येईल तो निमे सेरियाचा मिमे जे उरले आहे दो ठाई करून निमे बाबाजीचा पुतण्या कृष्णाजीनें खावे आणि रुद्राजीनें खावे नाव व नागर दिवाणातून व हरयेक ठाईहून पान व लुगडी व हरयेक मानमानुक येणे प्रा वर्तावे कागदी मोकदमाची नावे दोघाची आधी बाबाजीचा पुतण्या कृष्णाजी त्याचे मागून सेन्याची येसी प्रो नाव आणि नागर येकच बाबाजीचा पुतन्या कृष्णाजी त्यानेच कराव व हरयेक जागा पान लुगडी व मानमानुक आधी बाबाजीचा पुतण्या कृष्णाजी त्याचे मागून सेरे याचे दिवाणातून व हरयेक ठाईहून पानलुगडी येतील ती कृष्णाजीनें घ्यावी कृष्णाजीने वाटून रुद्राजीस द्यावी येणे प्रो निवाडा केला असे पहिले कागद जे होते ते येसे समस्त गोतापासि आणिले ते समस्त गोते फाडिले आणिक जे हरदोजणापासी कागद राहिले असतील तर रद असे आपलाले तरफा लाऊन दिले आहे दिवाणातून हरयेक जागाहून पडेल तो तकसिमेचा उगवणी करणे सदरहु प्रो निवाडा केला असे निवाडया प्रो जमानदारी वर्तावे जो कोणी निवाडे प्रो वर्तेना त्याने दिवाणात पांच सिसे व पाचसे होन द्यावे व मिरासी वेगले व गोताचे अन्याई हा महजर सही ( मोर्तब पारसी )

१६४२

ले. १७ [ पुणें देशपांडे-दप्तर ]  १५६४ अगर ६५ ज्येष्ट शु. १४

असल बा। नकल

महजर बितारीख छ १२ माहे रबिलावल बिहुजूर हाजीर मजालसी मुा कसबे खेड

मशुरल हजरती राजेश्री दादाजी कोंडदेव व सुभेदार नामजाद किले कोंढणा व महालानिहाये

( खाली सिका )

काजी आबदुला बिन काजी महमुद हाकीमशरा व काजी सद्र बिन काजी इसमाईल न खा काजी प्रो पुणां

( पारसी खाली )

सुंदर हारी मजमुदार प्रो मार रुजु

बापूजी मुद्गल हवालदार प्रां पुणां

( खाली सिका )

बापूजी व कानजी देशमूख ता खेडेबारे

मालोजी नरसिंगराऊ व विठोजी सितोले देशमुख प्रो मार

( सिके दोन )

मोकदम मौजे लोणीकाळभोर

हैबतराव व बालाजी देशमुख ता गुजणमावल

मानकोजी बिन सेटिया का। पुणा व बाबाजी सेट माहाजण का। मार

म्हाकोजी बिन तुका पा। मोकदम का। पुणा

माहादसेटी सेटिया पेठ मुर्तजाबाद

गणसेट सेटिया ......... महाजण पेठ शहापुरा

सोम सुतार डोरला व चांगोजी भाइवडकर सुतार मेहतरी येक का। मार निशानी

जोतिसी काक पाटला जोसी का। मजकूर बि। बाबदे भट पाटक

बैल बरटा परीट का। मार मोकदम मौजे थेरडवणे

वाल धरणा गुरव का। मार

धाका महाला न्हावी का। मार

जमणा माहार का। मार

मौजे मोकदम मौजे दिघी

सुा सलास आर्बैन आलफ कारणे महजर केला ऐसाजे वाल्हे बिन येका कुंभार व काऊ बिन साऊ कुंभार का। पुणे प्रा। मार हे हारदोजण मेहतरकी वडीलपणाबद्दल आपणा मध्ये आपण भांडत हुजूर आले साहेबी हरदोजणास( चे ?) बोल मनास आणितां हरदोजण राजी होऊन बोलले जे का। मारीचे बलुतेयासी अवघा समाचार ठाउका आहे तरी साहेबी यास हाजूर बोलाऊन याचे माथा संत्य सुकृत घालून गोही पुसने ते जे सांगितील तेणे प्रो वर्तणें ह्मणोन नेम केला यावर का। मारचे बलूते यासी हाजूर बोलाविले बितपसील

काक पाटला जोतिसी
वाल धरणा गुरव
धाक माहाला न्हावी
... नाक माहार

सोम सुतार डोरला व चांगोजी
भाइवर्शेली सुतार मेहतरीये
बेल बरिटा परीट

सदरहु गोईंदार यासी चाभारकुंड काहाडून यासी म्हणाले जे हे दोघे कुमार का॥ मार्गिचे मेहतरीकीचे वडीलपणाबद्दल आपणात आपण भाडताती तरी याचा समाचार कैसा आहे तो सत्ये स्मरुनु सागणे जरी तुम्ही असत्ये बोलाल तरी जितुके प्रीथीवींवर पातके होतील तितुके तुमच्या माथा आसे म्हणोन आण घालून पुसिले यावरी सदरहु गोहीदारी आपले सत्ये स्मरोन बोलिले का॥ मारी कुभाराची घरे दोन येक कोया कुंभार दुसरे वाल्हे व काऊ यामध्ये कोया कुभारांचे बाप व कोया मार मेहतरीकी करिता कोया कुमार मेला त्यास कोन्ही लेक बाल नाही त्याचे घर बुडाले यावरी सवेच का॥ मारी मुरारपंताचे तसदी करिता खराब पडले यावरी साहेबी का॥ मारास कौल दिल्हा का॥ मारी मामोरी जाली वाल्हे व काऊ का॥ मारास आले हाली दोघे जणा वडीलपण मेहतरींबदल भाडतात तरी या हारदोजणाचा मूळ पुरुश वाको यासी दोघे लेक

वडील वाल्हे त्याचा लेक येका त्याचा लेक हाली वाल्हे
धाकटा लेक काऊ त्याचा लेक साऊ त्याचा लेक काऊ हाली

येणे प्रो वडील धाकटे आहेती या दोघाचे घर येकच आहे वडील घरचा वाल्हेचे होये धाकटे घर काऊचे होय वडीलपण मेहतरकीचा मान वाल्हेस दिल्हा पाहिजे वरकड हाक उतपण दोघे जणें दो ठाई वाटून सातील म्हणोन सदरहु प्रो गोहीदारी सागितले यावरी हाजीर मजालसी हुजूर काऊस पुसता तोहि बोलिला जे वडील घर वाल्हेच आहे मेहतरकीच मान वडीलपण वाल्हेस देणे वरकड हाक उतपण दो ठाई वाटून साऊन मेहतरकी वडिले घरी येकच ठाई आसो देणे आपण हिला हरकती न करील म्हणोन बोलिला व येकाचे.........त्यावरून हारदोजणी येणे प्रो वर्तने वाल्हे बिन येका येणे मेहेतरकीचे वडीलपण विडा टिळा पाने व लुगडे येणे घेणे हाक उतपण निमे येणे सावे निमे काऊ बिन साऊ येणे सावे हाक उतपण जे होईल ते निमे साने येणे प्रो निवाडा केला आहे सदरहु प्रो हारदोजणी लेकुराचे लेकरी साऊन सुखे आसने दिवाणचा महार दो जणी सवादे करणे हिला हरकती न करावी सदरहु निवाडे प्रो वर्तने या निवाडयास जो दे ता हिला हरकती करील तो दिवानचा गुणेगार व गोताचा अन्याई हा महजर सही मोर्तब सुद *

* सलास आरबैन सालाच्या प्रारंभीं व अखेरीस अशी दोन वेळा रबिलावल महिन्याची १२ वी तारीख येत असल्यामुळें या कागदाचा शक १५६४ कीं १५६५ याचा निर्णय करण्यास साधन नाहीं.

१६३७

ले. २८ [ ठकारदप्तर ] १५६९ अश्वीन वद्य १२

मोकद्मानी मौजे पर्वती पा पुणे मालूम दानद् सुहूरसन + समान अर्बैन अलफ विनायेक भट ठकार कुलकर्णी मौजे मजकूर हुजूर ( मालूम ) केले जे आपले कुळकर्णे मौजे मारचे असोनु पुणाचे देशकुळकर्णी हरकती करुनु आपले निांचा म्हणण पांचकुडवी ठेविला आहे व मोकद्म हि इस्कील करुनु पाठी राखताती आपले अकरा गाव कुळकर्ण व जोतीस मिरासीची याचा महजर हि आहे आणि हाली हरकती करिताती दरीबाव सरजाम होये मालूम जाले विनायेकभट ठकार याचे कुळकर्ण मिरासीचे असोनु पुणाच्या देशकुळकर्णी याचा मुतालिक ठेवावयासि काय बजीत आहे दरीबाब ताकीद असे याचा मुतालीक हे होउनु जो ठेवितील त्याचे हाते गावीच्या कुळकर्णपणाचे काम घेत जाणे उजूर असिलिया देशकुलकर्णी याचा मुतालीक जो ठेविला असेली त्यासि हुजूर घेऊनु येणे असेली कागद् कुळकर्णी-यापासी फिराउनु देणे छ २६ रमजानु मोर्तब सुदु रुजु सुरु (!) निवीस

---

१६३७

ले. २९ [ ठकारदप्तर ] १५६९ अश्विन वद्य १२

( वाटोळा शिक्का )

अज द्विवाण ठाणे पा पुणा ता हुद्देदारानि व मोकद्मानि व रयानि मौजे परवती पा मा बिदानद् सु॥ समान अरबैन अलफ हुजरून हातरोखा राजश्री तेथ रजा जे विनायकभट ठकार सो कसबे मजकूर हुजूर येऊनु मालूम केले जे आपली कुलकर्ण मिरासीची देहाये पा मजकूर पैकी बा। महजर सालाबाद पिढी दरपिढी चालिले आहे बि ता।

| | | | |
|---|---|---|---|
| धाइरी | नाद्रोसी | किर्कटवाडी | नेऱ्हे |
| आबेगौऊ बु॥ | आबेगौऊ खुर्द | धनकवडी | पर्वती |
| हिंगणे | मुडदौनी | चाद्रे | |

सद्रहु गावीची कुलकर्ण व जोतीसपणे आपली मिरासीची आहे तियापैकी नव देहासी आपला मुतालीक पाचकुडवी ठेउनु कुलकर्ण व जोसीपन चालवितो बाकी मौजे नेऱ्हे व परवती येथील मोकद्मी हरकती करून पुणाच्या देसकुलकर्णे याचे मुतालीक ठेउनु कुलकर्ण चालवीत होते त्यावरी आपन हुजूर फीर्यादी येत होतो म्हणौनु नेऱ्हेचे मोकदमें आपले कुलकर्ण आपले दुमाले केले आनि मौजें परवतीचा मोकदम देशकुलकर्णी यासि मिलोनु त्याचा मुतालीक पाठी राखताती आपले कुलकर्ण आपले दुमाले करीत नाही दरीबाव सरजाम होये मालूम जाले विनायेक-

---

\+ येथें बाजूस ' रुजू सुद ' अशीं अक्षरें आडवीं लिहिलीं आहेत.

भट ठकार याची अकरा गावीचे कुलकर्ण व जोतीसपन मिरासी महजर हि असोनु परवतीचे मोकदमासी हरकती करावया काये बजीत आहे हाली मौजे मजकुरीचे मोकदमासी ताकीद करुनु याचा मुतालीक ठेउनु कुलकर्णपनाचें काम घेत जाणे जरूर हरकती करीत असतील तरी मोकदमासी व देशकुलकर्णयासि व मुतालकि ठेविला आहे त्यासी हुजूर पाठवीजे उजूर न करणे असली हातरोखा फिराउनु दीजे छ २६ रमजान म्हणोनु रजा बरहुकूम अमल करून तुम्ही तालीक घेउनु असली चिठी फिराउनु दीजे मोर्तब सुदु (मोर्तबाचा शिक्का)

तेरीख १९ माहे सौवालु

सौवाल

---

१६८०

ले. ३० (पुणें, ठकारदप्तर) १५६१ आश्वीन वद्य १२

इजत मा। सिदी अंबर हवालदार व कारकुनु पा। पुणे राजश्री सिवाजि* (राजे......?) सुहूरसन समान अर्बैन अलफ विनायकभट ठकार सेकीन का। मजकूर हुजूर येउनु मालूम केले जे आपली कुळकर्ण मिरासीची देहाय पा। मजकूर पैकी बा। महजर सालाबाद पिढी दरपिढी चालिली असेती बि ता।

| | | |
|---|---|---|
| धाइरी | नादोसी | कींकटवाडी |
| नन्हे | आबेगौउ बु॥ | आबेगाऊ खु॥ |
| धनकवडी | पर्वती | हिंगणे गुडदोनु |
| चादे | • | ० |

सदरहु गावीची कुळकर्णे व जोतीसपणे आपली मिरासीची आहे या पैकी नव देहास आपले मुतालीक पांचकुडवे ठेउनु कुळकर्णे व जोतीसीपणे चाळवितो बाकी मौजे नन्हे व पर्वती येथीले मोकदमी हरकती करुनु पुणाच्या देशकुळकर्णी याचे मुतालीक ठेउनु कुळकर्णे चालवीत होते त्यावरी आपण हुजूर फिर्यादी येत होतो म्हणोनु नन्हाचे मोकदमे आपले कुळकर्ण आपले दुमाले केले आणि मौजे पर्वतीचा मोकदम देशकुळकर्णी यासी मिळोनु त्याचा मुतालीक ठेउनु पाठी राखताती आपले कुळकर्ण आपले दुमाले करीत नाही दरीबाब सरजाम होये मालूम जाले विनायेक भट ठकार याची अकरा गावीचे कुळकर्णे व जोतिसीपण मिरासी महजरहि असोनु पर्वतीच्या मोकदमास हरकती करावया काय बजीत आहे हाली मौजे मा।च्या मोकदमास ताकीद करुनु याचा मुतालीक ठेउनु कुळकर्णीपणाचे काम घेत जाणे जरूर हरकती करीत असिलिया मोकदमास व देशकुळकर्णियासि व मुतालीक

---

* येथें कागद फाटून कांहीं अक्षरें गेलीं आहेत.

ठेविला आहे त्यासी हुजूर पाठवणे उजूर न करणे असेली हातरोखा फिराउनु देणे छ २६ रमजानु मोर्तब सुदु * रुजु सुरु निवीस

रुजु सुरुसूद

---

१६४८ ५

ले. ३१ ( पुणें, ठकारदफ्तर ) १५७० भाद्रपद व. २

प्रतिपच्चंद्र
लेखेव वर्धिष्णुर्विश्व
वंदिता ॥ शाहसू
नोः शिवस्यैषा मुद्रा
भद्राय राजते ॥

अज रख्तखाने राजश्री सिवाजि राजे दामदौलतहु बजानीबु कारकुनानी हाल व इस्तकबाल व देशमुखानि पा पुणे बिदानद सुा तिसा अर्बैन अलफ दरींविले श्री विनायकभट बिन रामकृस्ण भट ठकार सेकीन कसबे पुणे पा मा यासि इनाम अजरा मन्हामती मौजे खुंस कर्याती मावल पा मजकूर दीधले असे देखील नख्त व महसूल व पायेपोसी व खर्चपटी व पाडेवारि व सेल बेल व मोईन सादिलवार व बाजेबाबा व पटिया हाल व पेस्तर ज्या होतील त्या व तूप व बकरे व कडबा येन जिनस व वेठी बेगारी कुलबाब कुलकानू सेरीज ठाणे दीधले असे दुमाले करणे दरहर साल सुर्दखताचा उजूर न करणे तालीक घेउनु असेली सुा फिराउनु देणे औलाद व अफलाद चालवणे मोर्तब सुद ( मर्यादेयं विराजते ) रुजु सुरुनिवीस

तेरीख १५ माहे साबान

साबानु

---

१६४९

• ले. ३२ १५७१ श्रावण शु. १३

श्री सके १५७१ विरोधी नाम संवतछरे स्त्रावण सुध त्रयोदसी सुरुवार त दिसी अनाजी नामाजी यासि मल्हारजी आपाजी येसवतराऊ देसमुख पा सिरवल सुा खमसेन अलफ कारणे तुम्ही येऊनु बोलिलेती जे आपण रामाजी विठल देस-कुलकर्णी पा सिरवल यांसि शरीर समधु केला या निमित्य आपण आपण आपला जागा विजापूरचा टाकून कसबे सिरवली रामाजी विठलाच्याच वाडीयात राहिलो तीही जागा देऊनु + घर बाधविले आपण घर बाधोनु आपण सतोसरूप

---

* याच्या पाठीवर " कुलकर्ण विनायक भट परवती पा सिवाजी राजे " अशीं अक्षरें आहेत.

+ येथें मल्हारजी आपाजी याचा मराठी वाटोळा शिक्का आहे व त्यांत नांगराचें चित्र आहे.

होतो शाहाजी राजे धरिली त्याचा लेक सिवाजी पुरंधरी बैसोनु दि्वाण नामजादीसी झगडो लागले सर सुभेदार फत्याखान तीही शीरवलास फाजील शाहा व आशाफशा पाठविले तीही कोट पा। मा। बलाविला त्यावरी पुरधरीहून सिवाजी राजे धाविनले झगडा जाला ते वरुती कोटकरी यानि रामाजी विठलाची कौलारे घरे जालीली ते वरुती आपलेही घर जळाले आहे आपणास कोटानजीक घर बाधावयासि तकवा होत नाही तुम्ही ब्राह्मणाचे छत्र आह्मा आ।ण आजवरी तुमचे संतोसे होतो तुमची सुसंगती न टलावी म्हणोनु तुम्हासी पुसावयासि आलो आहे आपणास घरठाऊ मध्यस्त याल तरी तेथे घर बाधोनु राहून यावरी आम्ही विचारून तुम्हांसी जागा नामाजी ढेकुणा जुनारदार त्याचा वाडा आहे त्याचे लेक कृस्णाजी व माहादाजी मेले त्यांचा वौश बुडाला आहे त्या वाडीयात तुम्हांस घर बाधावया जागा पूर्व पस्चम गर्भी रुंदी हात तेरा १३ दिधला आहे वाडा उतर दक्षण आहे सो तुम्हास आपण मनापासून आत्मसंतोशे दिल्हा आहे तेथे तुम्ही घर बाधोनु नांदणे तुह्मासी मिरासी करून दिल्ही आहे यासि आनसारिखे करूं तरी आह्मास आमच्या पूर्वजाची आण आसे हे लिहीले पत्र सही

---

१६४८

ले. ३३ — १५७१ फाल्गुन शुा ७

( फारशी शिक्का )

ई कौलनामा आज दि्वाण ठाणे पा। सिरवल मुजाफत किले कोंढाणा तां आली बीन मनाजी दि्वटा चाकर ठाणे पा। मा।र सु।। खमसेन आलफ दिल्हा कौलनामा येसाजे तुझे बाबे मल्हारजी आपाजी देसमूख पा। मा।र मालूम केले जे दि्वटीया मजकुराचे वडील ब्राह्मण बोलीस नादत होते यावरी तो जागा कारकीर्दी मुला महमद याणे टाकिला त्या जागीयावरी लोकानी घरे बाधिली यावरी कारकीर्दी जा।याणापत तिही कोटा नजीक देसकुलकर्णी याचे वाडे होते ते मोडिले त्यावरी हा जागा त्यासी दिल्हा होता हाली कोट पाडिला देसकुलकर्णी आपल्या वाडीयावरी गेले यावरी देसकुलकर्णी याचा यारिदीयासी तो जागा दिल्हा होता तेही नादत होते यावरी गलबला जाला तोंही जागा टाकून गेला हाली तो जागा आनतराऊ ह्मणे त्यासी मिरा [ स ] करुनु दिल्हा आणि या जागीयाचा मुबादला जागा राम सुताराच्या घरा खालता घरकुसा नजीक दिल्हे आहे याणे गावकुसु न घालावे येसा नेम करूनु सदरहू जागा दिवट्या मजकुरासी मिरासी करूनु दिल्हीया घरवाडा बाधल ह्मणोनु मालूम जाले बराये मालुमाती खातिरेसी आणोनु तुझे वडील ब्राह्मण बोलीस नादत होते तिही तो जागा बहूत दिवस का।[1] मुला महमदपासून टाकिला

---

१ का। = कारकीर्द.

यावरी ते जागा लोक नाद्त होते का। जायेणापत देसकुलकर्णी यासी सद्रहू जागा दिल्हा होता देसकुलकर्णी आपल्या वाडीयावरी गेले यावरी देसकुलकर्णी याचा यारिदी यासी जागा दिल्हा होता हाली तो जाग आनतराऊ ह्याणे त्यासी मिरासी करूनुं दिल्हा या जागीयाचा मुबाद्ला तुज जागा राम सुताराच्या घरा खालते घर गावकुसा नजीक मिरासी करूनु दिल्हे आहे तुवा घरवाडा बाधोन राहणे या जागीयाचा मिरासीदार कोण्ही उभा राहिला तरी त्या या जागीयाचा मुबाद्ला जागा देऊनु हा जागा नेदू गावकुसू तुज न लाउ गाव लोक घालतील तुवा कोण्हे बाबे शक आदेसा न करिता सद्रहु जागा तुज मिरासी करूनु दिल्हा आहे ते जागा वाडा बाधोन राहणे तुझे बाप भाऊ दो वाडा दिल्हा असे सुखे आसणे
तेरीख ६ रबिलोवल ( मोर्तब सुद फारशी अक्षरें )

---

१६५०

ले. ३४ शके १५७२ भाद्र. शु. १३

फारशी शिक्का

रवा करायाचे नेम बी हुजूर हजीर मजालसी पा सिरवल सु॥ इहींदे समसेन आलफ

देऊ सालवी बीन भट सालवी आपवादी कुमार — बाल सालवी बीन हैभट सालवी पछम वादी कुमार

या दोघामधे दिवाणीच्या पाने व तस्रीफेचे भाडण आहे याबद्ल देऊ सालवी कुमार याणे रवा करावा बाळ सालवी याणे साउली करावी येसा तह दिल्हा
तेरीख ११ रमजान ( फारशी शिक्का )

---

१६५०

ले. ३५ शके १५७२ भाद्रपद शु॥ १३

( फारशी शिक्का )

तकरीर कर्दे बो देऊ सालवी बीन भट सालवी कुमार मेहतरे पा सिरवल पा मा।र सु॥ इहींदे समसेन आलफ केली तकरीर येसीजे कसबा व पा मजकुरीच्या कुमारपणाचे मेहतरीकीच्या तरफा दोनी आहेती यासी आपली दिवाणातील पाने व तश्रीफ आधी आसोन बाल सालवी दिवाणातील पाने व तश्रीफ घेतो तरी आपण रवा करीन दिवी उतरेन आन्याथा लागे हे तकरीर सही ( फारशी शिक्का )
तेरीख ११ रमजान

---

१६५०

ले. ३६ शके १५७२ माद्र० शु॥ ११

( फारशी शिक्का )

दरबद्‌गी आज दिवाण ठाणे पा॥ सिरवल

या॥ बो दाद्‌ माहाला बीन माल माहाला व पील माहाला बीन म्हत माहाला हजाम मेहतरे का॥ सिरवल पा॥ मा॥ सु॥ इहीदे खमसैन आलफ लेहोनु दिल्हा जमान कतबा येसीजे ही जमानती या॥ बाल सालवी कुमार मेहतरे का॥ मा॥र यासी आपण जमान असो सा॥ नफर मा॥रामधे व देऊ सालवी कुमार मेहतरे का॥ मा॥ या दोघामधे दिवाणातील पाने व तश्रीफचे भाडण आहे या बदल नफर मा॥र रवा करील जैसा निवाडा होईल तेणे प्रमाणे वर्तवावे साधले देवावे तुटले आर्थी निवारावे ये सबबे जमान असो जा व प ल तर हजीर करून हजीर करू न सको ते त्याचे निसबतीचा जाब करून हा जमान कतबा ( फारशी शिक्का )

तेरीख ११ रमजान

---

१६५१

ले. ३७ शके १५७३

झाडा गैरमहसूल पा॥ सिरवल सु॥ इसने खमसैन आलफ इा आवलसाल ता॥ छ १० जिल्हेज

वाघोजी वणजार व निमे मोकदम मौजे जेऊर बा॥ कतबा छ १५ माहे सोवाळ होनु १५०

वासिलु माजी कारकोर्दास होनु

१० येन रोख

८० घोडा १ येकून

२ बैल १ येकून

९२

बाकी होनु ५८

लावण जमा सु॥........प्रज सो मौजे गुळवचे गुरे नग

३ गाई

१ कालवड

४

का॥ जमा सु॥ गुरे चुकरी तरफ मौजे पाडली जमा गुरे

१ बैल

१ गाय

२

जानोजी पाणसरा याणे सालगुदस्ता जकातीची खोती केली होती ते नफर मजकुरास सेकली याबदल नफर मजकूर सेटिये व बकाल मोहतर्फा का॥ सीरवल यासी त व जी मागीमली तीही

सटवो बिन दतु आंबटी याणे मिया अजम मिया साहेब हवालदार किले कोंढाणा या हुजूर मौजे भादे पा॥ मा॥र व गावीचे कानु तुपाचे माप केले आणि रयेतापासी लाजिमा म्हणोनु

नफर मजकुरास त ब जी दिल्हे टके दीडसे नफर मजकुरे सदरहु पैके जका- तीचे सोतीच्या पैकियात दिवाणात दिल्हे हे खबर मिया अजम मिया अबदुल गावीचे तूप घेउनु जात होता रयेतानी गवगवा केला यावरूनु नफर

( पुढील मजकूर गहाळ )

१६५३

**ले. ३८** शके १५७५ मार्गशीर्ष शु॥ ८

तालिक

श्री सके १५७५ विजये नाम संवतछरे मार्गेश्वर सुध आस्टमी वार सुक्रवार ते दिवसी राजश्री माहादाजी राम देसकुलकर्णी ता॥ सिरवल यांसी कोंडाजी लुखदेऊ व विठल लुखदेऊ देसकुलकर्णी पा॥ मा॥ नमस्कार विनती उपरी राजश्री रामाजी- पंतास देव ( आज्ञा ) जाली ते समई आपण जवली होतो राजश्री रामाजीपंत सवध आसतां आतकाली यांचे व आपळे बोलणे जाळे जे पहिले हिसेब कितेब वदल माडत होतो ते समई आपले देणे तुम्हा जवली होते अगर तुमचे देणे आपणा जवली होते याचे कर्ज कतबे सोमाजीचे गुजारतीने होते ते तुम्ही आपले आपणास माहादपंताकडे देऊनु आपले व माहादाजीपंनाची गोडी करूनु देणे त्या वरूनु मते समई राजश्री रामाजी पंती गोडी करून दिल्ही आसे मागील येक तागाईत जो आपला हिसेब होता आगर तुमचा हिसेब येक तागाईत आपणावरी होता त्याचे मते समई रामाजी पंताच्या पायावरी हात उभयेतांनी ठेऊनु लिगाड तोडिले आसे सोमाजीपासी कतबे होते ते तुम्ही आपले आपणास दिल्हे ते पावले हे लिहिले सही राजश्री रामाजीपंताचे वेलेस जैसे वडीलपण चालिले तेच चालउनु हे लिहीले सही उभयेतानी आपले सत्य स्मरोनु चालावे

गोही

यादव केदार देसकुलकर्णी पा॥ मा॥ रामकृष्ण भट वालिये
गोविंदभट वालिये

**• ले. ३९**

दर बंदगी आज दिवाण ठाणे पा॥ सिरवल साहेब सदर

अर्जदस्त अज बंदगी बंदेकमीन कमतरीन बंदे सेरी कर मोकदम मौजे खेड बु॥ पा॥ मजकूर अर्दास जमी पौ ता॥ छ २५ माहे सोवाल मो मजकुरीची बखेर सलाबत असे साहेबी राहुजीपंत तरफदार व दामाजीपंत कारभार व माहादाजीपंत देसकुलकरनी पा॥ मजकूर हे गावास पाठविले जे लावणी संचणी करने म्हनउनु

गांवास आले तो गावीची कुले मोगलाचा गलबला जाहाला त्याने कुलाचे पेव वस्त-भावा नेलीया त्याकरी व हाली मोगळ येताती म्हनउनु वारता आइकिल व साळ-पियाचा घाट व धाडसरीचा घाट या मारगे कटाकाचा मारग पडिला आहे कुलास तकवा निघेना वाटेचे गाव......उनु कुले गेली व कुलाचे गले कडवे वरता बकरी गुरे गेली या करिता कुले गेली आता हि हे धास्ती करिता कुल राहात नाही साहेबी कौल दिल्हा आहे तो कौल सिरी घेउनु जेथवरी कुले गेली आहेत त्याची धानी। करून येक दोघे मेलउनु लावनी करून जे लावनी होईल त्यास साहेबी कौळ देउनु तो कौल चालउनु सचनी केली पाहिजे हे आम्ही रयेतेस जो कौल देउनु तो साहेबी कौल चालविला पाहिजे बद्‌गीस हे आर्दास

---

१६५३

ले. ४० [ पुर्णे, ठकार दफ्तर ] १५७५ कार्तिक व. ३०

( फारशी अष्टकोनी शिक्का )

अज रख्तखाने माहाराज राजश्री शाहाजी राजे दाईमदौलतहु बजानेब कारकु-नानी हाल व इस्तकबाल व देसमुखानी पा। पुणे बिदानद सु।। अरबा खमसैन अलफ रामसेटी सेटिया पेठ बाजार मौजे चऱ्होली पा। मजकूर हुजूर येउनु मालूम केले जे ( पेठ मज )कुरी पेसजी बाजार मामूर होता तो बहुत दिवस मोडला आहे ( या...आपणा )स साहेबी हाती धरून बाजाराची व पेठ मजकूरची मामुरी...... फर्माविलियावरी बाजारास व पेठेस बारा सालचा कौल मऱ्हामती केला मग माहाली आपण कसबे पुणियात जाउनु मामुरीस माहाजन व बिडवे पाहिजे म्हणोनु विनायक भट ठकार याच्या घरास जाउनु त्याच्या गळा पडोन ( त्यांस बो )लिलो जे पेठ मजकुरीचे बिडवेपण तुम्ही मिरासी करून घेणे आपण आपलिया संतोशे तुम्हास देतो पहिला कोण्ही मिरासी बिडवे ना ( ही ऐसे ) बोलिलो यावरी तेही कबूल केले म्हणो लागले जे तुवा आपणा ( बिड ) वेपण देतोस तरी तु काही मुकासी नव्हेस जैसे बोलतोस तैसेच माहाराज साहेबाचे खुर्दखत करून देणे व माहाली महजर करून देणे ऐसे बोलिले इतकेहि आपण कबूल केले आणि त्यांस माहाली आपण बिडवेपण दिधले यावरी ( पेठ ) मजकुरी आपणा बराबरी कस्ट मशाखती करून पेठेची जुजवी जुजवी मामुरी हि केली व पेस्तर हि करितील तरी साहेबी मनास आणोनु बिड ( वेपण वि )नायक भट ठकार यासच दिल्हे पाहिजे दरम्यान साहेबी पेठ मजकुरीचे बिडवे ( प )ण रेणकोजी देवकर यास दिल्हे आहे तरी भट मजकुरावरीच साहेबी मेहरवान होउनु रेणकोजीने बिडवेपणाची सनद करून घेतली आहे ते रद्द करून विनायेक भटास मऱ्हामती करून खुर्दखत दिधलीया पेठेची व बाजाराची मामुरी होईल म्हणोनु रामसेटी मजकुरे हुजूर अर्ज केला बराय मालुमाती

खातिरेसी आणोनु वेदमूर्ती राजश्री विनायेक भट ठकार सो कसबे पुणे यावरी साहेब मेहरवान होउनु मौजे चन्होलीचे पेठेचे बिडवैपण मिरासी करून दीधली असे याचे हाते पेठ मजकुरीचे बिडवैपणाचे काम घेत जाणे आणि भट मजकुराचे नावे ठाणाहून महजर हि करून देणे उजूर न करणे दरम्यान रेणकोजीने आपले नावे बिडवैपणाची सनद ( घे )तली आहे ते रद् असे विनायकभटाचेच हाते बिडवैपणाचे ( काम घेत ) जाणे यास जो कोण्ही इस्कील करील त्यास ताकीद् करणे तालीक लेहोनु घेउनु असेली खुर्द्खत विनायकभट ठकार या पासी परतोन देणे मोर्तब

तेरीख २९ — माहे जिल्हेज

जिल्हेज — रु सुरु सुद

रा। बार

---

ले ४१ ( चां. सर. )

( महजर ) तेरीख २९ जिलकाद्

+ + हाजीर मजालसी

+ + + व बा कि

+ + + पा। मा।

शामराज व सभाजीराज कोट देशमूख पा। मा। माहादो लखमदेऊ व खखो गोमदऊ देशकुलकर्णी पा। मजकूर

नाईकवाडी

ईतबारखान — अभगराऊ

+ विराऊ — बाबाजी मारन्या

येसवतराऊ

शकरराऊ गौडी मोकदम मौजे माजगाऊ

खखोजी गावडा मोकदम मौजे वागज

गगाजी खालाटा मोकदम मौजे लाठे

कनकोजी खालाटे मोकदम मौजे रटणं

दुख पाटील व जाण पाटील मोकदम मौजे वाकी

मल्हारजी व म्हकाजी व रतनाजी व माउजी व बाकोजी चौगुले मौजे लोणी

राजश्री मुधोजी + + बाजी हवालदार व यादवजी मज+दार राहुजी कुत+ व मल्हारजी सा+ुडा व जाउजी+व हिरोजी भाडि + गोमाजी माल + व विठोजी व तु(क) सेटी सेटीये कसबे मजकूर

द्कोजी व हि (रो) जी व रामाजी आटोळे गौडी मोकदम मौजे सिरसफळ

साउजी व मळुजी खोमणे गौडी मोकदम मौजे मालथलबुजरुख हिरोजी आटाले मोकदम मौजे गोनबावी का। बारामती

कनकाजी ताविरा मोकदम मौजे आबी बु।

राउजी खोमणा मोकदम मौजे कोलंबवे खुर्द

कान्होजी व मळजी भादकर मोकदम मौजे तरडोली मोकदम मौजे नाकेली नागोजी नावडीकर अजहती देशमूख ता। खेडेबारे

+ गोजी अजहती यसवतराऊ व
हिला मौजे मुडिले व माणकोजी चौगुळा
माण पाटील सुरवा मौजे मौजेगऊ-
ङिहर ता। खेडेबारे-

सु॥ समसैन अलफ श्री सके १५७१ विरोधी नाम सवछरे मार्गसीरस सुध १ तद्दिनी नीळकठराऊ मोकद्म तकसीम ३ मौजे सुपे सु॥ पा॥ मजकूर यासि महजर करून दिधला ऐसा जे मौजे मजकुरीची मोकद्मी बाद्ल लकडे व काटकर भाडीत होते लहडे परागदा जाले यावरी काटकर मोकद्मी करित होते या करिता गाव कीर्दी न व्हे दिवाणीचा पैके देवया मवसर नाही पहिले गाव दाहाविसा होनावरी उगवत होता यावरी गावास पैके बहुत पडो लागला गावी मरासीदार प्रज नाही उखाती पासती लाऊन उगवणी करिता गावाची तुटी येऊ लागली ते देवयासि काटकरास मवसर नाही या बद्ल कारकीर्दी हैबतखान नामजाद दौलतामगऊ गोद गावडा रोड यास निमे तकसीम महजर करून मोकद्मी दिधला होतो दोघे दौलाई खाता गोद गावडियास दौलतमगली दस्त करून नागवण बाधली त्या करिता नफर मजकुरानी घसरोन व काटकर हि निमेची उगवणी करिता तोहि मुफ+रस जाला त्यावरी माहाळ राजश्री महादाजी राजे यास मुकासा जाला ते वख्ती गोद गावडा व काटकर दोघे हस्त करून आणिले गोद गावडा गावडा निमे मोकद्मी मौजे मजकूर येगे गावीची बाकी झाडा करून काटकरास द्यावयास मवसर नाही याबद्ल आदुपखानी राखिले यास जमान अभंगराऊ नाइकवाडी मौजे मजकूर होता त्यास जमानतीचा तागादा लाविला मग अभगराऊ मुधोजी मायबार यास मोकद्मी देत होता तो कबूल न करीच मग निळकंठराऊ गोसावियापासी जाऊन त्यास निमेचा निमे मोकद्मी लेहोन दिधली त्यावरी निळकंठराऊ व काटकर व गोद गावडा मोकद्म मी चालवीत असता गोद गावडीस स ठाणा नागविले त्यास देशमूख जमान जाले थोडीबहु उगवणी केली राहिले बाकीबद्ल गोद्ल गोद गावडा पळोन गेला जमानती काटे देशमूख यावरी पडिली या बद्ल गोद गावडियाची निमे तकसीम शामराज काटे देशमूख मोकद्मी करू लागले त्याचा सडी गोद गावडीने करून मोकद्मी सोडिली काटकर भाडो लागले वेव्हारास थालोथली हिडो लागले मग काटकर व गोद गावडा समजोन मोकद्मी ति ठाई केली काटकर व गोद गावडा नामे निळकठराऊ गोसावी यासि कागद लेहोन दिधला तेथे मजमुन जे श्रीसके १५७१ विरोधी सवंछरे आश्वीन विद्री पचम सोमवार ते दिवसी राजेश्री निळकठराऊ यासि-

| | | | |
|---|---|---|---|
| केशजी बिन गोजी | नागोजी बिन येकोजी | खेडोजी बिन केशजी | बाणजी बिन केशजी |

विन० १

काटकर मोकद्दम तरफवार मोकदम मौजे सुपे खुर्द सुा समसैन आलफ लेहोन दिधले यैसे जे मौजे मजकुरीची पाटिलकी आपली यावरी दुकळ पडिला लावणी उगवणी होवयास ना व खावयास हि नाही याकरिता सके १५-

निमे मोकदमी गा + +ची पाटिलकी गोदगावडी धनगर मौजे मजकूर यास महजर करून ( का )ली पाढरी देखील उ ( म )न दो ठाई दोघे जणी खावे यैसा महजर करून दिधला आण व गोद गावडा दोघे दो ठाई दोघे काली व पाढरी वाटून गावीची कीर्दी क ( रू ) न आसता गाऊ रकमेने राजेश्री मवाजी रा राजे याचा मुकासा उगवत आसे निमे गोद गावडा आपले तर्फेची उगवणी करीत गेला निमे आपले तर्फेची उगवणी करीत गेला निमे आपले तरफेची बेरीज उगवणी न व्हो कुळ नाही देणे ते आपलीया घरे यावे यैसे रीतीने आपण बळदार जालो खावयास मवसर नाही उठोन पलोन जावे तरी कोठे हि गेलियाने बाकी सुटे ना याकरिता आपली तरफ आरधी यातून निमे समुदिया गावाची चौथी तकसीम अभगराऊ नाईकवाडी पाा मजकूर आपण दरमियान घालून चौथी तकसीम गावीची आपलियातून निमे काली व व पाढरी बाो उतपन पैके व गळा तुम्हा पासून घेऊन विकत होन पाा २३ व गला ४॥ तुम्हा पासून घेऊन विकत श्रीशके १५- दिधली येणे प्रमाणे घरवाटा आपले घराचे दक्षणेस श्री बहिरवाचे पूर्वेस व सेत कुळ उतपन वाटून दिधले गोद गावडियाचें उतपन दिधले व गोदवडियाचे महजरी होलीची पोली वरकड लेहोन दिधले आहे आहे यास यास पोली लाऊ दिधली नाही गावास जमान अभगराऊ गोद गावडियास घेऊन ठाणियास गेला तेथे राजश्री मुधोजी मायेदेऊ इही गोद-गावडियास धरून मार करून करार होन बाधला यास जमान काटे देशमुख यांचे अजहतीदार जमान सोडिला गावास येउनु करार पैकी पैके बहुतेक उसुल केला तमाम गुरेढोरे विकून दिधली बाकी होन उरले इतकियात पलोन कुळ लेकरे बाइल घेऊन पलोन गेला गावीची धनगराचे तरफची सचणी व करार पैकी बाकिची उगवणी जमान काटे देशमुख त्यास त्यावरी देशमुखी पाटलिकीचे तरफेस माणूस व सेतास बैल व सेतकरी पाठऊन पाटिलकी गोद गावडियास त्याचे तरफेची करूरून सेत पाहोन निमे गावीची काली व पाढरीचे उतपन गोद गावडी-याचे खाऊन दिवाणीची उठावणी करून साले तीन पाटिलकी खादली यावरी पाा माा खान अजम अतसखान साहेयास मुकासा जाला कुतवल व काटे यास देशमु-खीचे लागले काटे हुजरून खान साहेबाचे खुर्दखत घेऊन माहालास येऊन देशमुखी करूरु लागले यावरी गोद गावडी धनगर सोइरीबाई धर्मोजी काटे याची बहीण व अऊबाई स्त्री व शामराज पुत्र कारभारी यासि भेटी घेतली तिही यैन बाकि होन व सेताचे लागवडीचे व गावीचीया वसुलास यैवज होन हरसाल वासिलादी जाली ते

कुळाची वासिलाती वजा धरून बाकीची बेरीज होन केली यासी होन १५०
खडिणी करून व गोद् गावडी याने सुरोजी हारधा मोकदम मौजे कोंगीत हुा दरमियान
घालून घोडी लोकाची घेऊन व नस्त देऊन उगवणी करून आपले निमे तरफेची
पाटिलकी बो काली व पांडरी व सेत देशमुखापासून सोडून करू लागला यावरी
खान अजमखान साहेबी पा मजकूर सर्जाराऊ सुपे ( क ) र यास मोकासा दिधला
देशमुखी करु लागले गोद् गावडा धनगर बाहेर गेला आण धनगराचे
तरफेची पाटीलकी करू लागला त्या तरफेचा कुळापासून पैके व गला उचलून आण
खादला येसी दोनी साले करमली कुळाचे पैके व गला खादला तो आपणापासि
थारला यावरी शके संवच्छरी कोंढाणियावरी ना ( म ) जादी आले
विलायत तमाम लूटली या कारिता आपला गाव कुळ जालिला राजेश्री राजे साहेबी
गाऊ कबज करून पैके घेतले व ना ( म ) जादीने गुर नेऊनु खडिणी घेतली जा
कुलाची गुरे सोडिली ते हरगी केली येसा गावीचा बोळ जाला व गोद् गावडा
आपले पाटीलकी,च्याकर कारिता गाऊ खराब प्रज नाहीत गाऊ न लगे दिवाणीची
उगवणी जाली पाहिजे याकरिता पा मजकूर राजेश्री माहाराज साहेबास मुकासा
अर्जानी जाला येथील राजेश्री राजे साहेबी गाऊ तुम्हास मुकासा दिधला गावीची
लावणी ती तरफची आ ( प ) णास फर्माविली आ (प) ण लावणी करिता गोद् गाव-
डीयाने दुन्हाई देऊन सेत लाऊ ने दी हे आ(प)ण येऊन सागितले यावरून गोद्-
ग वडास बोलाऊन आणिले व आ (प)णहि आले दोघासी सागितले की आजीवरी
जैसे तैसे तुमचे भाऊपण चालिले आता भाडावयाचे प्रयोजन नाही जमान देऊन
गोतामधे जाणे तेथे निवाडा होईल तैसे वरतणे यावरी आपण मौजे भिऊडीचा
मोकदम जमान दिधला गोद् गावडियाने फिरगोजी मोकदम का सासवडी याचा
जगानकतबा दिधला येसिया जमाता करून काळभाराचे लोणीस दोघास कागद्
देऊन पाठविले तेथे लावणीचे उतर लोणीचीया मोकदमी मानास आणिले थळ
मौजे बोपे पा चाकण तेथे बेहारे पाठविले तेथे जाऊन दोघी आपली उतरे
सागितली तेथे दिवस होते तेथून दोही निवाडियाचे कागद् घेऊन आलो नाही
आ(प)ण व गोद् गावडी उगेच गावास आलो यावरी उगेच दोघास बेहुजूर आणिले
गाउ कीर्दी करून चाली लाविले पाहिजे तुम्ही गोताचे निवाडियाचे कागद् आणून
देणे येविसी दोनी चारी मुदती मागितलीया, सेवट दोघे येऊन बोलिले जे
आ (प) ला निवाडा गोतामध्ये न व्हो येथे आपण समस्त गोद् गावडी धनगर व
लेक बापूजी व आपण बैसोन विचार केली की गावीची उगवणी लावणी सचणी
जाली पाहिजे पाटीलकी निमे दिधली त्या बोले चालविली नाही म्हणऊन बेव्हार
सागितला व सागावा तो भोगवटा व महजर तरफ होउनु चाळते याकरिता गोतही
भोगवटियावरी जाऊन निवा + + याकरिता आपण व गोद् गावडीयाने विचार

करून बोलिलो की ति ठाई करावे आजमास टके ४॥० दो॥ इनामती व पाडेवार कुल कास तह कदीम यास तकसीम चवथी दो॥ इनामती व पाडेवार टके १०६ यावरी हाली रुके ०१६ येकूण टके १॥० दो॥ काली व पाढरी तुम्ही घेणे आपण दोघानी सुखे दिधली गोद् गावडियाने तिसरी तकसीम टके १॥० आपण तिसरी तकसीम टके १॥ येणेप्रमाणे काली व पाढरी हक व इनाम सेवदार दो॥ झडीझाडे ते व अडाणी ते घेऊण ति ठाई काळी व पाढरी तिघे जण ती ठाई काली व पाढरी ती ठाई वाटून घेणे पहिले चौथी तकसीम समुदी या गावाची विकत देऊन महजर करून दिधळा आहे तेथे नाम आधी तुम्हास दिधले आहे यावरी गावातून ठाणियास आर्दास पाठविता आधी तुमचे नाव तुम्हा मागून आपले नाव अणि मागे गोद् गावडियाचे नाम येसे लेहोन आर्दास लिहीत गेलो ठाणाहून मोक(द)म म्हणऊन मोघम नाव येत गेले याकरिता आपण पाने आधी तुम्हास दिधली ठाणियामधे व गावामधे आधी तुम्ही पाने घेणे तुम्हामागे आपण घेऊन आपणामागे गोद् गावडा घेईल ठाणाची आर्दास व कतबा नागर आपण करून दिवाणातून लुगडी इतील ती तीन मागोन घेऊन आधी आपण घेउनु यावरी तुम्ही घेणे तुम्हा मागे गोद् गावडा घेईल येकीच तश्रीफ आली तरी ती ठाई वाटून तेथे च तिघा जणी सदरहू प्रमाणे घेणे व नागर दसरा दिवाळी म वई व जेस्टा देवी व वाजे सण येथे वाजवितील ते आपले येके घरी आध वजवावे या उपरी तुमचे घरी तुम्हा मागे गोद् गावडी याचे घरी व गणेश गवरी शिराळशेटी आपलालिये घरीहून वालियाचीया देवळास आणावे तेथून वाजवीत पाणियामध्ये टाकून वालियाचिया देवळास येऊन वाजत्रीयास निरोप देऊन आपलिया घरास जावे मग गुरवे आपळाली घरास येऊन आसवद् घेणे याज उपरी तुम्ही देणे तुम्हामागे गोद् गावडि याचे घरी घेणे होळीस पोली या आपण व गोद् गावडा तिघे जणी तीन पोली या यकवट करून साबास बाधोन होळीमध्ये साब उभा करून होली लावावी लागलियावरी पुजा तिघी जणी करावी आपलालीये तरफेस विहे वराडे कार्य प्रयोजन गोधळ होईल तेथे टिळा विडा वीटा हक उतपन जावे तरफेस होईल त्याणे घ्यावे दुसऱ्या तरफदास निसबत नाही गाव म्हणऊन दोघा जणास बाराबरीने जवायासे नेतील तरी दोघाजणी बा॥ जाऊन जेवावे हक उतपनास काही निसबती नाही गावामधे पटी करावी तीवरी नागर आ(प)ण आपलालिये तरफेस तीघी जणी तीन नागर करावे अपलालिये तरफेस कुळास कौलू देऊन नागर करावा आपलालिये तरफेस साधेल ते घेवे तुटेल ते ई व दुसरे तरफेसी निसबती नाही अणी गाव धणगर सुतेकरी व साली कोस्टे व तेली तांबोळी व मोहोतर्फई कुले याचे घरी वह वराडे कार्य प्रयोजन होईल तेथे तीही जणी बैसावे सदरहूप्रमाणे टिळा विडा घ्यावा व वऱ्हाडी वाटी येईल ते जोसि याने काढून ती ठाई करावी वाटून देवांजे

घातले तरी तीघी जणी जेवावे कासाराचे घरी गुढियाचा पाडवा व चैत्री पुनीव व स्रावणी पुनीव व कुलधर्म करील तेथे हक उतपन फळवरा येईल तो तीघी जणी वाटून घेणे गावामधे पाळनुक व सोडी होईल ती तीघीजणी वाटू (न) घेणे यावे जमा दिवाणातून मजुरा घेउनु ती ठाई तीही जणी घेणे हुडियाचे पोटी पासोडी पाळणुक घेऊन तीही जणी वाटून घेणे व गावामधे पेठ बाजार तेथील हक उतपन सेवधार पानसुपारी येईल ते तीही जणी ती ठाई वाटून घेणे गावाचिया तर्फ करावयास तीन हमतोऊ स्राव (व) सते करून यावरी अवघा सिवार बो वाडी व डोंगर व दरे व उडाफ मळई या बा ती ठाई वाटून तीही जणी आपलालेया तरफ घा घ्यावी या हमशाही गावीचे मोकदम बोलाऊन तरफ करितील तेणेप्रमाण तीघी जणी तीन फरक घेविया इनामती व वाडीयास पासोडी दल्हे आहे ते ती ठाई वाटू (न) तीही जणी घेणे थरे भौरीप होईल तैसा हुडीस करावे त्यास त्याग आधी आपण घालून आपणा उपरी तुम्ही घालणे तुम्हामागे गोद् गावडा घालील व पाटीलकीचा माहार तीघी जणी ती ठाई वाटून घेणे मुदतीप्रमाणे येका माहाराची रावणूक तीही जणी घेणे बलुते व तराळाचे पाणी ती ठाई घेणे आपलालीये तरफेस आबराई व चिचा व बाजे झाडोरा व बागाईत जाचे तरफेस होईल त्याणे आबराई व चिचा बाग बाजे उतपन घेवे दुसरिया तकसीमदारास निसबत नाही कदीम आबराई व चीचा आहेत तेथील उतपन वानवला येईल तो तीही जणी ती ठाई घेऊन व इनामाचे आंबे व चिचा व भागाचे आबे आहेत ते ती ठाई वाटून घेजे सळे पाटी वानवळा आपलालिये तरफस आपलालिय तरफस कुलापासून घ्यावे तेथे दुसरिया तकसिमदारास निसबती नाही येणेप्रमाणे तुम्हास तिसरी तकसीम आज कास मौजे (१) टके ४॥० दूखील पाडेवार व इनामती व पाडेवार टके १॥ गोद् गावडियाची तकसीम येणेप्रमाणे केली व पाढरी हद्मोहद् तरफा करून तुम्हास तिसरी तकसीम समुदिया गावाची दिधीली आहे सुा समान सबैन अलफ(१)सालाकारणे मौजे मजकुरीची उगवणी व सवणी दो धनगर ता तिसरी आपलिया निसबती आपली निसबती चउथी तकसीम तुमची येसी मौजे मजकुरी उसवणी मौजे मा वरी बाकी महाळग राहिली बितपसील

| | |
|---|---|
| होन पातशाही | गला बाा यकूनु सडी |
| ६२॥॥० | १७॥ पैकी वजा नकसान |
| | २॥० नुकसान |
| | ३ ~— ·॥ येन |
| | ५ ॥ ०॥० |

यासि वजा ता चौथी तुम्ही उगवणी केली बा हिसेब कुळकर्णी

| | |
|---|---|
| होन पा | गला सडी १।२॥ बाकी |
| १३।० | १।~॥· |

बाकी आपली ता। पैकी उरेली

होन पा।          गला खडी

४९।~          ४०३॥०

येणेप्रमाणे आपले तरफेचा बाकि उरली आ ( प ) णास दिवाणीयाचा तागादा लागला द्यावयास येवज नाही मग आपण येऊन तुमचे सेवेस विनती केली सद्रहु बाकी आपणापासी देवयास जागा नाही तरी आमचे निसबतीची बाकी दिवाणात देणे याचा आम्ही व गोद् गावडियाने विचार करून तुम्हास गावीची तिसरी तकसीम दिधला आसे सद्रहूप्रमाणे हक उतपन काली पाढरी लेकराचे लेकरी तिसरी तकसीम मोकद्मी खाणे आम्ही व गोद् गावडा दोघे जण दोनी तकसिमा दो ठाई खाउनु सद्रहूप्रमाणे तुम्ही व आपण व गोद् गावडा लेकराचे लेकरी सद्रहू प्रा। खाऊन असावे यास आपण व आपले वसीचा कोण्ही हिला हरकती करील त्यास श्री देवाची आण व गोताची आण दिवाणाचे गुन्हागार येणप्रा। गोद्गावडियाने लेहोन दिधले याची हर निसबती गोद् गाद् गावडियाने लेहोन दिधले व नीलकंठ राऊ गोसावी यानी लेहोन दिधले येसे तिघानी परसपरे येके येकास लेहोन दिधले तिघाची लिहिली ठाणीयास आणिली ठाणा खातिरेस आणून सद्रहूप्रमाणे महजर करून दिधला आसे मौजे मजकुरीचे मोकद्मी तिघानी तीन तरफा करून ती ठाई वाटून ठाणे पहिले नीलकठराऊ या मागे काटकर त्यामागे गोद् गावडा येणेप्रमाणे लेकराचे लेकरी मोकद्मी खाऊन सुखे आसणे मान सद्रप्रमाणे चालवणे यानी वडिलीया आमळास हिला अगर हरकती करील तो दिवाणीचा गुन्हेगार व गोताचा आन्याई हा महजर सही

गोही

सूरीयाजी बढधा मोकद्म मौजे कोढीत बु॥ का॥ सासवड + पाटील मोकद्म मौजे भिउडी पा॥ पुणे हरजी भीसा मोकद्म मौजे पानवडी नोजी व बाद्पा

बाजी देशमूख + मोकद्म का॥ सासवड गावकरी

---

१६५३

ले. ४२ पुणें ठकारदप्तर          १५७५ कार्तिक व. १०

( सिका फारशी )

ई कौलनामा अज रख्तखाने माहाराज राजश्री शाहाजी राजे ........ ता। वेदमूर्ती राजश्री विनायकभट ठकार से ........ सु॥ अरबा खमसैन अलफ

बादे कौलनामा लेहोनु दीधला यैसाजे साहेब तुम्हावरी मेहरवान
( सिका ) होउनु मौजे चन्होलास नवी पेठ वसविली आहे तेथील बिडवेपण
तुम्हां ........ ती केले असे तुम्ही पेठ मजकुरी घरवाडा बाधोनु
पेठ मजकुरी राहोनु सुखे बिडवेपण करून असणे कौल असे मो

तेरीख २९ माहे जिल्हेज
जिल्हेज
रा। बार

१५५४

## ले. ४३

१५७६ कार्तिक शु १२

मोकदमुल हमसाल मल्हारजी येसवंतराऊ देसमुख व माहादो राम देसकुलकर्णी व सेटीये व माहाजनानी व बकाऊानी व मोकदमानी व रयेतानी व बाजे खुमानी देहाये व मा। पा। सिरवल सु॥ खमस खमसैन व आलफ लिबाजी खडेराऊ मजमुदार आणिला म्हणौऊन दिलगीर + न होणे त्याचे बाबे हुजूर लिहीले असे बुदा करील तरी त्याची सरफराजी होईल तुमचे धनी आम्ही आसे तुम्ही कोणे बाबे शक आदेशा न करिता खा। बहादूरखानाचे रजा तलब आसोन उसुलास व कीर्दी मामुरीस तकसीर न करणे नफराई वरून तुमचे सरफराजे आसे मोर्तब अपुल अहवाल घडी घडी येथे लिहून पाठून दीजे सरांजाम होई कोणे बाबे शक न कीजे खातीरजमा करून उसूल व कीर्दी मामुरी कीजे मोर्तब

( फारशी शिका )

तारीख ११ माहे मोहरम
मोहरम

## ले. ४४

महामेरू अखडीत लक्ष्मी आलकृत राजमान्य राजश्री माहादाजीपत गोसावी यासी

सेवक लिबाजी खडेराऊ नमस्कार विनति उपेरी घरी येथेने ह + + उपद्रव केला आहे तरी सांवाजी वैद पुरधरी आहे तो प्रमाणीक म्हणऊनु आहे कर्ता तरी गोसावी त्याचे समाधान करून त्यास येथे पाठविले पाहिजे बहुत लिहीणे नलगे येविशीया बेदगी लिहीले आहे त्यावरून विदीत होईल बहुत प्रकारी त्याचे समाधान करून सत्वर ये यैसे केले पाहिजे

---

१ ली + येथें बाजुस दोन वाटोळे शिके आहेत.

१६५८

• ले. ४५ ता। १५७८ कार्तिक शु॥ ११

आज रस्तखाने सुदायेवद् खान आलीशान खा॥ अफजलखान महमदशाही खुली दयामदौलतहू ता मल्हारजी देशमुख व महादाजी देसकुलकर्णी पो॥ सिरवल बिद्वानद् सु॥ सबा खमसैन आलफ ... ... साल बसाल दस्तास आणीत नाहीं आमचे मुकासा जाहल्या तागाईत आमचे तरफेने जलल आगर जरा तसवीस होत नसता काये बदल मामुरी होत नाही यावरून आजब मालुम होते देसमूखचे काईदा आहे की विलायेती फिरोन येक तसू पड पडू नेदीता जे पडी जमीन पडले आसेल त्यास नांगरचे व इस्तावेचे कौल बोल देवाऊनु तमाम जिमीन कीर्दी करावे साल बसाल दुस्त चढत आसावे हे तुमचे रवेश आहे येसे ना होता तुम्ही याहीर बैसोनु माहाल पडूनु बसेले आहा तुम्ही बेसक कैसे होऊ पाहता आपला हाक कैसे खाता साहेब काम करून विलायेती मामुरी करून आपले हाक खावे विलायेती पडू(न) हाक कैसे खाता हे तरी खुब नव्हे आता तुम्ही विलायेंतीचे रयेतीसी बहुत वजा सू दिलासा करून कस्त करून नागर धरवीजे येक तसू ना पडीत येसे कीर्दी करवीजे तैसेच तबाकू पुणे विलायेतीसी पेरू देता दिवाणीचे पैके दिवाणासी नेदिता दुरमेने आपण घेणे तुमचे मजल काये आहेत हाकु नुकसान केल था आमला वरून आपली खैरती कैसे होईल हे मालुम होत नाहीं आता तबाकूचे कमावीस कारकून जैसी सागतील तेणे प्रमाणे चालवीत जाणे हाक हिसाबी आमल करीत जाणे हार येक बाबे आपले इकीनपणे आसोनु दिवाण सरफरा रयेत राजी साल बसाल चढ दुस्त देत तुमचे मुजरा होत येसे आमल कीजे यामधे तुमचे बुबा व सरफराजी आहे रात दिस कारकून नजीक आसोनु नफरीसी तकसीर न कीजे पा॥ हुजूर मो॥ +तेरीख ९ मोहरम.

---

१६५८

• ले. ४६ श. १५८१

समापत्र माहादाजी राम व यादव केदार व विटल लुखदेऊ देसकुलकर्णी पा॥ सिरवल सु॥ सितेन आलफ गलबलीयाचे + + + आहे तुतरफा पादशाही ...... आहे ...... याने जे बरे होईल ते तिघाचे व वाईट होईल तेही तिघाचे आगर आगर मागते राजयास सलीयाखाले देश आपला दिल्हीयाने बरे वाईट होईल ते तिघाचे हे पत्र सही

बीकलम माहादाजी राम पत्र प्रमार्ण कबूल असो

यादव केदार पत्र प्रमाणे कबूल आसो

( विठल ) लुखदेऊ पत्रप्रमाणे कबूल आसे

---

+ श्री नकल शिवकालीन आहे.

(७) ले. ४७

॥ श्री शिधेश्वराय नमः ॥

स्वस्ति श्री नृपशालिवाहन शके १५८१ वर्षे ॥ विकारी नाम संवत्सरे ॥ भविष्य जाहाले ॥ येशा पंढरपुरीचा विठल मुर्ती काडिली तुळजापुराची मुर्त्ति काडिली । कोलापुराची माहाल्क्षुमीची मुर्ती काडि होती तिन महिने ३ रवळनाथाची मुर्ति काडिली विजापुरामध्यें ॥ अलि पातशाय असतां ॥ त्याचा वजिराने केलें ॥ त्याचें नाव अब्जलाखान ॥ त्यास मारीलें ॥ शिवाजी भोसला ॥ शाजीचा लेंकाने । मार्गशिर पंचमिस ॥ जावाळि मध्ये मारीला माहापापि ॥ होता मार्गशिर वदि ७ शनिवारी पनालें घेतलें शिवाजी भोसल्यानें शाजिचा लेके पातशाय अस्तां सिंहस्त बृहस्पति आला होता पुष्य शुध चतुर्दशी १४ शनिवारी वाळव्यास शिवाजी भोसला त्याचे लोकानी पनाल्या होऊन तोरण बाधलें ॥ असे भविष्य जाले*

---

ले. ४८

राजमान्य राजश्री मल्हारजी देसाई पा। सिरवल गोसावी यासि

श्री मसुरूल हजरत अखडित लक्ष्मी प्रसंन परोपकार मूर्ती माहामेरू राये राजमान्य राजेश्री प्रतीपूर्वक गोरखोजी दिनकरराऊ काकडे सुमेदार सुभा + जोहार विनति क्षेम जाणऊन् ...... यांनि आपले कुशल लेखन करावयास आज्ञा केली पाहिजे विसेश भानजी कुलकर्णी मौजे निंबूत व गुलचे यासि अतोजी निगडा याने भुताकरिता जिवे मारिला हे तुम्हास तरी कलले नाही आणि दरम्यान मधेच जिवे मारिला भानजी म्हणत होता की आपणा पारवी घेणे त्यावरी याने फकी घेतली नसता मधेच भगत आणून भानजीचे भुते लटकीच त्याचीच म्हणऊनु

केली आणि त्याने ब्राह्मण मारिल ब्राह्मणहत्या केली बरे तुम्ही देसाई

फारशी आहा आमचे भानजीविसी गावीचे हिसेबू कितब वस्तभाव होते

शिक्का आणि त्याने म........मारिला तरी आम्ही आपले कोणास......

ाता आतोजीस व आम्हास दावा लागला आहे आम्ही भानजीचा मूल रवा काढावयासि उभा करितो तो खरा निघाला तरी आम्ही खूनचा मुचदला खून घेऊनु व वांतही घेऊनु आणि सेवट याचे माथा ब्राह्महत्या पडेल येसे आहे खोटा निघाला तरी तो पवल येसे निवाडा करावा मग येसा विचार करिता तरी बरे दिसते आता उगाच येऊनु जिवे ब्राह्महत्या केली बरे तुम्हासही ठाउके

---

* हें पत्र वाळवे येथील रा. विष्णु नारायण उमराणी यांच्या दप्तरांतलि आहे. हें बाळबोधींत लिहिलेलें असून ऱ्हस्वदीर्घ मुळांत आहे त्याचप्रमाणें येथें छापलें आहे. प्रत्येक ओळींत १०।११ अक्षरें असून प्रत्येक ओळीच्या प्रारंभीं ॥ अशा रेघा आहेत.

असावे आम्ही राजश्री साहेबासही बाबे मानजीचे विर्सा( लि )हीतो कलले पाहिजे तुम्हीही मिरासीदार आहा तुम्हास जैसे कलेल तैसा विलाज करणे आम्ही तरी याचे मूह घेऊनु आणि वितही घेऊनु कलऊ पाहिजे बहूत लिहीणे तरी तुम्ही विवेकी आहा विनती देसीचे ब्राह्मण काही भुताले आहे ते हे तुम्हास ठाऊ + ब्राह्मण कोठे भुते अता मानजीचे भवासही ( अपूर्ण )

ले. ४९ शके १५८३ आश्विन व १०

( वरील कांहीं मजकूर गेला आहे )

भिलोजी बीन बावजी गाडवा मोकदम मौजे सडाले पा। मजकूर

लखमोजी बीन रामजी माली मोकदम मौजे नायेगाऊ पा। मजकूर

आबाजी बीन माहादजी खाबकर मोकदम मौजे वडगाऊ पा। मा।र.

इलाजी बीन रामजी मोकदम मजरे केसुर्डी कसबा पा। मजकूर

अडबोजी बीन बालोजी आवारी मोकदम मौजे वेलके पा। मजकूर

आऊजी साबाजी पानसी कुलकर्णी व जोतीसी मौजे भवाली व मौजे तोडील व मौजे गुणध पा। मजकूर व मौजे लोणी ता। निरथडी पा। पुणा

रामजी बीन मालोजी वहीरगुडा मोकदम मौजे पलसी पा। मजकूर

सालोजी बीन बालोजी वीर मोकदम मौजे सागवी पा। मजकूर

विठोजी बीन अपाजी चोर मोकदम मौजे भादे पा। मजकूर

अर्जुन सेटी बीन येलह सेटी गुळुबा माहाजन मोहतर्फा कसबा पा। मजकूर

बलुते मौजे भवाली पा। मजकूर

कृष्णाजी बीन येलह दरणा गुरवमौजे मजकूर

कान्होजी बीन भिकु चाभार मौजे मजकूर

धावू वरठा बीन कुम वरठा परीट मौजे मजकूर

दादू नाक बीन पदस-नाक माहार मौजे मजकूर

श्रीसके १५८३ प्लवनाम संवछरे आस्वीन वदी दसमी सोमवार स्तु॥ इसने सितेन आलफ कारणे जाला महजर येसाजे सोमाजी बीन आबाजी पाचपुता पाटील तकसीकदार मौजे भवाली पा॥ मजकूर पासी दुकालामधे गोदजी बीन जाऊजी मोकदम पाचपुता मौजे मजकूर याणे मौजे मजकूरची पटेलगी तकसीम साधी दिल्ही यासी सालमजकुरा कारणे माहादजी बीन बजोजी रणदिवे राजश्री राजे

पाळकर सरनोबत सुभेदार यापासी येऊन उभे राहिले मौजे भवालीची पटेलगी आपली मिरासी ते गोद्जी पाटील पाचपुता सातो ते देववणे या वरून गोद्जी बीन जाऊजी पाचपुता मोकद्म मौजे मजकूर हुजूर आणिला त्याबरोबरी सोमाजी बीन आबाजी पाटील पाचपुता आणिला यावरी पटेलगीचा अहवाल मनास आणोन गाव बीर तुमाल ठेऊन पटेलगी तकसिमा सा पैकी गोद्जी बीन जाऊजी पाचपुता व महाद्जी बीन वडजोजी रणदिवा पटेलभीत तकसिमा पाच देण्याची समजावीस करून महजर करून देऊन त्यापासी सेरणी दोघापासी पाचा तकसीमास होन साठी घेतले यावरी सावी तकसीम सोमाजी बीन अबाजी पाचपुता याची याचे दुमाला करून सेरणीची तकसीमेचें मागणें लाविले यावरून सोमाजी मजकूर बोलिला जे आपणांस गोद्जी बीन जाऊजी पाचपुता मोकद्म मौजे मजकूर याणे दुकलामधे आपणास गोत विद्माने कागद् दिल्हा आहे यासी महजर करून देणें आपण सेरणी कबूल करीन यावरून सेरणी होन बारा खंडून महजर करून देणें म्हणवून फर्माविले यावरून सोमाजी बीन आबाजी पाचपुता यासि सद्रहू हजीर मजालसी बोलिजे जे तुज सावी तकसीम पटेलगी गोद्जी बीन जाऊजी पाचपुता याने दिल्ही आहे तो कागद् आणणे यावरून सोमाजी बीन अबाजी याणे तो कागद् आणिला तेथें मजमू जे स्वस्तीश्री सके १५५७ इवा नाम सवत्सरे चैत्र मास कृष्ण पक्ष सस्टि रविवार त दिनी गोद्जी पटेल व गोमाजी पाटील व एसोजी पाटील वा पिलाजी वा एमाजी पाटील पाचपुते मोकद्म मौजे भवाली प॥ सिरवळ समस्थ मिलोन मौजे वोझरडे मु॥ इसार जाऊली तेथें येऊन आबाजी पाचपुता मौजे आनेवाडी सा हवेली तेथे सेत करून होता तेथे येऊन आम्ही गला पडलो तू आमचा भाऊ आपले मिरासी सोडून दुसरे ठायी नाद्तोस तरी धर्म नव्हे आतां तुझी तकसीम सावी आहे ते आपली घेणें म्हणवून राजश्री नाईकजी नाईक व मालोजी राजे वा सभाजी राजे देसाई प॥ वाई व मोकद्म समस्त कुलवाडी ये मौजे मजकूर ते बैसोन सावी तकशीम तुझी तुझे पद्री घातली असे व हाकलाजीमा व दाद्राउ व उपाव व पटी पछोडी सेवधार व इनाम जे तुझे तकसिमेस येईल ते कुलकानूसी हिल्हे असे यासी आनुसारिखे करून तरी क्षिधियाबहिरव व आपले वडिलाचे सत्य इमान सहि

गोही

पत्रप्रमाणे कासी विस्वनाथ येरंडा  पत्रप्रमाणे गोही गोदोवा दिघा
मो॥ सोनगीरवाडी कुलकर्णी मुल्हाई

सदरहु कागदावरून सोमाजीचा बाप आमाजी मौजे मजकुरास येऊन कागदप्रमाणे तकसीम खात होता सोळा सतरा वरिसे भोगवटा जालियावरी मागता गाव सोडून बाहेर गला यावरी गोद्जी बीन जाऊजी पाचपुता मोकद्म मौजे मजकूर

जेथे आबाजी गेला होता तेथे जाऊन त्यासी कागद थले विद्मान लेहोन देऊन गावावरी आणिला तो कागद सोमाजी बीन आबाजी पाचपुता यापासी होता तो हजीर मजालसी आणविला तेथें मजमू जे श्री सके १५७४ नदन संवत्सरे मार्गेश्वर वदि चतुर्दशी वार सणिवार ते दिशी गोदपाटील व जोगोजी बीन गोमाजी पाटील वा बाहिरजी बीन येसोजी पाटील व पिलाजी पाटील व संभाजी बीन येमाजी पाटील पाचपुते मोकदम मौजे भवाली पा सिरवळ आबाजी पाचपुता यासी लेहोन दिल्हे ऐसे जे तुज पहिले मौजे ओझरडे ना जाऊली ते तेथे पाचजण जाऊन ते वर्का तुज पाटिलकी ता सावी ६ दिधली हकुलाजिमा व आदाऊ पाव पटीप छोडी सेवधार व इनाम व काली व पाढरी जे तुझी तकशिमेसी येईल ते खाणे हे खात होतास यावरील घराचा कुसूर जाला म्हणवून गाव टाकून पळोन बाहेरो अलास थल मौजे पिपळे नजिक सासवड पा पुणे आम्ही गोत बैसोन निवाडा केला कीजे ओझरडा जे निर्गमले आहे याचप्रमाणे हरदोजण कबूल जाले तेणेप्रमाणे लेहोन दिधले सुखे लेकुराचा लेकुरी खाणे यासी हिला हरकती करील तो देवाचा खोटा— दिवाणीचा गुन्हेगार व गोताचा खोटा हे केले मोडील त्यास आपल्या पूर्वजाची आण असे यासी साक्ष राजश्री सिंधिया व बहिरव श्रीपिपलेश्वर साक्ष असे हे लिहिले पत्र सही

गोही

मोकदम मौजे पिपले नजीक सासवड व समस्थ गोत

मलनाथ माहार मौजे पिपले मलजी नलवडा मौजे मजकूर भानजी बीन जाऊजी हातीर रगार का सासवड

सवाजी वाईकर मौजे बोपेगाऊ पा पुणे

गोदजी पाटील धणगर मोकदम मौजे सुपे खुर्द पा सुपे

बालोजी रागुला मौजे पिपले भिका बीन राग दरणा का सासवड कान्होराम द णी का सासवड

सदरहूप्रमाणे कागद लेहोन दिल्हे आहेती याप्रमाणे गोदजी बीन जाऊजी पाचपुता व माहादजी बीन वडजोजी रणदिवे मोकदम मौजे मजकूर त्याणि सोमाजी बीन आबाजी पाचपुता तकसीमदार पाटील मौजे मजकूर याचे लेकुराचे लेकुरी चालवावे सोमाजी बीन आबाजी पाचपुता याणे मौजे मजकुरीची पटेलगी तकसीम सावी काली व पाढरी हाकलाजिमा पटीपछोडी सेवधार व आदाऊ व उपाव बरहुकूम कागद गोत विद्माने लेहोन दिल्हे आहेती त्याप्रमाणे खाणे गावलावणी बीरदुमाल असे या निवाडियाप्रमाणे लेकुराचा लेकुरी चालावे निवडलिया अमलास

जो हिलाहरकती करील तो दिवाणीचा गुन्हेगार व गोताचा अन्याई हा महजर सही मोर्तब*                                   ( शिक्का अस्पष्ट )

---

ले. ५०

महामेरु आखंडीत लक्ष्मी प्रसंन परउपकार राये राजमान्य राजेश्री माहादजीपंत स्वामी गोसावी यासी—

सेवक वेकाजी हायेदेरु नमस्कार विनती उपेरी स्वामी यानी त्रिबकपंतास पत्र लिहीले होते बहुत काही शंकून लिहीले तरी गोसावी याचे कार्याचे वेसी आतर पडणार नाही कोणाचे बोलावरून लिहीले पहिले होनु ३८ व + द्व नाईक सराफ याचे हवाला राजेश्री आणाजीपतानी होनु.........व देशमुखासी टके ८० पावले उरले तेही पावतील मार्गाचे काही दिसत नाही सालासी माहे ७ जाहाले त्यामधे रसद हा महिना एक राजश्री सिवाजी राजया करिता पडिला येस्यासी सिरवलीचे वकाल घाटाखाले जावयासी सिध जाहाले होते त्यासी नील सेटी व आर्जून सेटी माहाजन हवालदाराजवली जाऊन धाडोरा पिटविला जे बैलास जे मूठ घालील घाटाखाले जाईल तो दिवाणीचे गुन्हेगार त्या वरून वाणी....... ती याण याव घाटाखाले जावयासी मुतेद जाहाले आणि दुसरीयानेही धाडोरा पिटिला जे घाटाखाले जाईल तो गुन्हेगार याकरिता रसद हा महिना टके १०० बुडाले येविसी हवालदारासी बोलिलो तुम्ही धाडोरे दोनी वेल पिटिला वाणी वकाल कुल उदिमासी जाता राहिले आम्ही कोठून पैके यावे त्यावरी हवालदार बोलिले जे सेटे माहाजनानी धाडोरा पिटविला त्यासी वोल तरी मज त्यास वोलायासी काये समध साहेबी त्याचे बोलावरून कैसे पिटिले महिना पडिला तो कोण देईल साहेबी याचे इलाज देखणे येसे वर्तमान जाले आसे स्रुत होये सेवकही येऊनु समाचार स्रुत करून बहूत काये लेहो सकलविशई आभिमान स्वामीचा आहे हे विनती हवालदार जवल जकातीविसी हर कोणी + करिनात तीसी पाठी राखोन पारपत्य करीत नाहीत व जानोजी कमावीसी मन घालीत नाही येविसी उभयतांसी देशमु(खा)चे नावे व आपले नावे पत्र पाठवणे हरयेकविसी ++ पाणसारे सागतील ते खातिरेसी आणावे विनती

---

* हा शब्द निराळ्या वळणाचा. जाडावर मोर्तबचे शिके.

१६६७

ले. ५१. शके १५८९ भाद्र० वा. ९

राजश्री माहादाजीपंत देसकुलकर्णी पा सिरवल गो सेवेसी गुणाजी अडवल व बापूजी निगडे प्रज मौजे अजनुज पा सिरवळ सुा समान सितैन अलफ कारणे लेहून दिल्हा कर्ज कतबा यैसाजे तुम्हापासून कर्ज घेतले होनु ५१ येकावन हे छ २२ रविलोवल ता छ ७ माहे रबिलाखरी देऊनु लिहिले मुदतीस पैके नेदी तरी दर माहे दर होनास कलातर रुके .॥. प्रमाणे झाले मुदतीचे देईन हा कतबा सही ( कोळप )

हे सदरहू मुदतीस पैकेचे उगवणीस धणी गोमाजी त्रिमल कुलकर्णी मौजे मार

गोही

रभाजी ठाकूर

विसाजी नानाजी कुळकर्णी मौजे पारगाऊ

---

१६६७

ले. ५२. शके १५८९ कार्तिक वा ५.

छ मसुरल आनाम राजेश्री बहिरजी वाघ प्रभू हवलदार व कारकून ता रोहीडखोर ........कृष्णाजि भास्कर सुभेदार माहालानिहाय सुा समान सितैन आलफ राजश्री माहादाजी राम देसकुलकर्णी याचे गुजारतीने नाईकजी जेधा याणी टके ६०८ साठी घेतले आहेती हाली पैके द्यावयास मोतल करीत आहे तरी त्यास ताकीद करून याचे पैकी यास पावे यैसे करणे छ १९ जमादिलावल (अस्पष्ट शिक्का.)

---

१६७०

ले. ५३ श्री १५९२ श्रावण शु. १३

( चां. सर. )

मसुरल अनाम राजेश्री माहादाजी गोविद सुभेदार पा पुणे राजेश्री सिवाजी राजे सुा इहिदे सबैन अलफ मा संकराजी निलकंठराऊ हुजूर येऊन मालुम केले जे आपली इनामती मौजे चाबिली ता कन्हेपठार पा मार येथे सेत सिवेचे थल पाडर देउल कास टका १ आहे कारकीर्द दर कारकीर्द चालत आले आहे माहाराज साहेबी चालविले आहे अफजलखानाच्या राजिकाआधी साहेबाचे कारकीर्दीस

---

१ उशीर.

दुमाले चालत आले आहे हाली माइलेस इनामतीस पैके लाविताती येबावे साहेबी कागद देखिला पाहिजे म्हणउन मालूम केले तरी राजेश्री निलकंठराऊ याचा इनाम मौजे चाबिली ता कन्हेपठार सेत सिवेचे पाडर देउल कास टका १ आहे कारकीर्द दर कारकीर्द चालत आले आहे माहाराज साहेबाचे कारकीर्दीस व अफजलखानाच्या राजिका आधी साहेबीहि आपले कारकीर्दीस चालविले आहे तेणेप्रमाणे दुमाले करणे पेस्तर फिर्याद येऊ न देणे तालिक लेहोन घेऊन असल फिराउन देणे तेरीख १२ माहे रबिलोवल

१६७४

---

• ले. ५४ श. १५९६

## शिवराज्याभिषेकाचा दरबार व सिंहासन यांचें फ्रायरकृत वर्णन

LETTER II.

.......... Near a Month after they had been here, Narun Gi [ Niraji ] Pundit sent word, That to Morrow [ 6th June, 1674 ] about Seven or Eight in the Morning, the Rajah Seva Gi intended to ascend his Throne: and he would take it kindly if they came to congratulate him thereon; that it was necessary to present him with some small thing, it not being the Custom of the Eastern Parts to appear before a Prince empty-handed. The Ambassador sent him word, according to his Advice he would wait on the Rajah at the prescribed time.

Accordingly next Morning he and his Retinue went to Court, and found the Rajah seated on a Magnificent Throne, and all his Nobles waiting on him in Rich Attire; his Son Samba Gi Rajah, Peshaub, Mora Pundit [ Moropant Peshwa ] and a Brachmin [ Gaga Bhat ] of great Eminence, seated on an Ascent under the Throne; the rest, as well Officers of the Army as others standing with great Respect. The English made their Obedience at a distance, and Narun Sinai [ Narayan Shenavi ] held up the Diamond Ring that was to be presented him: He presently took notice of it, and ordered their coming nearer even to the Foot of the Throne, where being Vested, they were desired to retire; which they did not so soon, but they took notice on each side of the Throne there hung ( according to the Moors manner ) on heads of Gilded

Launces many Emblems of Dominion and Goverment; as on the Right-hand were two great Fishes Heads of Gold, with very large Teeth: on the Left, several Horses Tails, a Pair of Gold Scales, on a very high Launce's head, equally poised, an Emblem of Justice: and as they returned, at the Palace Gate stood two small Elephants on each said, and two fair Horses with Gold Trappings, Bridles, and Rich Furniture: which made them admire how they brought them up the Hill, the Passage being both difficult and hazardous.

Surat, 15th Jany. 1675.

JOHN FRYER.

---

ले. ५५ शके १५९६

१
८

जाबिता सिस्त मि॥सी पटी नि॥ मि॥सीदार पा॥ सिरवल सु॥ समस सबैन अलफ राजश्री पत पेशवे ईही हुजरून मोकरर केले होनु १०००८. येक हजार होनु

श्री शिवराज हर्षनिधान त्र्यंबकसुत मोरे (श्वर) मुख्य प्रधान.

देसमूख व देसकुलकर्णी पा॥मजकूर होनु ५००८.

देसमूख पा॥ मा॥र होनु ३६६

देसकुलकर्णी होनु १३४८

२९२॥।- नि॥ मल्हारजी ना॥

७३८= नि॥ भोगवलकर विठोजी बिन गोरखोजी निगडा

---

३६६

पाटील गावगना होनु २५०८०

हाजीर होनु २०००.

ता॥

१०८० कसबा नि॥ देसमुख मल्हारजीना॥
७॥० केसूजी नाईकजी
१२८० अहिरे नि॥ अडलराऊ व अम॰ यराऊ
८ अणदुरी नि॥ सडोजी जुमाराऊ
४ कविठे नि॥ विठोजी अनाजी
८८ मौजे कोपर्डे नि॥ सापकर
१०८ सडाले नि॥ मिवजी व भोनजी
५ भापवडे नि॥ नरसूजी व बालो॰ जी व पिलजी
८ भवाली नि॥ वडजा रणादिवे नि॥
५॥ वाठार खुर्द नि॥ सभाजी ई मा॥ रचा बाप भाऊ
१०८० वाठार बु॥ + + + फिरगोजी
१२८ मौजे भोगोली नि॥ विठोजी निगडा देशमूख
७॥ नायेगाऊ नि॥ लखमोजी

८॥ पलसी नि॥ रामजी
५॥ सागवी नि॥ कालोजी व बालोजी
५॥ मौजे वडगाऊ नि॥ बाजी सावकर
१०८ गुलुचे नि॥ अपाजी निगडे
७॥ पिसुर्टी नि॥ दताजी चोर
६ माडकी नि॥ जानोजी
७॥ तोडल नि॥ भिकाजी व बच्याजी
१०८ मौजे नाहावी नि॥ कृस्णाजी व बापूजी.
८ मौजे बाविडे नि॥ अबाजी व कालोजी
८ पारगाऊ नि॥ गगाजी व चादजी
५८ हाराळी नि॥ आडलराऊ
३ वेलके नि॥ अर्दे
८ बोरी नि॥ राजूजी भालेराऊ
२०००८०

गैर हाजीर ... ... ... ... होनु ५०८

ता॥

१८० भावोरे नि॥ येसाजी सोनवणी
० पाडेगाऊ
१॥ रुई नि॥ आबाजी लोणारी
३८ सुखेड नि॥
१॥ वाघोसी नि॥
२॥ गुणध
३॥ मोरते नि॥ हेमाजी धायेगुडा
५८ पाडली नि॥ सिणघरराऊ

५८ नेऊर नि॥ ठोबरे व
५८ खेड खुर्द येसाजी
५८ अजणोज नवलोजी
५॥० पिपरे बु॥ माहादाजी धायेगुडा
७॥ खेड बु॥ धाकोजी पा॥
४ मादे नि॥ विठोजी व सोनजी पा॥
५०८

गाऊ कुलकर्णी होनू २००८.

ता॥

| | |
|---|---|
| ५८· कसबा मुजेरी नि॥ केदार | ५ भवाली नि॥ पानसी |
| ५८ मोहतर्फा नि॥ केदार | ५ गुणध नि॥ पानसी |
| २॥ पेठ नि॥ केदार | ५८ नाहावी नि॥ हरी |
| ५ केसुर्डी नि॥ केदार | ५ भादोडे नि॥ हरी |
| ३ सागवी नि॥ केदार | ५ भोगोली नि॥ रघोबा |
| ५ नायेगाऊ केदार | ५ वाठार सुर्द नि॥ रघोबा |
| ५ संडाले नि॥ गोमाजी त्रिमल | ५ वाठार बुा नि॥ सखाराम व तान्हाजी |
| ५८ वाबीडे नि॥ गोमाजी त्रिमल | ५ खेड बुा नि॥ मानजी |
| ५८ भादवडे नि॥ गोमाजी त्रिमल | ५ पिंपरी बुा नि॥ रामा |
| ५८ पारगाऊ नि॥ गोमाजी त्रिमल | ५ पाडेगाऊ नि॥ रामा |
| ५८ अजणोज नि॥ गोमाजी त्रिमल | ५ माडकी नि॥ राघ जोसी |
| ५८ वेलके नि॥ गोमाजी त्रिमल | ५ पिसुर्टी नि॥ राघ जोसी |
| ५८ कोपर्डे नि॥ तिमाजी | ५ पळसी नि॥ देसकुलकर्णी |
| ५८ पाडिली नि॥ तिमाजी | ३ जेऊर नि॥ माहादाजी राम |
| ५८ बोरी नि॥ तिमाजी | ५ गुळूचे नि॥ विठ सोमनाथ |
| ५८ वाघोसी नि॥ खडोबा | ५ पिंपरे सुर्द नि॥ विठल सोमनाथ |
| ५ रुई नि॥ खडोबा | ५ अहिरे नि॥ जानो कृष्ण |
| ५ सुखेड नि॥ खडोबा | ५ हराली नि॥ नागोजी गणेश |
| ५ अणदुरी नि॥ कृष्णाजी व खडोबा | ३॥· मोरवे नि॥ जानो कृष्ण |
| ५ वडगाऊ नि॥ अपाजी नरसिंह | ५८ भादे नि॥ गगाजी वाग |
| ३ कविठे नि॥ रघोबा | २००८ |
| ५ तोडील नि॥ पानसी | |

चौगुले होनु १४८.

ता॥

| | |
|---|---|
| ·॥· कसबा | ·॥· खडाले |
| ·॥· भोगोली | ·॥· बाविडे |
| ·॥· पलसी | ·॥· पारगाऊ |
| ·॥· वडगाऊ | ·॥· वाठार बुा |
| ·॥· नायेगाऊ | ·॥· वाठार खुा |

| | | | |
|---|---|---|---|
| ·॥· | मवाली | ·॥· | पिंपुर्टी |
| ·॥· | माद्दे. | ·॥· | जेऊर |
| ·॥· | मादवडे | ·॥· | गुलुचे |
| ·॥· | आहिरे | ·।· | पाडिली |
| ·॥· | सागवी | ० | कोपेर्डे |
| ·॥· | कविठे | ·।· | बोरी |
| ·॥· | आजणोज | ० | वेलके |
| ·॥· | हाराळी | ·।· | पिपरे बु॥ |
| ·॥· | नाहावी | ·।· | पिपरे खु॥ |
| ·॥· | तोडिल | ·॥· | खेड बु॥ |
| ·॥· | माडकी | ·॥· | केंसुर्डी |

दफाते होनु ३६

२५ सेटे

१२॥ काल सेटी

१२॥ ++ सेटी

२५

५ माहाजन

२॥ बाबा सेटी

२॥ येल्हाजी गुलबा

( अपूर्ण )

---

ले. ५६ १५९७ वैशाख व. १

( चा. सर )

*सहस्रायु चिरंजीव राजमान्य राजश्री विसाजी गंगाधर यासि राघो बलाल आसिर्वाद विनती उपेरी मौजे सुपे खुर्द पा सुपे तेथील मोकदमी तिसरी तकसीम रा॥ संकराजी निलकठराऊ याची आहे येरयास साल मजकुरी हाली मिरासी पटी होन ३० तीस नि॥ मोकदम घातली आहे याची तकसीम मशारूनईले वरी होनु १० दाहा आली आहे त्यापैकी होनु पाच यास तौकूब केले आहे ती बाकी पाच होनु उरले तेच तुम्ही यापासूनु घेणे पाचा होनाची विले आम्ही तौकूब केले आहे ती याचे करूनु तुम्ही तहसील नाही करणे हा आसिर्वाद याचा हिराणा न करणे छ १४ सफर सु॥ खमस सबैन अलफ मोर्तब सुद मोरत

बसुद

---

* शिक्का नाहीं.

ले. ५७ तालिक १५९७ ज्येष्ठ शु. २

( चां. सर. )

मसुरुल अनाम राजश्री मोरो निबाजी मजमूदार पा पुर्णा गोसावी यासि राघो बलाल नमस्कार विनंती सुहुर सन खमस सबैन अलफ राजश्री निलोजी निलकंठराऊ पुरंधरकर याचा इनाम मौजे चाबिली ता करेपाठार ते गावी कास टका येक आहे १८ त्यावरी हाली तुम्ही पंचवीस होनु २५८ मिरासपटी घातली आहे ते दूर करणे तहसील न लावणे दुसरियाने बोभाट येऊ न देणे छ. ३० सफर

---

ले. ५८ शके १५९७ आश्विन शु॥ ९ (नकल)

श्री

राजश्री पंताजीपंत बोकील स्वामी गोसावी

यांसि

छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो मल्हारजी येशवतराव देशमुख निगडे व महादाजी राम देशकुलकर्णी प्रगणे सिरवल सुरसन सीत सबैन आलफ दंडवत आनुक्रमे नमस्कार विनंती उपरी राजश्री छत्रपती स्वामीनी आज्ञापत्र सादर केले तेथे आज्ञा की राजश्री पंतास राहावयासि स्थल का मजकुरी पाहिजे तर उतम स्तळ पाहून वाडा मिरास करून का मजकुरी देणे ते आज्ञेवरून तुम्हास स्तळ कोन्हाची मिरास नव्हे व कोन्हाचा कथला नाही असे स्तळ पाहून दिवाण वाडीयाचे पछमेस व बिदीचे पूर्वेस व हैबतगाव सेगर नाईकवाडी याचे दक्षणेस लांबी हात ऐसी ८० हात व दिवाणवाडी याचे पश्चमेपासून रुंदी हात ६० साठी मोईन करून दिल्हा आसे तर तुम्ही लेकराचे लेकरी व उपपरंपरागत वाडा बाधोन सुखरूप राहणे आपण तुम्हास मिरास करून दिल्हा आसे पुढे आपले वोशीचा आगर आणिक कोन्ही कथला करील त्यास श्रीची आण व आपले पूर्वजाची आण व गाई ब्राह्मणांची आण आसे तुम्ही सुखरूप वाडा बाधोन लेकराचे लेकरी राहणे छ ७ माहे रजब हे विनंती

---

ले. ५९ १५९८ चैत्र शु. २

ता ( चां. सर. ) श्री

मसुरुल अनाम राजश्री रामोजी जगथाप व खंडोजी जगथाप प्रती राजश्री सिवाजी राजे सुहूरसन सीत सबैन अलफ मौजे सुपे खुर्द पा सुपे येथील पाटीलकी नीलकंठराऊ व काटकर व धणगर याची तीवे तीन तकसीमा करून कमावीस

करितात तुम्ही निसूर राहत नाही की त्यासी कथला करिता पेसजी ताकीद केली तऱ्ही धणगराची माणसे मा। राघो बलाल या कडून धरऊन नेऊन बदी घातले आहेत ते सोडीत नाहीत तरी येसे जरी तुम्ही कराल तरी साहेब तुम्हावरी कैसे राजी राहातील हे तुम्ही विचारीत नाही येसेच खराडे पालीसी करकर करीत होते सेवट खोटे ते खोटे जाले तैसे तुम्ही आहा जरी वाद सांगणे तरी हुजूर सांगणे काटकराचा आणि तुमचा निवाडा होईल निलकंठराऊ व धणगर हे खरीद्दार त्यासी तो काही निसबती नाहीच याउपरी धणगराची माणसे सोडून देविली असेती ते सोडून देवणे पेस्तर त्याचे वाटे नव जाणे पाटिलकी तिघास चालते तैसी चाली चालो देणे तुमचा निवाडा होईल तो हुजुरूनच होईल तोवरी गावी काही दखल न होणे कथला न करणे छ १ मोहरम

---

ले. ६०　　　　　　　　　　　　१५६८ चैत्र शु. २

( चां. सर. )

मसुरुल हजरती राजश्री राघो बलाल सुभेदार समत जुनर प्रती

राजश्री सिवाजी राजे　　　　दंडवत सुा। सीत सबैन आलफ मौजे सुपे खुर्द पा। सुपे येथील पाटीलकी नीलकठराऊ व काटकर व धणगर याची ती ठाई तीन तकसिमा करून येक येक तकसिम येक येक खाना सालाबाद चालते यास रामोजी व खंडोजी जगथाप नसती करकर करिताती तुम्हास सागोन धणगराची माणसे धरून नेविली तुम्ही नेउनु बंदी घातली आहेती पहिले लिहिले तऱ्ही सोडली नाहीत येसेयास जगथाप झोडपणे गला पडिताती जैसे पाळीची पाटीलकी कालभोराची आसता उगेच खराडियाने झोडपण केले सेवट रवा काढून खोटे जाहाले तसेच हे जगथाप करिताती उगीच येकाची मिरासी येकास तो देवत नाही आणि तुम्ही जगथापाच्या बोले धणगराची माणसे बंदी घातली हा कोन इनसाफ जगथापास वाद सागणे आसेल तरी हुजूर उभे राहातील काटकरासी वाद सागतील हुजूर बिल्हे होईल नीलकठराऊ व धणगर खरीद्दार आहेती यासी तो काही निसबती नाही तुम्ही हा कथला मनावरी घेता हे साहेबास मानत नाही येसे जाणोन या ... ... ... न पडणे धणगराची माणसे धरिली आहे ती ते सोडून देणे पाटीलकी नीलकंठराऊ व धणगर व काटकर यास चालते तैसी चालवणे जगथापाचा निवाडा हुजूर होईल जाणिजे छ १ मोहरम

---

ले. ६१ श्री.

माहामेरू अखंडीत लक्षुमी आलंकृत राजमान्य राजेश्री
माहादाजीपत स्वामी गोसावी यासी

सेवक निलो सोनदेऊ नमस्कार विनती उपेरी गोसावी कागद लिहीला म्हणऊनु आम्ही इतके रोज येथे होतो आता आम्हास काही कार्ये आहे यानिमित्ये गावास जातो कलले पाहिजे तुम्ही कागद लिहीला होता त्याचा निस्छये आम्ही राजेश्री पासी सागितला आहे उभयेता यादोपत व विठलपंत येऊनु आम्हास समाधान करितील ते वस्ती आपण सिध आहो जे आज्ञा सागाल ते करून ये गोस्टीस अतर न पडे उभयेता ये गोस्टीस राजी न जाले तरी आम्हास सागोन पाठवणे जेथे उभयेता आसतील तेथे आम्ही त्यास पुसोन त्याचे भाऊ शफत घेऊनु कलले पाहिजे तुमचा तरी भरवसा आम्हास आहे परतु यादोपत व विठलपंत हे उभयेता मुदे वचने आम्हास बोलतील तरी आम्ही येऊनु यादोपत व विठलपत या खेरीज तिसऱ्याचा बोल आम्हास मान्य नाही उभयेतानी बोललीयावरी आज्ञा कराल ते करून कलले पाहिजे आम्ही गावास गेलो उभयेताच्या मनास आले तरी यादोपत व विठलपतास आम्हापासी पाठवणे त्यास पुसोन तुम्हापासी येऊनु बहूत लिहीणे तरी विवेकी आहा हे विनंती

राजश्री आणाजीपतीं आम्हासी नेम केला आहे जे यादोपताकडून आण भाश देववावी व विठलपत आम्हापासी आणून विठलपताची आण देवावी या खेरीज बि ता।

आमचा मुशाहिरा वर नि॥ मजमूदार महिना निघता घ्यावा महीनीयाचा महिना रोख द्यावा हकासी गरज नाही अगर तिघापासी मागावया गरज नाही येकाने धणी होऊनु घ्यावा

पहिले मदती + + विठला बोलाया होता त्याप्रमाणे तोच अगर आणीक मदतीनीस द्यावा

येणे प्रमाणे राजश्रीने आम्हासी नेम केला आहे तरी स्वामीने येसा अगीकार घेववेल तरी अगीकार करून विठलपत व यादोपत आम्हापाशी पाठवणे आम्ही त्याचे भाव शफत घेऊनु स्मामीपासी येऊनु यादोपत व विठलपत या दोघा खेरीज तिसऱ्या बोल आम्हास राहाता नये हचे दोघे आम्ही लिहीले प्रमाणे अगिकार करितील व तुम्हासही मानेल तरी उभयेतास पाठवणे त्याचे गोहीने येऊनु यास सदेह नाही दोघानी आम्हास शव शफत दिल्हा व

आम्ही लिहीले प्रमाणे तुह्मास मान्य जाले तरी आह्मी येऊनु कलले असावे हे विनंती

---

ले. ६२ १५९९ वैशाख शु. ३

( चां. सर. )

रोखा तहसीलदार नि॥ शंकराजी निलकंठराऊ मुकाम चाविली यासी अनाजी दतो सु॥ सन सबा सबैन अलफ तरी तुवा मा॥ ह्मास घरी अजार नेदणे उठोन येणे रा॥ छ १ रबिलावल लेख

नावधिरयं

---

ले. ६३ श्री १५९९ श्रावण शु. ४

( चां. सर. )

राजश्री त्रिंबक गोपाल देशाधिकारी व लेखक प्रांत पुणे गोसावी यास

छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य सेवक मोरो त्रिमल व नारो नीलकठ शक ४ पिंगल सवछर उपरी नीलकठराऊ यास इनाम मौजे चांवली ता॥ कऱ्हेपठार तेथे आहे येसीयास राजश्री छत्रपती स्वारीहून आल्यावरी विले करितील तोवरी तकू [ ब ] असो देणे छ २ जमादिलाखर सन समान लेखन उचित ( मोर्तबांतील अक्षरेः–विलसति लेखनावधि...... )+.

---

ले. ६४ १६०० आश्वीन शु. १२

( चां. सर. )

रोखा तहसिलदार मौजे चाविली ता॥ कऱ्हेपठार + + + पाल सुबेदार पा॥ पुणे सु॥ सन तिसा सबैन अलफ तुजला मा॥ शंकराजि निलकंठराऊ याकडील इनामतीचे पैकी तहसील करावया पाठविले आहे यैसियास राजश्री छत्रपती स्वामीचे पत्र ये तोपावेतो राजश्री पंत सचीव स्वामीनी पैके तोकूब करविले आहेती तर तू रोखा पावताच इनामदार मजकुरास अजार न देता सिताब हुजूर येणे उजूर न करणे छ १० साबान.

---

१ सबंद पत्र एकटाकी असल्यानें खुद्द निळो सोनदेवाच्या हातचे असण्याचा विशेष संभव आहे.

+ पत्राच्या पाठीवरील शिक्यांतलीं अक्षरेंः–श्रीशिवराजेंद्र हर्षनिदान ॥ त्र्यंबकसुत मोरेश्वर मुख्य प्रधान ॥ इतर मजकूरः सुध बार

ले. ६५ श्रीशंकर

१६०३ श्रावण शु. ४

( चां. सर. )

राजश्री नागोजी बलाल सुभेदार व कारकून सुभा
प्रांत माहालहाये पा इंदापूर व सुपे सोसावी यास

०॥छअखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये सेवक निलकठ मोरेस्वर प्रधान नमस्कार सुहूरसन इसने समानेन आलफ सुपे खुर्द येथील पाटीलकी रायाजी काटकर व शकराजी निलकठराऊ व हाऊजी धणगर या तिघांची पाटीलकी मौजे मजकूरची आहे ऐसियासि आजिपावेतो जैसे चालत आले असेल त्याप्रमाणे तुम्ही तैसेच चालवणे नवी इस्कील होऊ नेदणे रवाना छ ३ रजब +आज्ञाप्रमाण

( लेखन सीमा समुल्लसति ) श्री॥ शंभु नर पति हर्षनिदान
मोरेश्वर सुत नीळकंठ
मुख्य प्रधान

सुरू सुद

---

ले. ६६ १६०४ आषाढ शु. ६

( चां. सर. )

अज दिवाण ठाणे ता॥ नीरथडी पा॥ पुणे ता॥ मोकदमानी मौजे किकवी ता॥ मजकूर सु॥ सलास समानेन अलफ शंकराजी निलकठराऊ यानी सुभा पा॥ मा॥ तेथे जाऊन वर्तमान सांगितले की मौजे किकवी ता॥ मा॥ येथे आपला इनाम कास रुके ८४॥ साडे च्यारी आहे ते हाली पडकि आहे कीर्दीस उमेद धरिली आहे म्हणौउनु सुभा वर्तमान सांगितले त्यावरून शंकराजी निलकठराऊ यांचा इनाम जमीन सेत कास रुके ८४॥ साडेच्यारी रुके लावणी दुमाले केले असे सालाबादप्रमाणे जैसे चालिले असेल तैसे चालवणें म्हणौउनु सुभाहून खुर्द खत मौजे मंजकुरास सादर जाले आहे तरी जेणेप्रमाणे सुभाचे खुर्दखत आहे तेणेप्रमाणे वर्तणूक करणे इनामती पडीक आहे येसियास याचे दुमाले कार्दी कारणे केला आहे तेणेप्रमाणे याचे दुमाले करणे पेस्तर राजश्री छत्रपती स्वामीचा हातरोखा आणितील तेणेप्रमाणे विल्हे होईल तालीक लेहून घेऊन असल फिराऊन देणे रा॥ छ ४ रजबु मोर्तबु सुद मोर्त

बसुद

---

\+ येथून वळण निराळें

॥ अक्षर वेगळें

• ले. ६७ श्री १६०५ कार्तिक शु. ७

( पेठकर पुरंदरे )

राजश्री बाजी घोलप हवालदार व कारकून किले पुरंदर गोसावी यास

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य प्रति निलकंठ मोरेश्वर प्रधान आसीरवाद व नमस्कार सुा आर्बा समानैन अलफ तुम्ही विनति केली कीं किले मजकुरी मिरासीदार जोतीसी सिवभट बीन दादंभट व नारायेण भट बीन राममट पुरंदरे आहेती यैसीयास्ि यांची वृति पिढी दरपिढी किलाचे बुनादी महत कदम आहेती यैसीयास्ि किला सरदेचा ते स्थळी तास पाहिजे याबदल या किलीयास तासाची सेवा सागावी ते सागितली नाही जे समई ताब्रांपासून किला घेतला* ते इ॥ पासूनु राजश्री निलो सोनदेऊ याणी वेदमूर्ती राजश्री विस्वनाथ भट ठकार व सखंभट ठकार यास दर एकास लारी १५ एकूण लारी दाभोळी ३० तीस करून तासाची सेवा सांगोन ठेविले त्या उपेरी सिवभट व नारायेणभट मिरासीदार तासाची सेवा आपणच करु म्हणोनु राजश्री निलोपंतापासी विनंती केली यास ही गोस्ट राजश्री निलोपंती अमान्य करून विस्वनाथ भट व सखंभट यास तासाची सेवा सागितली याउपेरी राजश्री स्वामी कैलासवासी किलीयास्ि आलें ते समयी सिवभट व नारायेणभट याणी राजश्री पासी प्रसंग केला त्यास ते समयी राजश्रीनीं वृत्त्यांसीयाची व्रती व तास द्यावी ये तजविजीने कुल तासच सखंभट विस्वनाथ भट यांकडील मना केला नारायेणभटास व सिवभटासही सनद तासाची दिल्ही नाही कुल तासच अमानत केला याउपेरी मागती निर्वाह करून घ्यावा तो राजश्री कैलासवासी करनाटकात गेले याउपेरी प्रसंग करावा तों ही ब्राह्मणे दुर्बले रायेगडास मागती जावे ती जावयास विलंब लागला तो स्वामी सन समानैनात जाल्हनापूर प्रांते गेले त्याउपेरी सवेच राजश्रीनी कैलासवास केला याउपेरी तो प्रसंग तैसाच राहिला त्यास पुरंदरासारिखा किला सरदेचा आणि नामोश्याचा तेथे तास असिलाच पाहिजे आणि वृत्तीवंतांचे संस्थापन करने हे स्वामीसही अगत्यच आहे तरीस्वामींनी ब्राह्मणावरी कृपालु होऊनु यास तासाची सेवा सागितली पाहिजे तासाची येकटीयास चाकरी होवेना तरी दोनजण तासकरी नारायेणभट व शिवभट यांस तासाची सेवा सांगितलीयाने किलाच[1] मामला चौकस राईल किला नामोश्याचा आहे तरी तासाची सेवा पुरंदरे उभयेता यास सांगितली पाहिजे म्हणऊन विनती केली तरी त्याचाही करिना मनास आणितां नारायेणभट व सिव-

---

* निळो सोनदेव यानीं मोगलापासून पुरंदर किल्ला शके १५९१ फाल्गुन व. १२ रोजीं घेतला ( जे. श. )

१ येथून पुढील अस्सल सनदेचा भाग गाहाळ. यापुढील मजकुर सनदेच्या तत्कालीन नकले वरून घेतला आहे

भट पुरंधरे मिरासदार यासि तास द्यावा हे गोस्टी युक्त आहे येकाचे मिरासीवर दुसरीयास तास द्यावा हे गोस्टी युक्त नव्हे आपले दरबारी येकाची वृती येकास द्यावी हे गोस्टी चालत नाहीं यास्तव नारायण भटास व शिवभटास तास द्यावा परंतु आपल्यास किला कभज जाला त्या दिवसापासून पुरंदरें उभयता भटानी तासाची चाकरी केली नाही याकरितां उगीच यांस तासाची सेवा सागोन सनद देता येत नाहीं या कारणे भट मजकुरास सेरणी मागितली त्यास मागती भट मजकुराचे बाबे मलार मुकुंद सुभेदार यांणी विनती केली कीं भिक्षुक ब्राम्हण त्याहीमधें दुर्बल ससंसार स्वामीने सेरणी मागितली तरी वृतीसंमध आहे सेरणी दिल्हाच पाहिजे परंतु ब्राह्मण दुर्बल आहेत बेमवसदार मफलीस आहेत तरी स्वामीने यांस जिवन माफीक सेरणी घेऊन तासाची सेवा सांगितली पाहिजे म्हणऊन विनती केली त्यास भट मजकुराचा आवकात मनास आणितां दुर्बल ब्राह्मण मफलीस म्हणून सेरणी खंडिणी देखील सरदेसमुखी होन पातशाही बी॥ कबूल कतबा भट मजकूर तेरीख छ ७ जिलकाद होनु पातशाही ५० पंनास केली आसे आणि उभयता पुरंधरे भट मजकुरास किले मजकुरीं तासाची सेवा सांगितली आसे किले मजकुरीं पेशजी सखंभट ठकार व विश्वनाथ भट ठकार यांची असामी किला तैनात जाबितां वोढत आहे ते बद लिहणे हाली पुरंदरे उभयता भट मिरासदार कदीम म्हणऊन जमासुदगी करून किलीयास पाठविले ता॥ दर माहे लारी दाभोली

| | |
|---|---|
| नारायणभट बीन रामभट<br>पुरंदरे लारी दाभोली<br>१५ | सिवभट बीन दादंभट<br>पुरंदरे लारी दाभोली<br>१५ |

येकूण लारी दाभोली तीस रास करून पाठविले यास किलीयावरी घेऊन यापासून तासाची सेवा घेणे यास वेतन जे तेरिखेस तास घालाल ते तेरिखेपासून पा। व सुरनिसी वजावाटा करून उरले वेतन दरबार रवेसीप्रमाणे देत जाणे यास सेरणी होन पा॥ ५० पनास बाधली त्याचा उसूल मफलसि म्हणौन रोकडे उसूल होन पा॥ १० दहा रास घेणे तें साळमजकुरीच घेणे उरले होन चालीस ते दरसाले होन ८ प्रमाणे हां॥ सन समस ता॥ सन तिसा दरसाल होन आठ भटमजकुराचे हकी वजा करणे तासास तेल जे तेरखेस तास घडी घालितील ते तेरखेपासून जे मोईन किले सिंहगडी आहे तेणेप्रमाणे दरोज तेल देत जाणे विशेष काये लिहिणे रा॥ छ ५ जिलकाद[२] पौ॥ छ ७ जिलकाद

---

१ हा व या पुढील लेखांक नारायण शिवराम पुरंदरे ( पेठकर ) यांचे दप्तरांतील आहे.
२ जोडावर ' लेखनसीमा ' या अक्षरांच्या शिक्का आहे.

ले. ६८ श्री १६०५ कार्तिक शु. ११

( चां. सर. )

राजश्री नागोजी बलाल सुभेदार व कारकून सुभा प्रा माहालानिहाय प्रा इंदापूर व सुपे यासि

छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये सेवक नीलकंठ मोरेस्वर प्रधान नमस्कार सुा सन अर्बा समानेन अलफ सुपे सुर्द येथील पाटिलकी रायाजी काटकर व शंकराजी निलकठराऊ व हाउजी धणगर या तिघाची पाटिलकी मौजे मजकुरीची आहे येसियास आजी पावेतो जैसे चालत आले असेल त्याप्रमाणे तुम्ही तैसच चालवणे शंकराजी निलकठराऊ व हाउजी धणगर यासी जगथाप नसता कथला करितात तरी यासी कथला करावयास समध नाही नवी इस्कील होऊ न देणे रा छ १० जिलकाद् आज्ञाप्रमाण

श्री शंभुभज
नीलकंठ मोरेश्वर
सुत निलकंठ

लेखनावधिर्मुद्रा

सुरुसुद

---

ले. ६९ श्री १६०९ वैशाख शु. ६

( पेठकर पुरंदरे )

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके १३ प्रभवनाम सवछरे वैशाख शुध शस्टी गुरुवासरे राजश्री बाजी घोलप मुद्राधारी व लेखक किले पुरधरगड यासि राजाज्ञा ऐसीजे वेदमूर्ती सिवभट पुरधरे याही हुजूर येऊन वर्तमान विदित केले की पूर्वी राजश्री कैलासवासी स्वामीनी आपले पिते व रामभट चुलते यासि श्री पुरंधरेश्वर व केदारेश्वर यासि प्रत्यही अभिषेक करावयाची आज्ञा केली होती यावरून उभयेता श्री देवास अभिषेक आज्ञेप्रमाणे करीत होते त्यांस प्रत्यवरसी दरयेकास होन पा ५ प्रा होन दाहा पोतांतून प्रत्यवरसी पावत आले त्याउपरी राजश्रींने पुरंधरगड मोगलांस देवविला* त्या दिवसापासून आभिषेकाची मोईन पावावी ते पावली नाही पुढे यत्न करून मोईन करून घ्यावी ते घेतली नाही आपले पिते दादंभट यासि देवआज्ञा जाली याकरितां वरसासनाची मोईन होऊन आली नाही तरी श्री देव बहुत जागृत स्थाने आहेत त्याचा अभिषेक होये आणि आपली मोईन चालविली पाहिजे देवास नदादीप व नैवेद्य पूर्वीपासूनु स्वामीनी मोईन करून दिली आहे त्याप्रमाणे प्रत्यवरसी पावत आहे आणि आपली मोईन पावत नाही तरी कृपालु होऊनु पेसजीप्रमाणे मोईन द्यावया आज्ञा केली पाहिजे म्हणऊनु विनंति केली त्यावरून मनास आणिता पूर्वी किले कैलासवासी स्वामीनी घेतला त्या

नीलकंठ मोरेश्वर
पेशव्याचा शिक्का

---

* शके १५८७ मध्यें.

दिवसापासून भट गोसावी यासि प्रत्यवरसी अभिषेक संमंधे मोईन पोतापैकी पावत आले त्याउपरी किला गनिमानें घेतलीया दिवसापासूनु हा कालवरी भट गोसावी यानी हुजूर येऊनु वरसासनाची मोईन करून घ्यावी ते घेतली नाही या करिता मोईन राहात गेली परतु देवास नेवेद्य नदादीप चालत आहे आणि आभिषेक मात्र चालत नाही देवस्थाने बहूत जागृत ह्मणऊनु श्रीचा आमिषेक वेदमूर्ती सिवभट बीन दादंभट व नारायणभट बीन रामभट यासि आभिषेकाची आज्ञा केली आहे ते येणे प्रमाणे देवास अभिषेक करितील

| | |
|---|---|
| श्रीकेदारेश्वरास नारायेणभट करितील १ | श्री पुरंधरेश्वरास सिवभट करितील १ |

येणे प्रमाणे देवांस आभिषेक करावयाची आज्ञा केली आसे ते प्रत्यही आभिषेक करितील आणि स्वामीस आसिरवाद देतील यासि मोईन वरसास होन पा ५

| | |
|---|---|
| सिवभट दादंभट होन पा २॥ | नारायेणभट रामभट २॥ |

एकून होन पा ५ रास प्रत्यवरसी द्यावयाची मोईन केली आहे तरी तुम्ही किल्लेमजकुरीहून प्रत्यवरसी सदरहुप्रा मोइन सनद पोा पासून देत जाणे आणि नैवेद्य व नदादीप श्रीची प्रत्यवरसी मोईन चालत आहे त्याचा वरच्यावरी समाच्यार घेऊन चालवणे अतर पडो न देणे नेवेद्य करणे तो भट गोसावी याचे विद्‌माने करून श्रीस समर्पीत जाणे गुरवाकडून न करणे सदरहू लिहिल्याप्रमाणे याजकडून देवांस अभिषेक करवीत जाणे आंतर पडो न देणे छ ७ जमादिलाखर सुहूर सन सबा समानीन अलफ पेरतर राजश्री श्वामीची सनद सादर होईल आज्ञाप्रमाण[१]

बार सुद बार   सुरुसुद बार

---

श्री

ले. ७०   १६१८ वैशाख शु. ८

( चां. सर. )

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री शंकराजी राम सेनासप्तसहस्री गोसांवी यास

शेवक शंकराजी नारायेण सचीव नमस्कार सुा सीत तिसैन अलफ राजश्री निलकंठराऊ यांचा इनाम कास टका येक मौजे चांबिली ताा कन्हेपठार प्रांत पुणे

---

१ ' आज्ञाप्रमाण ' हीं अक्षरें निराळया वळणाचीं.

येथे आहे त्यास इनाम पटीचा तगादा केला आहे म्हणून हुजूर विदित केले त्याव-रून तुम्हास हे पत्र सादर केले आसे त्यास इनामपटी सालाबाद वसूल घेत नाहीत येविसी तुम्हास पेसजीही पत्र सादर केले असे तरी यास इनाम पटीचा उपसर्ग न करणे छ ७ शौवाल पत्रावधिरयं भाति

सुरु सुद

---

ले. ७१ श्रीमार्तंड भैरव
(चां. सर.) श्रीषडो १६१८ भाद्रपद
मल्हार व. १३.

अज दिवाण राजश्री खडो मल्हार हवालदार व कारकून नि॥ श्री मुकाम मौजे जेजुरी तह्रा मोकदमानि मौजे मजकूर ता। कऱ्हेपठार पा। पुणे सु॥ सबा तिसैन अलफ बा। सनद राजश्री

सर सुभेदार प्रांत मजकूर छ २२ साबान सन सीत तिसैन आलफ इन सुली बा। सनद राजश्री पंत सचीव छ ८ सोवाल साल गु॥ रा। निलो निलकंठराऊ व रा। शंकराजी निलकंठराऊ व विसाजी निलकंठराऊ व रा। त्रिंबक निलकंठराऊ सरनाई [ क ] वाडी किले पुरधर यापैकी विसाजी निलकंठराऊ याणी किले विचित्रगडीचे मुकामी हुजूर विनती केली की आपले पिते राजश्री निलकंठराऊ याही मौजे जेजुरी ता। कऱ्हेपठार पा। मा। येथे विहीर करून आंबराई लाविली अहे तेथे कास जमीन रुका ८१ येक मु खो या प्रमाणे चालत आले आहे येसी-यास आपल्या वडिलीही या राजात सेवा बहूत केली अहे व पुढेही करीत आहो तरी स्वामिनी रुपालू होऊन सदरहू जमीन कास रुका ८१ येक दो। अंबराई इनाम करून दिल्हा पाहिजे म्हणोन विनती केली त्यावरून मनास अणितां माइले या राज्यातील कदीम आणि सेवा येकनिष्टपणे केली आहे व पुढेही करीत अहेत याकरिता माइलेचे चालवणे जरूर आहे म्हणोन याजवर रुपालु होऊन त्यास इनाम जमीन कास रुका ८१ येक दो। आंबराई माइलेच्या दुमाला करून यास व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालवीत जाणे प्रतिवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणे तालिक लेहून घेऊन असलपत्र भोगवटीया निमित्य परतोन देणे म्हणोन आज्ञा आज्ञेप्रमाणे वर्तणूक करून माइलेचे सदरहू इनाम जमीन कास रुका येक दो। आंबराई आहे ते याच्या दुमाला करणे नवी जिकीर न करणे पत्राची तालिक घेऊन असल पत्र भोगवटिया निमित्य मा।स देणे छ २६ सफर मोर्तब सुद

मोरत

बसुद

---

ले. ७२ श्री १६२० अश्वीन शु. ५

(चा. सर.)

आज्ञापत्र राजश्री पंत सचीव ता। मोकदम मौजे चांबिली ता। कऱ्हेपठार सु॥ तिसा तिसैन अलफ मौजे मजकूर रा। शंकराजी राम सेनासमसहस्त्री यांकडे इनाम सेरीज करून मुकासा दिल्हा आहे त्यास मानिलेने इनामापैकी रुपये तीस वसूल घेतला तो फिरोन द्यावयास हुजरून आज्ञा केली आहे राजश्री विठल केसव त्या प्राते पाठविले आहेनी ते फिराऊन देवितील पुढे इनामतीस खलेल कोण्ही करणार नाही छ ४ रविलाखर

सुरु सुद

---

ले. ७३ श्री १६२० आश्विन व. १

(चां. सर.)

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री शंकराजी निलकंठराऊ स्वामी गो॥ सेवक शंकराजी राम सरसुभेदार लस्कर नमस्कार सु॥ तिसा तिसैन अलफ तुमचा इनाम मौजे चांबिली येथे आहे येसीयास इनामाबद्दल म्होन रुपये ३० तीस तुम्हापासून घेतले होते ऐसीयास तुम्ही हुजरून पत्र आणिले त्यावरून पैका घेतला होता तो फिराऊन दिल्हा मागेही कोण्हे काही घेतले नव्हते यानिमित्य पैके फिराऊन दिल्हे आहेत याउपरी तुम्हास काही उपसर्ग कोणाचा लागनार नाही जाणिजे बहुत काये लिहिणे रा। छ १५ रविलाखर मुर्तब सुद

---

ले. ७४ श्री १६२२ आषाढ शु. ७

(चां. सर.)

अखंडित लक्ष्मी अलकृत राजमान्य राजश्री बालाजी विश्वनाथ सरसुभेदार प्रांत पुणे गोसावी यास

सेवक रामचंद्र निलकंठ अमात्य नमस्कार सुहुर सन इहिदे मया व अलफ संकराजी निलकंठराऊ याचा इनाम मौजे चावली ता। कऱ्हेपठार येथे १ येक कास टका आहे व अंबराई चावली जेजुरी व पूर ता। कऱ्हेपठार व किकवी ता। निरथडी येथे आहे त्यास सालाबादप्रमाणे ता। सालगुदस्ता ज्याहप्रमाणे चालिले असेल त्याप्रमाणे सालमजकुर बिलाकुसूर सुरलीत चालवणे जाणिजे छ ५ मोहरम

* निर्देशसमक्ष लेखनावधि

---

* अक्षर वेगळे.

ले. ७५ श्री १६२२ अश्वीन व. ६

(चां. सर.)

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये राजश्री बालाजी विस्वनाथ नामजाद सरसुभा पुणे गोसावी यासि

सेवक शंकराजी नारायेण सचीव नमस्कार सु॥ इहिदे मया व अलफ राजश्री निलकंठराऊ पुरधरकर याचा इनाम मौजे चांबली तर्फ कन्हेपठार कास टका येक आहे त्यास तुम्ही तिजाईचा तगादा लाऊन राजश्री गणेश शकर निलकंठराऊ याजपासून साडे सहा रु॥ घेतले पुढे तिशा रुपयाचा रोखा केला आहे म्हणोन वर्तमानीं विदित जाहले येसियास या लोकाचे चालवावे लागते सालाबाद इनामपैकी वसुल घेतला नसता हाली तिशा रुपयाचा रोखा तुम्ही काये समजोन केला आहे· याउपर तुम्ही जो रोखा केला आसेल तो मना करणे साडे सहा रु॥ घेतले आहे- ती ते फिराउन देणे फिरोन ये गोष्टीचा बोभाट हुजूर येऊ न देणे सालाबादप्रमाणे* चालवणे छ २० जमादिलौवल पा॥ हुजूर

पत्रा
वधिरयं
भाति

---

ले. ७६ फारसी शके १६२३

(चां. सर.) शिक्का श्रावण व. ३

ता॥ गणेशपंडीत इनामदार मौजे चांबिली ता॥ कन्हेपठार पा॥ पुणे सु॥ हजार १११९ मालुम दानद की तुजला इनाम मौजे मजकूर आहे याची सनदपत्र तुज-जवली काय आहे ते घेऊन येणे उजूर न करणे न येस म्हणिजे मुलाहिजा होणार नाही रा॥ छ १६ रबिलावल+

---

ले. ७७ फारसी
शिक्का

(फारसी तीन ओळी मजकूर)

ता॥ गणेश पंडीत मु॥ सुपे मालूम दानद की चांबिलीची आपली जुमीन उट-वणे व भेटीस येणे तुमचा निशा दिलासा करून तुम्हास रजा देऊनु तर अलबत भेटीस येणे कौल करार देऊनु वाटे लाऊन तर आपली खातिरजमा राखोन भेटीस येणे कोणे गोस्टीची फिकीर न धरणे अलबत भेटीस येणे रा॥ छ ११ जिल्हेज पाटील आले आहेत तुम्ही येणे पाटिलास व तुम्हास सिरपाव देऊन रुकसत करून

---

* येथून अक्षरांचें वळण निराळें.

+ हें अस्सल पत्र असून त्याची रुंदी ३ बोटें व लांबी ७ बोटें आहे-

ले. ७८. श्री

दिगंबर स्वामी

राजमान्य राजश्री शंकराजीपंत नीलकठराऊ यास श्री.................याची आज्ञा येसीजे बहुत दिवस आपणाकडी..................मा रा मनाजीपंत व गणेशपंत येथे आले......बिसा..........वरून कलो आले आम्ही श्रावण वद्य प्रतीपदा परियंत.....................सो या नतर हे उभयेता येथे काही ग्रहकृत्याचा......यास श्रीपासी आले होते; येथे हि पांचाजणी उभयताना येथान्याये सांगितले की कर्जाचे लिगाड अवघे जे असेल (ते) मनाजीपंती वारावे व वडलाचे संरक्षण गणेशपं(ती) करावे येसे केले आहे व इनाम सेते पोते जे असेल ते आपण च म त ली त आहे आपणच चालवावे येसे केले आहे आपण......
...या प्रमाणेच निर्वाह करून उभयेतास सांगितले पाहिजे ये विशी विशेष काय लिहिणे

---

ले. ७९ श्री

राम राम

छ श्री सकल गुण सौजन्य महामेरु राजमान्य राजश्री मल्हारजी गाईक देसमुख पा सिरवल गोसावी यासि स्नेहांकीत कान्हो पद्मनाभी हवालदार कर्याती बारामती विनती विसेश तुम्ही कागद पाठविला मनास आला बाल पाटील मोकद्दम मौजे पळसी यांचे विशई लिहिले यावरून संग ठाकुरा देखता बाळ पाटिलास बोलाउनु सागितले तो बोलिला जे देशमूख आपले धणी वडील आहेती त्यासी रद्...करून कोणाच्याने बोलवेल आकस........आहे त्यास येका... देऊन जाला (पुढील भाग कसरीच्या भक्षस्थानीं पडल्यानें पाच सहा ओळींना मुकावें लागत आहे) ठाकुराच हाती पाठवणे हे विनती

शिक्का हे विनती

---

ले. ८० श्री

॥छ श्रीमत प्रोढ प्रताप दिनकर खांडेस्वरी सदा येसवत राजमान्य राजश्री मल्हारजी देसमूख पा सिरवल गोसावी यासि प्रती राघोजी कान्हो हवालदार व कारकून ता नीरथडी पा पुणे विनती उपरी येथील क्षेम जाणौऊनु स्वक्षेम लिहीले पाहिजे विसेश मौज पाडे येथील कृस्णाजी जनार्दन यासि तुम्ही येऊनु

दस्त करून नेले तरी दुसरीया प्रगणीयात येऊनु तेथील लोक धरून नेण हे कोणचे हिशेबे आमल गोसावी यासि कोणे दिधली आसल तो नादानच आसल

याउपरी दूर आईसोन रूस्णाजी मजकुरास पाठऊनु देणे आणि पुढे बहुत अकलेने बोल न लगे ते करणे रूस्णोजी मजकुरास पाठऊनु देणे जरूर न पाठवाल तरी त्याची विल्हे आम्ही देखोन परंतु तुम्ही कस्टी होल कलले असावे बहुत

मराठी अस्पष्ट शिक्का

लेहावे तरी तुम्ही स्याहाणे आहे हे विनती

अस्पष्ट शिक्का



## ले. ८१

(मौजे खंडाळे पा सिरवळ येथील पाटीलकीबद्दल खंडाळकर व गाढवे यांजमध्ये वाद सुरू असतां त्याचा निवाडा राजारामाच्या कारकीर्दीनंतर झाला. त्या अस्सल निवाडपत्राची कांहीं पानें मिळालीं. त्यांतील गाढव्यांची तकरीर तेवढी पुढें दिली आहे.)

' तकरिर कर्दे बो सिवाजी बिनसभोजी गाढवे व येकोजी बीन भोजजी गाढवे मोकदम मौजे खडाले प्रा मार लेहून दिल्ही तकरारि येसीजे आपला मूल पुरुश बलजी पाटील हा मौजे खडालीयात कुणबावा थल पलस जमीन चावर १८ कुणबावा करून होता ते समई खडागलीयावर दिवाणचा कसाला पडोन टका पडिला म्हणऊन खडागलीयानी पाटीलकी विकीली ते समई आपला मूल पुरुश बालजी पाटील याणे पाटीलकी खरीद केली पाटीलकी करू लागला त्याच लेक कायेकोजी आढाळराऊ याण पाटीलकी केली त्याचा लेक नाईकजी पाटील याणे पाटीलकी केली याचे लेक २

वडील बाबाजी पा याचा लेक भिलोजी पाटील याचा लेक संभाजी पाटील याचा लेक सिवजी पाटील पाटीलकी करितो

धाकटा लेक येकाजी याचा लेक भोजजी याचा लेक येकोजी

हाली सातवी पिढी सिवाजी पासून पाटीलकी खात आलो आपल्या वडिलाचे कारकीर्दीस खडागले उभे राहून वृतीचे भाडण कधी भाडिले नाही आगरे मागे हकीम दिवाणे जाली कारकीर्दी हैबतखान त्यावरी मलीक अंबर त्यावर जायेणापंत यावर माहाराज राजश्री साहेब याचे कारकून दादाजी कोडदेऊ त्यावर राजश्री छत्रपती साहेब त्यावर राजेश्री राजाराम साहेब इतक्या कारकीर्दी हकीम जाले यामधे खडागलीयानी आपल्या वडिलासी कधी वेव्हार भाविला नाही

आपण बाल पाटिला पासून आपली सातवी पिढी पावेतो पाटीलकी खात आलो आहो हे तकीर सही

---

ले. ८१ श्री शके १६५० आश्वि० शु॥१०

| | |
|---|---|
| ० श्री ० राजाशाहू न रपति हर्षनिधान बाजीराव बल्ला ळ प्रधान | स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५५ कीलक संवत्सरे आश्विन शुध विजयादशमी भोमवासरे क्षत्रिये कुळावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी यानी यादो गंगाधर देशपांडे पा। सिरवल यांसी दिल्हे वतनपत्र ऐसे जे तुमचा व खंडो केदार याचा वतनाचा गर्गशा लागला याबदल सन सलासामधे किले सातारियाचे मुकामीं स्वामी सन्नीध खंडो केदार फिर्याद जाला |

० श्री ०
श्रीआईआदि पुरूष
श्री राजाशाहुछत्रपति स्वामि
रुपानिधि तस्य श्रीनिवास परश
राम प्रतिनिधि

राजश्री दादाजी कोंडदेव याचा निमे वतनाचा महजर होता तो दाखविला ते प्रसंगीं गोविंद यादव व चिंतो महादेव व महादाजी गोविंद व देवाजी यादव व निलो विठल होते, त्यासी स्वामींनि आज्ञा केली कीं खंडो केदार याजपासीं रा। दादाजी कोंडदेव यांचा निमे वतनाचा महजर असतां यास काये निमत्य तक्षीम देत नाहीं त्यावरून यानी विनंती केली की या महजरा अलीकडे खंडो केदार याच्या व आपल्या वडीलाचा निवाडा जाला आहे आपले वडील रघुनाथ महादेव गांवीं आहेत त्यास आपले कागदपत्र आहेत ते घेऊन हुजूर येतो म्हणोन निरोप घेऊन गांवास गेले, मागा खंडो केदार यास निमे देशकुलकर्णाच्या वतनाची पत्रे दादाजी कोंडदेव यांच्या महजरावरून करून दिल्हीं व जिल्हेचीं पत्रे याणे करून घेतलीं त्यावरील सण अरबामध्ये गोविंद यादव व रघुनाथ महादेव व चिंतो महादेव हुजूर येऊन स्वामी सन्निध अर्ज केला कीं, स्वामींनी खंडो केदारास निमे वतन दिले याबद्दल आपण वतन सोडून घरीं बैसलों आहों तरी स्वामीनीं रूपाळू होऊन इनसाफ केला पाहिजे त्यावरून स्वामींनी आज्ञा केली की दादाजीपंताच्या महजरावरून निमे वतन खंडो केदारास दिल्हे तुमचा करिना काय आहे तो दखल करणें त्यावरी रघुनाथ महादेव याने आपला करीना विदित केला कीं आपला व खंडो केदार याचा मूल पुरूष लखो विठल त्यास स्त्रीया २ दोन वडील स्त्रीचा वडील पुत्र कान्होपंत तो आपला वडील धाकटे स्त्रीचा पत्र पुरुषोत्तमपंत खंडो केदाराचा वडील त्यास लखोपंत असतः वडील स्त्री मेली धाकटी होती घरांत कलह

होऊं लागला याबद्दल लुखोपंती उभयेता लेक घेऊन देशमुखाच्या घरास गेले तेथे सेट्यासही बोलावून आणिले आणि सांगितलें कीं आपण उभयेता लेकास वृत्ती वाटून देतो वाटणी बि॥

वडील कान्होपंत यास परगणाचे देशकुळकर्ण व गांवकुलकर्णे दिल्हीं हा वडील प्रबुत्व आहे यापासून देशकुलकर्णाची सेवा घेणें त्यावरी कान्होपंत बोलिला कीं परगणा वोस दिवे लावणी नाहीं ते मज देतां आणि अवघी जीवका कसबयांत तें व घरमवेसी माया मात्रा धाकट्यास देता आपण काये खावें त्यास लुखोपंत बोलिला की तूं वडील तुज अवघी वृत्ती दिल्ही आपले म्हातारपण तें मूल धाकटें याबद्ल घरमवेसी माया मात्रा व कसबाचें कुलकर्ण त्यास दिल्हें उरलें वतन तूं खाणें

कलम १

धाकटा परुषोत्तमपंत यास कसबा मुजेरी मोहतर्फा दोन्ही कुलकर्णे घर वाडा माया मात्रा मवेसी दिल्ही आपण याकडे राहिलों देशमुखास व सेट्यास सांगितले की कसबांच्या कुलकर्णाची सेवा यापासून घेणे

कलम १

येणेंप्रमाणें लुखोपंती देशमुखाचे व सेट्याचे साक्षीनसीं वाटे करून दिल्हे त्याप्रमाणें आपले वडील कान्होपंत त्यास उमर वर्षे ७० सतर देशकुलकर्ण खादलें त्यास पुत्र दोन वडील रत्नाजीपंत धाकटा विठलपंत यानी वतन खादलें रत्नाजीपंतास संतान नाहीं विठलपंताचा पुत्र रामाजी विठल उमर वर्षे ७० सत्तर खादलें त्याचप्रमाणें पुरुषोत्तमपंत उमरवर्ष ८५ पच्यासी त्याचा लेक तिमाजी पुरुषोत्तम उमर वर्षे ७५ पाऊणसे कुलकर्ण खात आले त्यावरी रा॥ दादाजी कोंडदेव यांजपासी तिमाजी पुरुषोत्तम व मुरार पुरुशोत्तम दोघे भाऊ उभे राहिले तेथे खाल्त करून गोतमुखें निवाडा न करितां निमे वतनाचा महजर करून घेतला तो प्रसंग जालीयावरी आपले आजे रामाजी विठल पुणीयास जाऊन मातुश्री जिजाआऊ साहेबापासी उभे राहून आपली हकीकत जाहीर केली वडिलाचे वर्तमान अवघे सांगितलें हाली दादाजीपंती गोतमुखे निवाडा न करितां निमे वतन तिमाजीस दिल्हें हे वर्तमान विदीत केलें त्यावरून मातुश्री साहेबीं दादाजीपंतास सांगितलें की यांचा निवाडा गोतमुखें करणें त्यावरून दादाजीपंतीं विठल गिरमाजी हवालदार प्रा॥ मजकूर यास पत्र दिल्हे कीं पा॥ मजकूरचे गोत जमा करून बरहक निवाडा करणें

तिमाजीपासीं महजर* आहे त्यावरी न जाणें ते पत्र घेऊन माहालास आले निवाडा व्हावा तों माहालात धामधूम जाली सर्वेच दादाजीपंत मृत्य पावले विज्यापुरीहून दिवाण मिया रहीम महमद कोंढाणा फत्ते करावयास आले त्यांकडे आपला परगणा व बारा मावळें जाली त्यापासीं आपले आजे रामाजीपंत उभे राहिले आपला गोतमुखे निवाडा न करितां निमे वतन तिमाजीस दादाजीपंती दिल्हें त्याचा निवाडा करणें त्यावरून त्यांनी परगणाचे देशमूख व समस्त गोत व तिमाजीपंत कोंढाणयास आणिले तेथे खेडे बारांचे गोत आणिले गोतमुखें निवाडा केला तिमाजी पुरुषोत्तम व मुरार पुरुषोतम यास गोतानें दिल्हें बि॥

| | |
|---|---|
| पहिले पासून मुजेरी मोहतर्फाची कुलकर्णे कसबे मजकूर<br>२ | नवें दिल्हें<br>३ देशकुलकर्णाचा हक देखील गांव कुलकर्णे<br>१ मौजे नायेगांव<br>१ मोजे सांगवी<br>१ मोजे केंसुर्डी<br>३<br>१ पेठ बुऱ्हाणपूर कसबे मजकूर कुलकर्ण<br>४ |

येणे प्रमाणे देऊन समजाविस केली वरकड गांवकुलकर्णे व देशकुलकर्ण रामाजी विठल यास दिल्हें त्याप्रमाणें रामाजी विठल वरशें वीस खात आले त्याउपरी आपले बाप माहादाजी राम यास उमर वर्षे सतर यानी खादलें हाली आपण उमर वर्षे बाहातर खात आहों तैसेच तिमाजीपंत व मुरारपंतीं खादलें त्यावरी तिमाजीचा लेक आपाजी यास उमर वर्षे साठी त्यानेही याचप्रमाणे खादलें आपाजीचा लेक केदारपंत यास उमर वर्षे पनास त्याने याचप्रमाणे खात आहे याप्रमाणे आपली हकीकत आहे स्वामीनीं कृपाळू होऊन बरहक निवाडा केला पाहिजे म्हणून त्यावरून स्वामिनी आज्ञा केली की तुमचे कागद पत्र असतील ते दाखवणें त्यावरून आपले कागद सदरहू तकरीरे प्रमाणें दाखविले व खंडो केदाराजवळ दादाजीपंताचा कागद होता त्याचा उलटा कागद आपणाजवली दाखविलाल त्याचा मजकूर

---

* रामाजी विठल व तिमाजी पुरुषोत्तम यांच्या तंट्याचा निकाल दादाजी कोंडदेवानें शके १५६५ मध्यें केला. तो ( खं. २०, ले ५३ ) पूर्वी छापला गेला आहे. त्यांत यांची वाटणी होऊन कुलकर्णाची मानमानपुक, हक लाजिमा व वृत्तीचें उत्पन्न कोणी किती घ्यावें याचा तपशील आहे. प्रारंभीचा कांहीं भाग फाटून गेल्यामुळें हा महजर दादाजी कोंडदेवाच्या देखरेखीखाली शिवापूर मुक्कामीं करण्यांत आला होता हें समजण्यास मार्ग नव्हता; पण आतां प्रस्तुत पत्रामुळें त्याचा उलगडा होण्यास अडचण पडत नाहीं.

मा। हजरत असडीत लक्ष्मी राजमान्य राजश्री विठल गिरमाजी हवालदार व कारकून प्रा। सिरवल यासी दादाजी कोंडदेव सुबेदार नामजाद किले कोंढाणा व माहालानिहाये विनंती सुहूर सन सीत अर्बैन अलफ रामाजी विठल देशकुलकर्णी पा। मजकूर हा कसबे पुंणें येथील मुकामी येऊन विनंती केली कीं आपला व तिमाजी पुरुशोत्तम याचा वतनाचा निवाडा गोतमुखे जाहला नाही स्वामीनी आपणास गोत देऊन इनसाफ केला पाहिजे ह्मणऊन सौवती मातुश्री जिजाआऊ साहेबांचे रुबरू बोलिला त्यावरून हें पत्र तुह्मास लिहीले आहे तरी परगणे मजकूरचे देशमूख व गांवगनाचे पाटील व सेटे माहाजन कुल वतनदारांचे माथा घालून हर दो जणाचा निवाडा हरएक कोण्ही कोण्हाची रुयात न करितां गोत न्यायें करणें सिवापूरचे मुकामीं वाटणीचा महजर करून दिल्हा आहे त्यावरी नव जाणें छ २५ सफर [ शके १५६८ चैत्र व. १२ ]

येणेंप्रमाणें दादाजी कोंडदेव यांचा कागद बजिनस दाखविला या कागदा आलीकडे दोन महजर गोतमुखें निवाडे जाले तेही दाखविले त्यावरून स्वामींनी आज्ञा केली की हरदोजण गोतांत जाणें त्यास खंडो केदार परगोत कबूल न करी आपण येकटा हे बहुत परगणाचे गोतास आपण राजी असों त्यावरी परगणाचे गोत देशमूख व गावगनाचे पाटील सेटे माहाजन कुलकर्णी व बलुते आवघे गोत हुजूर आणून पुसिलें कीं खंडो केदार याच्या व गोविंद यादव व उधो जगजीवन व रघुनाथ माहादेव व चिंतो माहादेव व माहादाजी गोविंद व वेकाजी कृष्ण व भगवंत भिकाजी व निलो विठल याच्या वतनाच्या कजिया बदल तुम्हास हुजूर आणिले आहे तरी तुम्ही श्रीकृष्णा स्मरोन यांच्या मूल पुरुषापासून कैसें चालत आले आहे तें सांगणें तफावत पडलीयां नागवले जाल त्यावरून गोताने श्रीकृष्णा स्मरोन हुजूर सांगितले कीं या हरदों वादीयांचा मूल पुरुष येक खंडो केदार याचे वडील कसबांची मुजेरी व मोहतर्फा दोनी कुलकर्णें खात आले यादो गंगाधर याचे वडील परगणांचें देशकुलकर्ण व बाहेरील गावकुलकर्णें खात आले दादाजी कोंडदेऊ यांचे कारकीर्दीस खंडो केदार याचे वडील यापासीं उभे राहून निमे वतन महजर करून घेतला त्यावरी रहीम महमद नामजाद किले कोंढाणीयांस आले त्यापासीं यादो गंगाधर यांचे वडील उभे राहिले तेव्हा त्याणी परगणांचे देशमुख व पाटील व सेटे माहाजन व समस्त गोत व ता। खेडेबारांचे गोत जमा करून गोत मुखें निवाडा करून उभयेता वादी यांची समजावीस केली खंडो केदार याच्या वडिलास गोताने दिल्हे वि॥

पहिले मूळपुरुषाने दिल्हे मुजेरी व मोहतर्फा कसबे मजकूर कुलकर्णे दोन
२

नवे दादाजी कोंडदेऊ याच्या महजरा उपरी गोताने समजाविसी करून दिल्हे
३ गावकुलकर्णें व देशकुलकर्णाचा हक देह
१ मौजे नायेगांव
१ मौजे सांगवी
१ मौजे केसुर्डी
—
३
१ पेठ बुऱ्हाणपूर कसबे मजकूर कुलकर्ण
—
४

येणेप्रमाणे कुलकर्णे साहा व तीन गावींचे देशकुलकर्णाचा हक देऊन समजावीस केली व यादो गंगाधर याच्या वडिलास परगणाचे देशकुलकर्ण व बाहेरील गावकुलकर्णे दिल्ही त्याप्रमाणे आजी तागाईत खात आले ऐसी गोताने साक्ष दिल्ही त्यावरून स्वामींनी आज्ञा केली की खंडो केदार याने साहा कुलकर्णे व तिनी गावचे देशकुलकर्णाचा हक खावा व यादो गंगाधर यानी परगणाचे देशकुलकर्ण व बाहेरील गावकुलकर्णे पहिले पासून खात आले आहेत त्याप्रमाणे खावे ऐसा निवाडा करून दिल्हा आणि तुम्हास हे वतनपत्र दिल्हे असे तरी तुम्ही सदर्हू निवाडीयाप्रमाणे परगणाचे देशकुलकर्ण व बाहेरील गावकुलकर्णे आपले वंशपरंपरेने वतन अनुभऊन सुखरूप राहाणे खंडो केदार यापासी पूर्वील कागदपत्र असतील ते व हुजूरची पत्रे व जिल्हेची पत्रे अगदी रद्द असेत *जाणिजे लेखनालंकार

मर्यादेय राजते

| | | | |
|---|---|---|---|
| रुजू सुरू | संमत | सा॥ | सा॥ |
| नीवीस | सुमंत | मंत्री | सरकार |
| बार सुद | सुरु सुद | बार बार | बार बार |

---

ले. ८३ + (वरला भाग फाटला आहे)

आपली पाटिलकी कदीमलयाम मौजे चावली ता॥ कऱ्हेपठार प्रा॥ पुणे येथील वडील वडील करीत होते ते समई कामथे याची नादणूक गावात जाली कारकीर्द पील पा॥ आपले वडील सेवेमुले देशांतरास गेले मागे कामथे गाव चालऊन होते तो मालजी मालेराव आमचे वडील रायाराव दौलतमगळ उर्फ भुलेश्वर येथे

* यापुढील मजकुर खाशांच्या हातचा.

ठाणे बांधून मुलकाचा सुभा करीत होते ये कारकीर्दीस वतन अनभवानिमित्य आले तो कामथे यानी कजिया केला की वतन आमचे आहे म्हणून हकीम रायाराव याजपासी जाऊन हकीकत सांगितली त्यानी कामथे यासी आणून न्याये करावा म्हणून मजकूर केला त्यासी राज्याची चलबिचल वोढीचा प्रसग रायाराव हकीम याचा बेत की द्रव्य हरतऱ्हे उत्पन्न बले करावे त्याउपरी राव निजामशाही इदलशाही चाल जाली त्या प्रसंगात मालजी भालेराव वोढगस्त कामथे पाढरीवर नादून खबरदार होते पैका सरकारात कबूल करून बलेच सारियाचे खोटे करावे हा निर्वाह करून इनसाफ न करिता गोष्टी साक्ष न पाहाता दिव्य करील त्याचे वतन हेच सला दिल्ही तेव्हा मालजी भालेराव यानी दिव्य कबूल करून दिव्य केले दिव्यास न लागता बलेच दिव्यास लागले हा शब्द आपले मजालसीस करून कामथे याचे दुमाले वतन करून मालजी भालेराव यासी मजालसीतून काढून लाविले हे गोष्ट दोन प्रहरातच केली तदनंतर मालजी भालेराव यानी गोत व लोक प्रातचे होते त्यास आपला हात दाखविला दिवी लागला नाही हे त्यानी पाहिल मुलूक कामथेयापासून पैका घेऊन रावजीनी केला येसे बोलिले तो महिना पधरा दिवसी इदलशाहीची जबरदस्ती जाली माहाराज शाहाजी राजे साहेबास प्रांत मजकूर देऊन त्याची फौज या प्रांतास आली रायाराव पराभऊन गेले माहाराजाचा आमल मुलकात चालिला तेव्हा माहाराजापासी भालेराव फिर्याद उभे राहून जाली हकीकत जाहीर केली ते खातरेस आणून प्रात मारी मामले करीत होते त्यासी हुकूम सादर केला की बरहक निवाडा करणे त्यावरून त्यानी जमीदार व गोत गावगना व ज्यासी दिव्यसमई हात दाखविला होता ते साक्षी आणून कामथे यासी पुर्सीस केली ते समई तकरीर प्रा। हकीकत साबूद जाली ते पसद करून सर्वांनी विचार केला की सेडकराचे वडील रोजगारामुले विदेसी गेलियावर कामथे यानी वतन चालविले आहे वृत्तीवर कसाला मसाला पडिला तो सोसिला आहे आणि नादणुकेनें बलावले आहेत वतन सेडकराचे खरे परंतु याचीहि स्थापना केली पाहिजे तरी कलह वारितो व पाढरीची वस्ती राहाती सरकारची उगवणी होती हे तजवीज पाहून मालजी भालेराव यास बुधी नीतीने सांगून वतन दो जागा निमेंनीम करून महजर करून दिल्हा तो भालेरायानी घेऊन जाले वर्तणुके प्रा। वतन अनभव काही दिवस कामथे व आपण करून नादिले पुढे राजाक्रांत मातबर जाला दिलीकडील मोगल आले मुलूक बेचिराख जाला देशातरास लोक गेले त्यावराबरी भालेरावहि गेले कागदपत्र इतबरु जागा ठेविले रोजगार संमधे दूर देशास गेले त्याचे सुखे तिकडे गुजराण करून ते व त्यांचे पुत्र राहिले त्यासी पुत्र तो क्रियाबाल लोकाचे देणे घेणे शरीरसमंध त्याच प्राते ममता तिकडेच लागली तो प्रांत मजकूर वस्ती जाली इकडे यावे हा हेत त्यासी बहुत

दिवस वतनावर आलो नाही विना कागदपत्र आलियासी कार्याचे नाही म्हणोन कागदाचा तलास करिता काही दिवस लागले त्याचे ठिकाण लाऊन तो घेऊन प्रांत मजकुरी आलो श्रीमंतराव कैलासवासी यांसी भेटून हकीकत निवेदन केली कामथे वतन बलाऊन गावांत सर्व आराधिदाईनें वर्तत आहेत त्याची आपली हकीकत मनास आणून इनसाफ केला पाहिजे हा सिधांत जाला इनसाफ करावा तो त्यास कैलासवास जाला पेस्तर पेसवाईचा बंदोबस्तीकरिता मंडाले बगाला प्रांते श्रीमंत स्वारीस गेले इनसाफ तैसाच राहिला वतना [ची] हकीकत येसी आहे वतन आपले खरे आहे महजर मनास आणून स्थापना करणार माहाराज समर्थ याप्रमाणे हकीकत खरी करून देऊ साहेबी पुसिले की वंशावली कैसी आहे ते जाहीर करणे तरी वडील पील पाटील यासी पुत्र च्यार राघोजी पा। १ यासी पुत्र रामजी यासी गोमाजी यासी येसाजी यासी हाली नारोजी हाजीर आसे लुखजी........जी यासी सिवजी यास आपण जनकाजी हाजीर आसे मालजी भालेराव.........यास चापाजी पुत्र दीपाजी पुत्र येसाजी हाली आसे व कान्हो यासी बापूजी पुत्र कान्होजी यास राणोजी यासी बापूजी हाली आसे

येणे प्रा। वंशावली आपली पील पाटील पाटीलकी करीत होते वृती अनभव करून नादत होते ते समई कामथे नांदावयासी अले जोरदार मेहनती म्हणून खेते देऊन ठेविले पील पाटील रोजगारामुले कर्जाला सुधा निघून गेले मागे राजक्रांत जाला कामथे जवल वस्तीत होते मुलकीचा कौला दर आमिली तजवीज होत जाई तेव्हा वस्ती करीत यामुले वलवटा घालून मालजी भालेराव यासी कजियासि उभे राहिले पेस्तर सदरहू प्रा। वर्तणूक जाली आपण कियाबाल सदरहू हकीकत वडील वडील सांगत आले तेणे प्रा। लेहून दिल्ही आसे व महजर आहे तो मनास आणून वतन दुमाले करणार माहाराज समर्थ आहेत हे हाकी [क] त लेहून दिल्ही सही+

---

+या तंट्याचा अखेर निकाल नानासाहेब पेशव्यांचे कारकीर्दीत शके १६७६ त झाला. त्यावेळीं ही हकीकत तयार केली आहे. हा व या पूर्वीचा लेखांक मौ. चांबळी जि. पुणें येथील पाटील रा. आपाजी बापूजी शेंडकर यांजकडून मिळाला.

ले. ८४ श्री

(चांबळी—सरनाईक) (नकल--मोडी)

तकरीर कर्दे बो दादो गंगाधर व बापू सखाजी व शंकराजी गणेश नीलकंट-राव सरनाईक किले पुरंधर सुा इहिदे सबैन मया व आलफ सके १६९२ विकृती-नाम संवच्छरे लेहून दिल्ही तकरीद ऐसाजे द्वारकाबाई कोम नारो नरसिंगराव ही स्वामीपासी फिर्याद जाली इच्या कजियाकरिता आम्हास बोलाऊन करिणा पुसिला ऐशास आमचे वडील बेद्रचे देशपांडे पुरातन बेद्रच्या पातशहाचे चाकर पुरंधर हस्तगत होऊन पुरंधरा खालील मुलूक सर होईना सबब आमचे पूर्वज निलोपंत व त्याचे पुत्र माहादाजीपंत या उभयता बाा दौलत फौज देऊन पुरंध-रास रवाना केले तेथे येऊन पुरंधर म (ह) बसाकडे होता तो जुंझोन कष्ट मेहनत करून घेतला हे पातशहानी ऐकोन माहादाजीपंतास बेद्रास बोलाऊन नेऊन बहुमान इनाम व दोन्ही किल्याची (पुरंदर व वजीरगड) सरनाईकी व राई व किताब देऊन फिरोन पुरंधरास निलोपंतासी रवाना केले किल्यास आलियावर निलोपंताचा काळ जाला किल्याचा बंदोबस्त माहादाजीपंती करून मुलकाचा पैका वसूल करून किल्याचा खर्चवेच करून पैका पातशाहास पाठवावा ऐसे रीतीनें माहादाजीपंत किलाचा कारभार वतने आनभवित होते त्या काळीं सिवाजी राज्यानी पुरंधरा भोवतील मुलूक काबीज करून किल्यास पैसा येईना ऐसे करून किला घ्यावा ऐसा प्रयत्न केला साध्य होईना सिवाजी राज्यानी फलटणकर निंबालकर याचे हातून राजकारण किला घ्यावा येविसी फार केली परंतु उपाये चालेना पुढे किल्यावर खर्च वेचाची वोढ फार पडली तेव्हा पातशाही कुमक व खर्चावेचास काही येईना तेव्हां माहादाजीपंतापासी दोन घोडे पागेचे होते व गड-करी होते ते बराबर घेऊन महिना पंधरा दिवस खाली उतरोन दो चो दिवसांचे स्वारीस पाठऊन येखादा गाव काफला करून मागती किल्यास जावे ऐसे करीत होते त्याचे पुत्र वडील निलोपंत हे भावार्थी सांगितले बुधीचे आसेत धाकटे शंक्रा-जीपंत दो वर्षांचे होते तोच माहादाजीपंताची स्त्री निवर्तली हे लहान पाटीत घालून माहादाजीपंती जवल बालगोन थोर केले आपले हाता खाली शाहाणे केले माहादाजीपंत आसताच किल्याचा कारभार देखरेख करीत होते तो माहादाजीपंताचा काळ जाला शंकराजीपंत सर्व किल्याची येखत्यारीच करीत होते उभयेता बंधू येकत्रच होते त्यास निलोपंताची स्त्री दाशिक होती घ (र) चे उपाध्या व लोक गडकरी यास फिताऊन मिथ्यातार्थ केला की शंक्राजीपंत धाकटे आसता सर्व कारभार करितात हे उतम नाहीं ते वेलेस उपाध्ये लाले यानी आनुमोदन दिल्हे शंक्राजीपंतास धरावे अगर मारावेसे केले परंतु संक्राजीपंत हास्तगत होईनात कर्ते पुरुष पागा लोक होते

त्याजला त्यारीस पाठवावयासी लागले त्याज पों निलोपताचे स्त्रीने फितावले त्यानी सिबदीचा गवगवा करून धरते राहिले व बाकीचे लोक व पागा साले स्वारीस पाठविली शंकराजीपंत किल्यावर दाहा पाचा लोकानिसी होते निलोपंताचे मिळताऊ लोक किल्यावर होते त्यानी निलोपंतानी ऐसा मजकूर केला हे शंकाजीपंतास ठाऊक नाही प्राथःकाळी शंकाजीपंत सदरेस तोड धूत बसलेत तो निलोपंतानी चाळीस पनास माणूस सुधा सदरेस हत्यारबंद चालून येऊन शंकाजीपंतापासी दोनच्यार माणसे होती त्यासी मारामार केली तेव्हा शंकाजीपंताचे जूज जाले निलोपंताकडील दोनच्यार माणसे ठार काही जखमी ऐसी जाली शंकाजीपंतापासी जमोयेत नव्हती खासा जखमी जाहाले दाहा पंधरा जखमा आगावर होऊन घायाळ जाले माणसे होती ती काही मेली काही पळाली ऐसे आसता निलोपंत वडील बंधु दया न येता शंकाजीपंत घायाळ पडले होते त्याचे डोके कापावयास तयार जाहाले तेथे कोण्ही मायेचे होते त्यानी निशेध करून सोडविले तेव्हा शंकाजीपंताची स्त्री होती त्यानी उचलून घरात नेले निलोपंतानी सदरेस बसून साखर वाटून दोन गडकरी याजबरोबर पत्रे देऊन सिवाजी माहाराज पुण्यात होते त्यास पत्र पाठविले की तुम्ही किल्यास येणे तुम्हास किला देतो सिवाजी राज्यास आवकाश होताच पत्र पावताच किल्यास गेले पाहाटेस निलोपंत आपल्या घरात निजलेच आहेत तो दरवाजे उघडताच दरवाज्यात जाऊन बंदोबस्त सदरेस लोकाचा बंदोबस्त करून निलोपंताचे घराभोवती चवकी ठेविली निलोपंत उठोन शोध करितात तो सिवाजी माहाराजानी आसे केले हे कलोन निलोपंत रागे भरोन सिवाजीराज्यावर हाला करावी ऐसा विच्यार करून वाड्याबाहेर यावे तो चवकी वाड्याभोवती बाहेर येऊ देईनात ऐसे निरोपाये जाले हे समजोन स्वस्त राहिले सिवाजी महाराजानी वाड्यातील वस्तवाणी बटकी च्याकर सर्व मोजदाद करून सरकारांत ठेविले संकाजीपंत जखमी पालखीत घालून व त्याची स्त्री व निलोपंत स्त्री सुधा राज्यानी आपले हाते खाली उतरली तो पुरात शंकाजीपंती पागा चाकरीस पाठविली ती येऊन राहिली होती ती राज्यानी आगदी आपले सरकारांत लाविली तेथून संकाजीपंत निलोपंत यास बरोबर पुणीयास आणिले लाल माहालात अटकेस कबिले सुधा ठेविले तबीब आणऊन शंकाजीपताचे जखमाची बरदास्त करविली संकाजीपंतास व निलोपंतास राज्यानी रुबरु सांगितले तुम्ही चाकर होऊन आपले बरे करून घेऊन चाकरी करावी शंकाजीपंती जाबसाल [केला] की आम्ही पुरातन पातशाही चाकर त्यासी हरामखोरी करून तुमचे चाकर म्हणवीत नाहीं निलोपंती जाबसाल केला कीं, आम्ही चाकर म्हणवितो आज्ञा करणे ती करावी तेव्हा पालखी दौलत निलोपंतास देऊन बायको सुधा चंदावर येथील मुलूक शाहाजी राजे यानी सोडविला होता त्या प्रांती रवाना केले निलोपंती

पाचा कारभार करीत होते ते समई श्रीमत्———सिवाजी माहाराज सिवापुरास येऊन बाग आमराई लावावयाकरिता धरणाचे काम लाविले ते समई प्रांत भोवरगावचे व जागोजागचे पाटील कामास जमा जाले ते समई धरणाचे पाणी निघावयास धोंडा मोठा होता त्यानी पाणी निघेना म्हणून येस पा तेथें कामावर होते त्यास महाराजानी आज्ञा केली की आम्ही स्वारीहून येतों तो पावेतो हर इलाज करून एवढा धोंडा फोडून काढून पाण्यास वाट करणे ऐसी आज्ञा करून माहाराजाची स्वारी गेलियावर मागे येस पाटलानें हर इलाज करून धोंडा फोडून पाणियास वाट सुरलीत करून दिल्ही नंतर पुढें माहाराजाची स्वारी आलियावर काम पाहिले धरणाचे पाणियास सुरलीत धोंडा फोडून वाट कोणे केली म्हणून पुसिले तेव्हा सभोवते लोक होते त्यानी आर्ज केला की येस पा कोढवेकर याने धोंडा आहे प्रो फोडून पाण्यास मार्ग केला तेव्हां येस पाटलावर माहाराज मेहरवान होऊन बक्षीस देऊ लागले तेव्हां येस पा याने आर्ज केला की वरकड बक्षीस नगदी दिल्हे तर खाऊन जाईल परंतु माझा भाऊ वडील सिव्हगडास गावसमधे कामकाजाकारितां नेऊन त्यास मारिले यास्तव कृपाळू होऊन मौजे मारचे मोकदमीचा इनाम मुसलमानाकडे आहे परतु मोकदमीचा कारभार आपल्याकडे आहे त्याचा कसाला पडतो यास्तव तेथे इनाम जमीन देविली पाहिजे त्याजवरून माहाराजानी जमीन सजगाणी इनाम करून देऊन सनद बावाजी पाटलाचा लेक वडील तावजी पा याचे नावे करून दिल्ही त्याप्रो इनाम सुरलीत चालावा तों आपला वडील येस पा याचा घरभाऊ वेकोजीचा वडील लेक मोराजी व पायाजीचा नातु बाळोजी पाचा लेक मालजी दोघानी येक विचार केला की येस पाने पाटीलकी समंधे इनाम मेळविला तो तिघानी वाटून घेऊन येथा विभागे वाटून खावा म्हणून खलेल केली खलेल केल्यापासून आज पावेतो पडलाच आहे इत्यादि

---

ले. १०६

( पहिला बंद महाल )

कोनेर राऊ व कृष्णाजीचे घर गेले त्रिंबक नारायेणाचें घर वाईस गेले तेथे जाऊन राहिले मुधोपताचे व आपले वडील मौजे राजेवाडी व आबीले ता कऱ्हेपठार येथे राहिले त्यावरी सलाबतखाने मुलकास कौल दिधला विलाती भरो लागली ते वेलेस खाडियाचे वडील जांब त्रिपुट वाईदेसीहून येऊन जेजुरीस राहोन सद्रहु गावीची जोतीसे कुलकर्णे चालऊ लागले आपल्या वडीलास दखल होऊ नेदीत मग......याबा बेलसरा......बेलसरा हे दोघे भाऊ यामधे........यासी बेलसरीच्या मोकदमाने हाती धरून सद्रहु गावीचा कारबार चालऊ लागला त्यावरी आपला वडील......याने खाडियाचे वडील मुतालीक ठेऊन वाराणसीस

गेला मागे विलोबा व त्याचे पुत्र होते त्यामधे व खाडियाच्या वडीलामधे भाडण लागले आपल्या वडिलापासि पुरुषबल नव्हते मग विलोबाने आपला पुत्र कमळाकरभट पाठऊन वाईहून त्रिंबक नारायेणाचा वडील आणून खाडियासी भांडो लागले येक दोनी निवाडे जाले खाडे नाटोपती त्यावरी आपले चुलते मुधो सिदो बाबाजी चाकरी करावयास विजापुरास गेले होते ते जेजुरीस आले त्यावरी आपला आजा विष्णुबा व येको नारायेण त्यानी वर्तमान मुधो सिदो बाबाजीपासि सागितले जे खाडे बलकट होऊन भाडताती तरी वृती काही आमचीच येकलियाची नाही तुमचीहि आहे तरी तुम्ही याचे पारपत्य करणे त्यावरी मुधो सिदो बाबाजीने मनी धरून कारकीर्दी मुरारजिगदेराऊ दौलतमगली रायाराऊ होते तेथे जाऊन खाडियासी नेले खाडियासी मुधो सिदो बाबाजी व विष्णुबा व येसो नारायेण यानि वाद सागितला दिव्य येसो नारायेणाहाती करविले बेलसरे खरे जाले मग महजर जाला मग हरकी दिवाणामधे आपला चुलता मुधो सिदो बाबाजीने दिल्ही मग अवघे जण बैसोन मिरासीचे गाव वाटून घेतले बितपा

| | |
|---|---|
| हिसा मुधो सिदो बाबाजी व विष्णुबाचा वाटा | हिसा येसो नारायेण व हिरो बहिरव वाटा |
| १ मौजे जेजुरी | १ मौजे बेलसर |
| १ मौजे साकुर्डे | १ मौजे कोलविबी |
| १ मौजे घलेवाडी | १ मौजे कोथले |
| १ मौजे मशिरे | १ मौजे नाविली |
| | १ मौजे निलूज |
| ४ | ५ |

येणेप्रमाणे आपणात आपण वाटणी आल हिसाब गाव वाटून चालऊ लागले त्यावरी मुधो सिदो बाबाजी जेजुरीस आला त्यावरी आपला आजा व आपला बाप यास जेजुरीच्या पाटिलास व पुजारियास निरवणूक केली जे हरएक विषई याचे चालवणे म्हणऊन दोघा जणास पाटीलाचे व पुजारियाचे हाती देऊन मुधोपत विज्यापुरास गेले त्यावरी तेरा-चौदा वरसे आपलाली तकसीम चालवीत असता खाडियानी कितेक मारेकरी आपलिया बापास घातले व कितेक घालाघाली चिंगीसखानापासि व नीलकंठ राऊ यापासि घातली घरे लुटविली बहुत नुकसान केले त्यावरी सोमाजी तानदेऊ खाडा पुणियास जाऊन तलब आणिली आपल्या बापास पुणियास चाल म्हणऊन मुडासे काढून मोरोपताचे पाये व आपला गला येक ठाई

केला आणि चल म्हणऊन उभा राहिला मग मोरोपता बाजीपासि हे वर्तमान खाडियाचे व आपले सागितले त्यावरी मुधो सिदोजी बाबाजी बोलिले जे तुम्ही प्रस्तुत गावास जाणे आपण जेजुरीस येउनु तेव्हा आपले तकसिमेचे गाव खाडियाकडे गेले आहेती त्याची दुगणी बापभावापासून घेऊन येसे बोलिलियावरी आपले बाप मोरोपत रीणपाणी देणे जाले होते याबद्दल करनाटकात रायाजी दतो व वेकाजी दतो यापासि जाऊन चाकरी दाहा बारा वरसे केली रीणपाणी फेडून गावास आले त्याणी गावा वाटून घ्यावे तो राजिकाकरितां तैसेच राहिले जेजुरी व साकुरडे हे दोन्ही गाव चालवीत होते त्यावरी काही कथला नसता त्रिबक नारायेण व बलवत राऊ हे दोघे भाऊ भाडो लागले जे कु त पटा मागो लागले आपल्या बापाने म्हटिले जे गाव तुम्ही खाता ते आमच्या हवाला करणे तुम्ही हे दोन्ही गाव खाणे मग पुढे वाटा लाखा होईल येसेच भाडण होत असता आपला बाप मोरोपत मेला व त्रिबक नारायेणचा बाप नारो बहिरव होता तो काही आपल्या बापासि भाडला नाही या दोघा जणानीं नाहक भाडण काडिले आहे हिमातीच्या बले वाटा नेऊ म्हणताती तरी हे हकीकती हाजीर मजालसी यासि जाहीर केली आहे तरी आपणास सुरत मजलसी करून दिल्ही पाहिजे म्हणऊन जाहीर केले त्यावरी हाजीर मजालसी कुल हकीकती व पहिले निवाडियाचे महजर मनास आणिले पूर्वपर भोगवटा व वारिसा मनास आणिता बाबाजी मोरदेऊ याचा व त्रिबक नारायेणाचा वारसा आहे जितके महजर भाडणे तितकी बाबाजी मोरदेऊ याचे वडील व त्रिबक नारायणाचे वडील येका विचारे भाऊपणे खाडियासी भाडिले आहेती व बाबाजी मोरदेऊ याचा चुलता मुधो सिदो बाबाजी याने वाद सागि [ त ] ला व हरकी दिल्ही ते वेलेस वरकडा बेलसरियानी दुसरे दाखविले नाही भाऊपणेच वाद सागोन गाव वाटून घेऊनु खात आले व तेवेलस कोण्ही बेलसरियानी आमचा हिसेदार नव्हे येसें जाहीर केले नाही व भाडण केले नाही हाली बेहिसाब त्रिबक नारायेण व बलवतराऊ कसाला करितो बाबाजी मोरदेऊ याचे बाप व आजे व त्रिबक नारायण बलवतराव याचे बाप आजे बाप भाऊपणे बिलाकसूर मिरासी खात आले आहेती हे हर दोजण येकाचे येक हिसेदार आहेती

---

ले. १०७ श. १५५२

## पुणें—ठकार घराणें

श्री नकल पारसीची सिका

अज दिवाण रस्तखान खासा बजानेबु कारकुनानी व देशमुखानी पो पुणे व मुकासाईयानीं व हुदेदारानी अजहती मुकासाई हालु व इस्तकबाल व मोकदमानी

बाजे कर्याती पा। मजकूर बिदानद सूर सन इहिदे इशरैन व अलफ भटानी ठकार बंदगी हजरती मालूम केले जे आपणासी इनाम जमीन चावर दर सवाद बाजे कर्याती पा। मजकूर बा। हुजती बजीरानी बितपसील

हुजती मलजी समान अशर व अलफ छ६मोहरम जमीन चावर २ दोन गज शरायानी

तपसील

मौजे घोरपडी शत भो कर चाव- येक १

मौजे सुस शत काऊ पाटील चा- वर येक १

येकूण चावर दोन देखील महसूल व नख्तयाती व पायेपोसी हाल व पेस्तर ता। देहे व ता। ठाणे कुलंबाब व कुलंकानु बिनाम रामकृष्ण भट बिन माहाद भट आहे

हुजती बनजी रणनवरा समान अशर छ २२ सफर जमीन चावर येक गजशराइनी दर सवाद मौजे बोपखेल पा। मजकूर देखील महसूल व नख्तयाती व कडबा बिनाम रामकृष्ण भट माहाद भट म्हणोनु आहे लंग

हुजती मुधुर्जी नाईक सन तिसा अशर व अलफ छ १५ माहे सफर जमीन चावर दोन गज शराइनी

मौजे नानगों चावर येक १

मौजे रोटी चावर येक १

येकूण चावर दोन नख्तयाती व महसूल ता। देहे व ता। ठाणे व पायपोसी व वेठा बेगारी कुलबाब व कुलकानु बिनाम विष्णु भट बिन माहाद भट म्हणोन आहे

हुजती जाधवराऊ छेतीसी समान अशर आलफ छ १५ मोहरम जमीन चावर निमे कीर्दी व निमे नाकीर्दी दर सवाद मौजे धाहरी पा। मजकूर देखील नख्तयाती व पायपासी व गला कुल बाब कुलकानु बिनाम रामकृष्णभट बिन महादभट म्हणो न आहे

येणे प्रमाणे फर्मान करून देणे म्हणोन रोखा मा। मदारी मा। अंबर येकंदर इनामदारानी इहिदे इशरैन व आलफ छ २९ जिल्हेज आहे फर्मान बसिके खास मऱ्हामती होय मालूम जाले बा। इशारती दिवाण आला बराहा इलुतमेसी देवविला भटानी ठकार नफर दोनी

रामकृष्ण भट बिन माहाद भट यासी इनाम जमीन चावर गज शरायनी साडे तीन देखील सदरहु बाबा

मौजे घोरपडी इत भोकर चावर येक १

मौजे सुसइत काऊ पाटील चावर येक १

विष्णु भट बिन माहा दभट यासी इनाम जमीन चावर गजशराइनी देखील सदरहु बाब

मौजे रोटी चावर येक १

मौजे नानगों चावर येक १

येकूण चावर दोन २ लग

बरहुकुम हुजती वजीरानी सदरहु दीधले आहे तेणे प्रमाणे दीधले असे ता। सन इसैन आलफ जेसा भोगवटा व तसरुफाती चालत असेल तेणे-प्रमाणे दुमाला कीजे औलाद व आफलाद चालवीजे दरहर साल फरमानाचा उजूर न कीजे तालीक घेउनु असले फिराऊन दीजे बा। रोसा ममलकत मदारी मा। अंबर येकंद्र इनाम (सिक्का) दारानी सदरहु छ २९ माहे जिल्हेज बा। सवाद दफ्तर खास मोहर

तेरीख ४ माहे जमादिलोवल सलासीन अलफ रुजु सुरनिवीस पा। हुजूर *

---

ले. १०८ श. १५९५ कार्तिक शु. ११

(शिक्का) स. १६७३ नवं. १०

अज रखसखाने राजेश्री जिजाआऊ साहेब दामदौलत हु बजानेब कारकुनानी हाल व इस्तकबाल व देसमुखानी व देसकुलकर्णीयानी कर्याती मावल ता। खडकवासलें पा। पुणें मालूम दानद सु॥ आर्बा सबैन अलफ रंगभट ठकार जोसी कुलकर्णी देह कर्याती मजकूर बितपसील मौजे कोंढे १ मौजे अइरे १ मौजें सिवणें १ मौजे कोपरे १ हे च्यार हि गाव भट मजकुराची मिरासी पिढानपिढी चालत आली आहे येसीयास क ह्वा त सालामधें परागंदा होऊन गेला त्याची आई गिरजाई व बाईल जानकी दोघी बाइका उरल्या येसीयास बाइकास कोन्ही पोसावया नाही मग विनायेक भट ठकार याची भेटीसी पुणियास गेल्या मग विनायेकभटी आपल्या गोत्रजाच्या बाइका म्हणऊन त्याचे समाधान करून तुमचा पुत्र आपणच म्हणऊन जानकीचे सासेस म्हणोन तुम्हास जितां रोटी मेलिया तुमची सतगती करून येसे बालोन त्यांस अनवस्त्र देऊन त्यांस पोसिले मग गिरजाई बोलिली जें आपला लेक वाचोन आला तरी मिरासी निमे तो खाइल निमे तुम्ही खाणें न ये तरी मिरासी सारी तुमचचि आहे तुम्हांस आपण दीधली आसें मग विनायकभटी आपला मुतालीक बापूजी ठेऊन मिरासी जोसी कुलकर्णी चालविलें येसें आजीवरी चालत आले आहे दरम्याने मिरासीच्या नागवणा पडल्या त्याही विनायकभटी दीधल्या येसे सुरलीत चालत असता दरम्याने

---

* नकलकारानें ज्या असल कागदावरून नकल लिहिली त्या असल कागदाच्या ८–१० ओळींचे कांहीं तुकडे या दप्तरांत मिळाले, त्यावरून ही नकल फारसीची नसून मोडी कागदाची आहे. या कागदाच्या पाठीवर सुम सूद, तालीक सूद, ज्याबता, सुरनिवीस वगैरे शेरे आहेत.

नागेशभट ठकार याणें मिरासी आपली म्हणऊन कथला केला दुसरा शकराजी भोवर पाचकुंडवी ठेविला होता तो मौजे आहेराचें कुलकर्ण चालवीत होता त्याणं हि कथला केला जे मौजे अयेरें तेथील कुलकर्ण आपणास अदन दीधले आहे यैसीयास जानकीस व नागेशभटास व भोवरास स्थल बुदीपाचेगाव दीधले तेथें नागेशभट खोटा जाला भोवर मुतालीक खरा येसा कबूल जाला यावरी दुसरा निवाडा रा। मोरोपंत पेशवे चिरंजीव राजश्री चे त्याजवली जाला तेथेंहि खोटा जाला मिरासी जानकीची खरी जाली मिरासी जानकीचे सासेने विनायेक-भटास दीधली आहे येसीयास सद्रहु चहू गावीची मिरासी जोसीपण व कुलंकर्ण विनायकभटाचे लेकी औलाद् व अफलाद् सावें येसे तहकीक जाले तरी तुम्ही चऊ गावचे जोतीस व कुलकर्ण विनायेक भटाच्या लेकाचे दुमाले करणें येकजरा उजूर न करणें पेस्तर जो कोन्ही हिलाहरकती करील त्यास ताकीद् करणें तुम्ही तालीक लेहोन घेऊन असल विनायक भटाच्या लेकाचे दुमाले करणे पा। हुजूर*

तेरीख १० साबान ( मोर्तबाचा वाटोळा शिक्का )

---

ले. १०९ श्री शकर श. १५९६ अश्वीन वद्य ८

स. १६७४ आक्टो. १२

॥छ मसुरल अनाम राजश्री माहादाजी नरस परभु हवालदार व कारकून ता। कर्याती मावळ यासि माहादाजी सामराज सुबेदार व कारकून सुभा माहाला-निहाय ता। मावळें सुहूरसन खमस सबैन अलफ राजश्री साहेबाचा हातरोखा छ १४ रजब पैवस्त छ २० मिनहु तेथे आज्ञा कीं मौजे आहिरें कर्याती मावल येथील कुलकर्ण जानकी कोम् रंगभट बिन बालंभट ठकार इची मिरासी आहे शकराजी भोवर मुतालिकीस ठेविला असे तो हाली काहाडुन आणिकी ब्राह्मण ठेविला आहे येसें असता यादव नामदेऊ याणीं चिरंजीव राजश्री संभाजी राजयांचा कागद् शकराजी भोवर याच कुलकर्ण म्हणऊन नेला असे उगाच कथला करि-तात म्हणउन सिधभट ठकार याणी येऊन सांगितलें तरी नवा कथला करावयाची गरज नाही संकराजी भोवर यासि मुतालिकीस ठेविले होते त्या ( सी ) कुळक-र्णासीं निसबत नाहीं जानकीचे कुलकर्ण मिरास सालाबाद् चालत आले असे तेणेप्रमाणे तिचें तीस चालवणे आणिकास दखल होऊं न देणे म्हणउन खुर्दखत सादर जालें तरी तुम्ही सद्रहू लिहिले प्रमाणे मौजे अहिराचे कुलकर्ण जानकी

---

* पत्राच्या पाठीवर "आऊसाहेब" अशीं अक्षरें लिहिलीं आहेत व जोड-गिरिवर मोर्तबाचे शिक्के आहेत.

बाइकोचे दुमाले करणे शकराजी भोवर मुतालीक त्याला या कुळकर्णासीं समंध नाही येसे जाणोन त्यास कथला करू न देणे तालीक घेऊन ( माहादाजी सामराजाचा शिका ) असल परतोन देणे छ २१ रजब मोर्तब सुद ( प. मो. )

पौ छ २४ माहे रजबु

१ श्रीशिव......माहादाजी सामराज ' असा अस्पष्ट शिक्का लागला. वर्तुळाकार आहे.

---

ले. ११० श्रीशकर श. १५९७ आश्वीन वद्य १४
स. १६७५ आक्टो. ७

मसुरल ऽ.नाम राजश्री माहादाजी नरस परभु हवालदार व कारकून ता। कर्याती मावल थासी माहादाजी सामराज सुबेदार व कारकून सुबा माहालानिहाये ता। मावलें सुरुसन सीत सबैन अलफ राजश्री साहेबाचा हातरोखा......जमादिलाखर पैवस्ती छ २ रजबु सादर जाला तेथे आज्ञा की सिदंभट ठकार याच कुलकर्ण देह ९॥ साडे नव कर्याती मावलीं असेती सालाबाद भोगवटा व कमावीश याचा यांसि चालत आली असे हालीं चंद्रभट ठकार याने खलेल करावया उभा राहिला असे की आपणास तकसीम यावी तरी वडिलापासून त्यास भोगवटा निसबती नसतां उगाच गला पडतो साहेबी ताकीद केली पाहिजे म्हणोन सिद्भटे येऊन मालूम केले तरी आजीवरी चंद्रभटास भोगवटा नाहीं व कथला कांहीं केला नाहीं आणि नवाच कथला करावया काय गरज असे साहेब कोण्हास नवें करूं देत नाहींत कारकीर्दी दादाजी कोडदेऊ चालत आलें असेल तें खरें तेव्हां भोगवटा जाला असेल तों मनास आणून तेणेप्रमाणें चालवणें म्हणऊन सिद्भटीं हुजूर जाऊन सुर्द खत आणिलें त्यावरून पेशजीचा भोगवटा मनास आणावयासि मौजे पासिणें कर्याती मजकूर येथे साडेनवां गावींचे पाटील माहार बलुते जमा करऊन सिद्भटांस चंद्रभटास मौजे पासिणीयासि पाठविले होते त्यास बा। तकरीर देसमुख व पाटील व कुलकर्णीं मौजे पासीणे लिहिले असे की सिद्भट हाजीर आहेत चंद्रभट हाली हाजीर नाहीत म्हणऊन तकरीर सांगितली येसीयास चंद्रभट गैरहाजीर जाले म्हणऊन सिद्भटाची साडे नव गावकुलकर्णास मनाई केली होती ते दूर केली असे तरी तुम्ही मनाई रोखे चालऊन गाव कुलकर्ण ( अमान )त केली असतील ते दूर करून पहिले जैसे मुतालिकाचे हाते काम घेत होतेस तेणेप्रमाणे पेस्तर गावकुलकर्णाचे काम मुतालिकाचे हाते घेत जाणे छ २७ माहे रजब तालीक घेऊन असल परतोन देणे मो। सुद[1] ( मो. शि. वा. )

पौ ३० रजब

---

१ मोर्त बसुद अशा दोन ओळींचा वाटोळा शिक्का.

ले. १११

॥ अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य दादाजी बायाजी परभु हवालदार व (कार) कून ता। खडकवासले व ता। माण या( सि ) मोरो त्रिमळ व निळो सोनदेऊ............अनुक्रमें नमस्कार सु॥ सी.........फ श्री विनायेक भट ठकार.........स अजरामऱ्हामती इनाम करू.........आहे तेथीळ नरूतयाती व बाजे कुलबाब कुळकानु देखीळ वेठी बे(गारी) दुमाले पडत आहे येसे असो .........कुरा कारणे मौजे मजकूर ता।.........साले आहे म्हणोनु नरूतयाती पैकी रुपये २५ पचवीस व भेटी म्हणौनु रुपये ( वां. शि. मा. म. प्र. ) येकूण सतावीस रुपये उचापत नेळी आहे म्हणौन इनामदारे हुजू ( र मा ) लूम केले तरी मौजे मजकूर कुलबाब कुलकानु भट गोसावियाचे दु( माले ) आहे इनामगांव असोनु उचापती...आहे ते रुपये सतावीस कागद देखत फिराउनु देणे या उपरि इनाम. . चा बोभाट येऊ ने दणे याउपरी बो( भाट ) आलिया ताकीद होईल येस समजणे आधीं सतावीस रुपये फिराउनु देणे आणि गावास काही तसवीस ( न ला ) वणे याची तालीक लेहोनु घेऊन असल इनामदारापासीं फिराऊनु ( दे ) णे छ ३ सौवाल पा। हुजूर रुजु ( 'मरत बसुद' या अक्षरांचा वाटोळा शिक्का. )

सुरु + + +

१ ( 'श्रीशिवन, रपतिहर्ष, निदानमाह्य, देव मतिम, तप्रधान' असा पांच ओळींचा वर्तुळी शिक्का. )

---

ले. ११२

श. १५९७ कार्तिक शु. ८
स. १६७५ आक्टो. १६

( वरचा भाग फाटला आहे )

अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री स्वामी गोसावी याचे सेवेसी सेवक माहादाजी नरसी हवालदार दार व कारकून कर्याति मावल दंडवत विनंती उपरी गोसावी याचे नि॥ गाव कुलकरणे साल मजकुरी देहाये बि॥ पर्वती निमे ( 1 ) देहाये ९॥ यासि बाद देहाये १॥ ता।

पर्वती पा। धाइरी का। मजकूर
पुणा देह जोतिसी गाव नीम
१ •॥•

बाकी देहाये साल मजकूर गाव कुलकर्ण ८ याचा तपसील अलाहिदा असे यासि साल गुदस्ता सन खमस हुजुरातीहून मिरासीदारी नस( त ) ( नि॥ ) पटी का। मजकुराबरी घातली होन १२०० यासि सुभाहून तह केल याव सन सुभ

१२०० यैन हुजुरातीहून पटी
  ५०० सुभाची कमाविसी होन
————
१७००

सतरासे होन पटी करून यापैकी गांवगना कुलकरणावरी पटी घातली त्यापैकी तुमचे दिमतीनें गांव कुलकरणावरी पटी घातली होनु (?) ... ... ... होन ५४॥ साडे चउपन होन यांचा उगवणीस तुम्ही लागलेत यावरी थोडा बहु(त) उसूल केला साल गुदरोन गेले यावरी सन सति नवे साल रिघाले यावरी द्रम्याने चंद्रभट ठकार हे आखाड महिनियामध्ये रा॥ माह्यदाजी सामराज सुभेदार माहालानिहाय ता॥ मावले याचे सद्रेस परबाहिरे सुभा रसद होन दीधले दि॥ माणको मल्हार होनु १८ अठरा ता॥

......रसद गुजारती माणको
सुभा दिवाली मल्हार होनु ५
हमजाद छ १६
रविलाखर होनु
  १३

येणे प्रा॥ रसद दीधली सबब गांव कुलकरणाची तकसी सिधेश्वर भट ठकार याजकडे आहे म्हणउनु तकद्मा रसद दीधलि यावरि रा॥ सुभेदारी निवाडियाबदल हर दो जणासी मु॥ श्री मौजे पासीणाच्या मुकामी नेम केला होता यावरी राजश्री सुभेदार छ २५ रजबी मौजे मजकुरी जाऊन राहिले तेथे तुम्ही हाजीर जाहालेत तुमचा वादी चद्रभट ठकार हाजीर जाहाला नाही गेर हाजीर जाहाला हे गोस्टी राजश्री सुभेदार पतास कलो आली यावरी रा॥ सुभेदारी तुम्हास सद्रहु देहाये मजकुरीचे गांवकुलकरणाची दुमाले सनद सारीच दीधली की सालाबाद तुम्ही आपली गाव कुलकरणे व जोतिसी जैसे खात आला आहा तेणे प्रा॥ तुम्ही आपली गांव कुलकरण दो जोतिसी यैसे चालवणे म्हणौन संनद सुभाहून दिधली असे ते सनदेची तालीक आम्ही पाहिली असे राजश्री साहेबाच खुर्द [खता] प्रा॥ माहाली वर्तनूक करून त्यावरून तुम्हास दुमाले खुर्दखत लेहून दीधवले असे चंद्रभटी गावकुलकरणे म्हणौउनु त्याही आपले तकसीम म्हणौनु द्रम्यानेच उसूल साल मजकुरी केला होन १८ अठरा याच्या हुजती दीधल्या आहेती तरी त्या हुज्जती रद असेती सद्रहु पेके मिरासीदारीचे हिसेबी नव्हेती म्हणौनु अमानत करून ठेविले असेती पेस्तर चंद्रभट हमे राहातील ते वस्ती त्याचे पेके त्यासि फिराऊन

यावे या प्रा ( वां. शि. मा. न. प्र ) हुजुरातीहून अगर सुभाहून हुकूम होईल तेणे प्रा अमल केला जाईल तरी सद्रहु पैके तखुब असेती तुमचे मिरासीदारीकडे मजुरा दीधले नाहीत कलले असावे छ ६ साबान हे विनंति ( 'मोर्तब सुद' या अक्षरांचा चतुर्दली लांबट शिक्का. )

१ ( + ० ⌣ +, श्री माहादा, जी नरसी, हप्रभु ' असा शिक्का )

---

ले. ११३

पुणें-ठकारदप्तर

मूल पुरुस मोरावा त्यास पुत्र ३

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| त्रिंबक | दादावा | वामनावा याचा भानावा यास | | | |
| आतावा | चागावा | पुत्र २ | | | |
| काकाजी | म्हाकावा | रघावा | दामोधर याचा माहादेव | | |
| मुधाजी | पिलाजी | नारावा | यास पुत्र ३ | | |
| गोपाल | केसावा | वामनावा | अवधूत | रामकृस्णा | विस्णुचे ३ |
| याचे २ | मोरावा | भानावा | याचा विसावा | यास २ | १ चद्रावा |
| दादावाचा | केसावा | बापुजी | यास नाही | ता। | १ माहादेव |
| गोदावा | | रघु | ० | रतनाकर | १ चितामणी |
| | | | | यास २ | ३ |
| | | | | १ गोपाल | |
| | | | | १ शकर | |
| | | | | २ | |

| | | |
|---|---|---|
| ......चा चा मोगावा | विनायक | |
| सिउवा | यास पुत्र ४ | |
| | ता। | चंद्रजवा |
| | १ त्रीबक | चेधरी |
| | १ दामोधर | माहादोवा |
| | १ सिधेस्वर | चालली |
| | १ स...... | १ |
| शके १५८० विलंबी नाम संव्छरे | | चितोवास |

---

ले. ११४ पुणें-पुरंदरे घराणें श.१५४३ आषाढ व. २ सोम० ता. २५।६।१६२१

छ. मा। कारकुनानी हाल व इस्तकबाल पा। पुणा यासि रायाराऊ...(येलाम) आकी व देसमुखानि पा। मा। मालूम बाद सु॥ इसने असरीन (का. शि. धा.)

अलफ द्रवज इनाम बा। धर्मादाऊ बो। माहादेभट अग्नीहोत्री पुरधरे कसबे मजकूर मालूम केले जे आपणासी इनाम द्रसवाद जकाती पा। मा। रुके ३ तीन सालाबाद चालिले आहे यावरी आपले भोगवटे गुम जाले मग कारकीर्दी मलिक अजम सिद्दी याकूद ठाणदार माजी यासि मालूम केले यावरुनु तिही द्रामाजी बलाल खोतु पा। मा। यासि बोलाउनु खातिरेसी आणोनु सद्रहु इनाम द्रोज रुके ८३ चालते केले आहेती यावरी सन इहिदे कारणे आपण साहेबाची खा। घेणे तरी आपण त्रिंबकास गेलो होता साल मजकुराकारणे गावास आलो येउनु साहेबाचे बंदगीस अर्ज करुन साहेबी खातिरेसि आणोनु मन्हामती केले माहादेभट अग्नीहोत्री पुरधरे यासि इनाम द्रोज जकतीवरी मोकरर रुके ८३ केले आहेती तेणे प्रमाणे चालविजे भोगवटे गुम जाले आहेती याचा उजूर न कीजे सालाबाद चालिले आहे तेणे प्रमाणे चालविजे द्रहरसाल खुर्द खताचा उजूर न कीजे तालीक घेउनु असेली परतोनु दीजे ( फा. मो. ) तेरीख १४ साबान.

---

ले. ११५ शके १५४४ कार्तीक शु. १२[1]

( चौकोनी. शि. मुधोजी, बजाजी, नयक, अशा अक्षरांचा तीन ओळींचा )

अजरख्तखाने मसुरल हजरत राजेश्री मुधोजी नाईक साहेब खुली दयाम दौलत हु बजानेब कारकुनानी हाल व इस्तकबाल देहाये पा। पुणे व अज जाहाती ( रवां सुद ) मोकासाई हुद्देदार व मोकदम मौजे पिपल्ले सौदागार पा। मजकूर बिदानद सु॥ सलास इसरईन असर ( ! ) अलफ बेरमी माहादे भट बिन मुद्गलभट पुरंधरे सेकिन पुणे हुजूर येऊन मालुम केले जें अपण का। मजकुरीं अग्नहोत्र वेदाध्यान करून असतो अपणास चावर येक इनाम करून दिधलिया अपण स्नान-संध्या करून तुम्हांस असीर्वाद देऊन असोन मालुम जाहाले माहादेभट बिन मुद्गल-भट पुरंद्रे सेकिन पुणे यासी मौजे मजकुरी अजरा मन्हामती चावर येक १ गज-शेरायेनी देखील माहासुल वा नख्तयाती तालुक ठाणे व ता। देह व पायेपोसी कुल-बाब कुलकानु दिधले आहे हद्दमहदूद घालून प्रज नेमून देणे द्र हरसाल खुर्द ख्ताचा उजूर न करणे तालिक घेऊन असेली इनामदार मजकुरास फिराऊन देणे मोर्तब ( कोयरीच्या आकाराचा व सूर्य चंद्र प्रारंभीं असलेला आणि 'मोरत' 'ब' या अक्षरांचा. )

तेरीख १० माहे मोहरम

मोहरम बार

---

१ शिक्का उलटा पडला आहे.

ले. ११६ श. १५५० वैशाख व० १०

(फा. वा. शि.) १८।५।१६२८

अज दिवाण पा। पुणा ता। मोकदमानी देहाये पा। मजकूर बिदानद सु।। समान इ।। अलफ बा। सु।। रा छ ८ माहे रमजानु पो। छ २२ माहे भिनहू सादर जाले तेथे रजा की बो। माहादेव भट बिन मुद्‌गल भट पुरधरे सो। का। पुणा वासी इनाम अजरा मन्हामती देणे वजीरानी जमीन चावर ३ ता।——

देणे सा।। सरकसखान इनाम जमीन चावर २ गज ० रायनी दर सवाद्

मौजे पिंपरी ना।[1] राहाटणी जमीन चावर येक बाबा येक महसुलेसी दुमाला कीजे

मौजे परवती जमीन चावर १ गजशराइणी दो। नरुतयाती व बाजे बाबा पायेपोसी व पटिया हाल व पेस्तर व महसूल कुलबाब व कुलकानूसी दिधले असे

देणे मा। हजरती राजेश्री मुधोजी नाईक जमीन चावर १ गजसरायणी दर सवाद् मौजे पिपळे सौदागर व दो। महसुले नरुतयाती व ता। ठाणे व ता। देहाय व पायपोसी कुलबाब कुलकानूसी दिधले असे

पा। मजकूर सदरहु येणे प्रमाणे वजीरानी भोगवटे व तसरुफाती कारकीर्दी दर कारकीर्दी चालीले आहे पा। मजकूर साहेबास मुकासा अर्जानी जाला आहे माह्मली कारकुनु ताजा सर्द सताचा उजूर करिताती साहेबी नजर अनायेती करुनु सर्दसत देवावया रजा होये मालूम जाले माह्मदेव भट बिन मुद्‌गल भट सेकीन का। मजकूर यास इनाम जमीन चावर तीन दर सवाद्—

| | | |
|---|---|---|
| मौजे पिपरी ना। राह्मटणी चावर १ | मौजे परवती जमीन चावर १ | मौजे पिपले सौदागर जमीन चा १ |

सदरहूप्रमाणे भोगवटे व तसुरुफाती कारकीर्दी दर कारकीर्दी सातिरेसी आणौनु ता। सन सबा चालिले असेल तेणे प्रमाणे चालविजे दर हरसाल सुर्दसनाचा उजूर न कीजे तुम्ही तालीक घेउनु असेली इनामतीदार मजकुरापासी फिराउनु दीजे म्हणउनु रजा बा। रजा रजेप्रमाणे अमल कीजे (शिक्का) रुजुनीवीस

तेरीख २१ रमजानु* माहे रमजानु

---

१ ना। = नजीक

* समान अशरीन अलफ ह्या साली रमजान महिन्यांतलि १८-२८ पर्यंतच्या ११ तारखा वर्षांच्या प्रारंभीं व अखेरीस अशा दोन वेळां येतात. खं. २० ले. २३० वरून श. १५४९ फाल्गुनच्या सुमारास शहाजी विजापुराहून 'पुणेतर्फेस येऊनु पा। मार कबज केले' आणि दोन महिन्यांनीं त्याला निजामशाहींतून या परगण्याचा मोकासा मिळाला असें प्रस्तुत पत्रावरून ठरतें.

ले. ११७ श. १५५० भाद्रपद शु० १
(फा. अष्टकोनी शिक्का) ता. २०।८।१६२८

अज रख्तखाने राजेश्री शाहाजी राजे दाम दौलत हु बजानेब कारकुनानी हाल व इस्तकबाल व देसमुखानी पा पुणे बिदानद सुा तिसा इशरीन अलफ (फा. वा. शि.) महादभट बिन मुदगलभट पुरधरे सो का मार हुजूर येऊन[1] मौलूम केले जे आपणास इनाम जमीन चावर ३ तीन अजरामन्हामती देणे वजीरानी दरसवाद देहाये पा मा बि ता

देणे सरकसखान चावर दोनी २८

देणे खा सरकसखान बा सुा छ १५ रबिलवल सन सलास इशरीन अलफ दरसवाद मौजे परवती देखील नख्तयाती व बाजे बाब व पायेपोसी व पटिया हाल व पेस्तर व महसूल कुलबाब कुलकानू चावर येक गजशरायेनी चावर १८

की देणे खा सरकसखान बा सुा छ १५ जमादिलावल सन आर्बा अशरीन अलफ दरसवाद मौजे पिपरी ना (नजिक) राहाटणी बाबा महासुलेसी चावर येक १८

देणे मुधोजी नाईक बा सुा छ १० मोहरम सन सलास इशरीन अलफ+ दरसवाद मौजे पिपले सौदागर चावर गजशराइनी देखील महसूल व नख्तयाती ता ठाणे व ता देहाये व पायेपोसी कुलबाब कुलकानू चावर येक १८

येणे प्रमाणे सालाबाद चालिले आहे हाली पा मा साहेबास मुकासा अर्जानी जाले असे माहाली कारकून सुा उजुर करिताती नजर अनायत फर्माउन सुा मन्हामती होवे म्हणौन मालूम केलें तरी भट मजकुरास सदरहु इनाम जमीन बा भोगवटे वजीरानी सालाबाद ता सालगुदस्ता तसरुफाती चालिले असेल तेणेप्रमाणें चालविजे दर हरसाल खुर्दखताचा उजूर न कीजे तालीक घेऊन असली सुा फिराउनु दीजे मोर्तब सुद (वा. शि.) रुजू सुरुनिवीस

तेरीख २९ माहे जिल्हेज

जिल्हेज सुरु सुद—

---

१ सनदापत्रें पृ.१०२ वर " मालूम केलें जें " पर्यंत छापलें आहे; व पुढील मजकूर गाळला आहे. २ श. १५४४ पौष वद्य १=७।१।१६२३. ३ श. १५४५ फा वा १= २५।२।१६२४. ४ कार्तीक शु. १२. १ ते ६ हीं ६ अक्षरें वेगवेगळीं आहेत.

ले. ११८ श. १५६६ चैत्र शुा १
ता. २८।२।१६४४

( फा. अष्टकोनी शि. )

अज रख्तखाने राजेश्री शाहाजी राजे दाईम दौलत हू बजानेबू कारकुनानी हाल व इस्तकबाल व देसमुखानी पाा पुणे बिदानद सुाा आर्बा आर्बैन अलफ माहादभट बिन मुदगलभट पुरधरे सेकीन कसबे मजकूर हुजूर येउनु मालूम केले जे आपणास इनाम जमीन जावर २ दोनी दरसवाद देहाये पाा मो बिताा–

| | |
|---|---|
| दर सवाद मौजे पिंपरी नजीक राहाटणी बाबा महसुलेसी चावर १ १८ | दर सवाद मौजे पिंपले सौदागर चावर गजशराइनी देलील महसूल व नख्तयाती ताा ठाणे व तो देहाये व पायेपोसी कुलबाब कुलकानु चावर १ |

सदरहुप्रमाणे गहदम सालाबाद चालिले आहे व साहेबाचेहि खुर्द खते पेसजी आहेती आणी हाली कारकून साहेबाचे खुर्द खताचा उजूर करितातो दरीबाब सरजाम होये मालूम जाले माहादभट बिन मुदगलभट पुरधरे साो कसबे मजकूर याचा इनाम सदरहू दर सवाद मौजे पिंपरी नाा राहाटणी चावर येक १८ व दर सवाद मौजे पिंपले सौदागर चावर येक गजशराइनी १८ देसील बाबा सदरहु भोगवटा व तसरुफाती गहदम सालाबाद चालिले असेल तेणेप्रमाणे चालवणे दरसाल ताजे खुर्दखताचा उजूर न करणे तालीक लेहोनु घेऊन असेली इनामदार मजकुरास परतोन देणे मोर्तबसुद ( फा. वा. शि. )

तेरीख २९ माहे जिल्हेज हजु सुरुनीवीस

जिल्हेज सुर्ह शुद

---

ले. ११९ श. १५६६ कार्तीक व १०
ता. १३ । ११ । १६४४

( चौ. फा. शि. )

अज रख्तखाने राजेश्री त्रिबकजी राजे दाम दौलतहू बजानेब कारकुनानी हाल व इस्तकबाल व देसमुखानी पाा पुणा बिदानद सुाा खमस आर्बेन अलफ माहादेभट बिन मुद्गलभट ( पुरदरे सेकीन कसबे ) पुणा हुजूर येउनु मालूम केले जे आपणास इनाम ( दरसवाद प्राा मज)कूर

---

१ हें सर्व पत्र आधी ओळ काढून मग लिहिलेलें नसून बाळबोधीप्रमाणें शब्द व अक्षराबरोबर आढळेल्या रेषेनें लिहिलें आहे. १ ते ६ हीं ६ अक्षरें निरनिराळीं.

जमीन ———————— चावर तीन ———— ३८

( मौजे परवती ) जमीन चावर येक देसील नरुतयाती ( व बाजे बाबा व पाय ) पोसी व ( पटिया हाल व ) पेस्तर व महसूल कुलबाब कुलकानू चावर येक १

मौजे पिपरी ता। राहाटणी बाबा महसुलेसी जमीन चावर येक १

मौजे पिपळे सौदागर जमीन चावर येक दो। महसूल व नरुतयाती ता। ठाणे ता। देहाये व पायपोसी ( कुलबाब ) कुलकानू चावर १ येक

लंग ———— ०

बदल दिवाबती बरमाहाल जकाती पा।
मजकूर दरोज रुके तीन ०३

( येणेप्रमाणे ) बा। फर्मान बसिके खास व भोगवटे वजीरानी व खुर्दखत शाहाजीराजे ( सालाबाद ) भोगवटा व तसरुफाती कारकीर्दी दरकारकीर्दी चालत आले आहे हाली पा। मजकूर ( साहेबास ) मुकासा अर्जानी जाला आहे तरी साहेबी नजर इनायेत फर्माउनु दुमाले खुर्दखत मन्हामती केले पाहिजे दरीबाब सरजाम होये मालूम जाले तरी याचा सदरहु इनाम जमीन चावर तीन३ (देऊन सदरहु)बाबा व बदल दिवाबती बरमाहाल जकाती मो। दरोज रुके ०३ बा। फर्मान (बसिके खास) व भोगवटे वजीरानी व खुर्दखत रा। राजेश्री शाहाजीराजे गहदम सालाबाद भोगवटे व तसरुफाती कारकीर्दी दरकारकीर्दी ता। सालगु। चालिले असेल तेणे प्रमाणें चालविजे (दरहर ) साल खुर्दखताचा उजूर न कीजे तालीक घेऊनु असेली इनामदार मजकुरासी परतऊनु देणे व मौजे परवती इनामजमीन चावर १ येक आहे त्या सदरहु ईनामास मुकासाई इस्कील करीताती म्हणोन मालूम केले तरी सदरहु इनाम मौजे परवता सेरीज करून मोकासा दिधला आहे इसकील करू ने देणे मोर्तब सुद ( फा. मो. )

तेरीख २२ रमजान
माहे रमजान

---

ले. ११० श. १५६९ आषाढ बा। १२

( शिवाजीचा प्रतिपच्चंद्र० हा शिक्का ) ता. १९।७।१६४७

अज रख्तखाने राजेश्री सीवाजी राजे दाम दौलतहु बजानीब कारकुनानी हाल व इस्तकबाल व देशमुखानि पा। पुणे बिदानद के सुहुर सन समान आर्बैन ( र+बी सुद ) अलफ बो। माहादभट बिन मुदगलभट पुरंदरे सेकीन कसबे मजकूर हुजूर येउनु मालूम केले जे आपणास बदल इनाम बर महाल—[ ले. ११९ मधील इनामाच्या तपसिला प्रों ]

---

+ अक्षर वेगळें.

येणेप्रमाणे बा। फर्मान हुमायुनु रा। खास व खुर्दखत ममलकत मदार मलिक अंबर व भोगवटे वजीरानी व खु॥ महाराज साहेब बा। सनद शुदा ता। सालगु॥ सन *सबा चालिले आहे हाली साल मा। कारणे मा। दादाजी कोंडदेऊ शुबेदार त्यासी देवाज्ञा जाली म्हणौनु माहाली कारकुन ताजिया खुर्द खताचा उजूर करिताती[1] दरींबाब नजर एनायत फर्माउनु सदरहु इनाम जमीन देहाये गावगना व नख्त हके तीन दुमाले करावया रजा होये बिनाबरा इलतमेसी खातीरेसी आणौनु माहादभट बिन मुदगलभट पुरंदरे यासि इनाम बरमाहाल बिता। ( ले. ११६ प्रमाणें पुनः इनामाचा तपशील. )

येणेप्रमाणें बा। फर्मान रा। खास व खुर्दखत ममलकतमदार मलिक अंबर व भोगवटे वजीरानी व खु॥ माहाराजसाहेब बा। सनद शुदा ता। सालगु॥ सन सबा चालिले असेली तेणेप्रमाणे मनासी आणौनु दुमाले करणे दर हरसाल ताजिया खुर्दखताचा उजूर न करणे तालीक घेऊनु असेली इनामदार मजकुरापासी फिराउनु देणे व रोजमुरा जकातीपैकीं हा। अवल सालापासूनु देत जाणे मोर्तब सुदु ( मर्या। देयविरा। जेत। अशा ३ ओळींचा शि. )

तेरीख २६ जमादिलाखर माहे रजबू सुरु
सुरुसुद नीवीस

---

ले. १२१ श. १५६९ पौष वा। ७
ता. ६।१।१६४८

( प्रतिपच्चंद्र० हा शिवाजीचा शिक्का )

अज रख्तखाने राजेश्री शीवाजि राजे दाम दौलतहु बजानीब कारकुनानी हाल व इस्तकबाल व देशमुखानी पा। पुणे बिदानद के सुहुर सन समान आर्बैन अलफ दरींविलें माहादभट बिन मुदगलभट पुरंदरे सेकीन कसबे मजकूर हुजूर येऊनु मालूम केले जे आपणास इनाम जमीन चावर १८ दरसवाद मौजे परवती पा। मा। देखील नख्तयाती व खर्चपटी व बाजे बाबा व पायेपोसी व पटिया हाल व पेस्तर व महसूल कुलबाब कुलकानू सालाबाद बा। खुर्दखत माहाराजसाहेब चालिले आहे दरम्याने आपण वाराणसीस गेलो होतो याकरितां इनामतीचे सेत नाकीर्दी पडिले होते याबदल आपण हुजूर जाउनु माहाराज साहेबाचे खुर्दखत आणिलें आहे सदरहू इनामतीचे सेत पटी खंडेराऊ व वडवटीपैकी हाली सालमजकुराकारणे कीर्दी जाले आहे माहाली कारकुनु ताजीया खुर्दखताचा उजूर करिताति दरींबाब नजर

---

[1] सनदापत्रें पृ. १११ वर या पत्रांतील "उजूर करिताती" पर्यंतचा मजकूर छापला आहे. *श. १५६८. हीं १ ते ६ अक्षरें वेगवेगळीं.

एनायत फर्माउनु दुमाले करावया हुकुम होये बिनाबरा इलतमेसी खातिरेसी आणोनु माहादभट बिन मुद्गलभट पुरंद्रे सेकीन का। मजकूर यांसि इनाम जमीन चावर येक दरसवाद मौजे परवती पा। मजकूर सालाबाद तसरुफाती चालीली असेली तेणेप्रमाणे दुमाले करणे दरम्यान हे वाराणसीस गेले होते म्हणौनु तसरुफाती तुटलीयाचा उजूर न करणे सदरहू सेत सेरीज करुनु मुकासाई याचे दुमाले करणे दरहरसाल ताजिया खुर्दखताचा उजूर न करणे तालिक लेहोनु घेऊन असेली खुर्दखत इनामदार मजकुरापासी फिराउनु देणे सदरहु इनाम सारा दुमाले करणे उजूर न करणे ( मर्या। दें वि। राजते। असा ३ ओळींचा शिक्का. )

रुजु सुरु
नीवीस

तेरीख २०
जिल्हेज

माहे जिल्हेजु

सुरुसुद

---

ले. १२१

श. १५७२ मार्ग० शु. १
ता. १७।११।१६५०

( फा. अ. शि. )

अजरख्तखाने माहाराज राजेश्री शाहाजी राजे दाइम दौलत हू बजानेब कारकुनानी हाल व इस्तकबाल व देसमुखानी पा। पुणे बिदानद सु।। इहिदे खमसेन ( फा. वा. शि. ) अलफ चो माहादभट बिन मुद्गलभट पुरंधरे जुनारदार सो। कसबे मजकूर हुजूर येऊनु मालुम केले जे अपणास इनाम जमीन चावर व रोजमुराबद्दल दिवाबती बिता। [ ले. ११९ त आलेल्याप्रों इनामाचा तपशील ]

सदरहूप्रमाणे चावर व रोजमुरा गहदम सालाबाद कारकीर्दी दर कारकीर्दी भोगवटे वजिरानी व बा। खुर्दखत माहाराज ता। सालगु।। सारा इनाम तसरुफाती जाली आहे साल मजकुराकारणे हुजरून साहेबाचे खुर्दखत छ १७ जमादिलाखर माहालास सादर आहे जे पा। मजकुरीचे कुल इनाम अमानत केले असेती येक रुका कोणास न देणे यावरून कुल इनाम कारकुनी अमानत केले त्याबराबरी आपला हि सदरहू इनाम अमानत केला आहे तरी माहाराज धर्मपरायेण आहेती नजर येनायत फर्माउनु सदरहू इस्कील दूर करून आपला इनाम आपले दुमाले केला पाहिजे दरी बाब सरंजाम होये मालुम जाले तरी माहादभट बिन मुद्गल भट पुरधरे सो। कसबे मजकूर याचा इनाम सदरहूप्रमाणे ता। सालगु।। सारा तसरुफाती जाली आहे हाली साल मजकुरा कारणे सदरहू पैकी निमे इनाम अमानत

---

१ ह्या पत्रांत ळ च्या जागीं ळ स्पष्ट लिहिला आहे. + हीं अक्षरें वेगळीं.
२ येथें मोडी ळ काढला आहे.

करून निमे इनाम भट मजकुराचे दुमाले करणे येसी मोईन केली आहे तरी सदरहूपैकी निमे येणेप्रमाणे अमानत करणे बिता।

जमीन चावर अज ३ पैकी निमे अमानत करणे चावर १॥• बा। मौजे पिंपरी पा। बा। पर्वती चावर १ चावर येन १ पैकी दुमाले भट मा। चावर •॥• बाकी अमानत करणे चावर •॥•

रोजमुरा दरोज अजरुके ८३ पैकी निमे दुमाले भट मा। रुके १॥ बाकी निमे अमानत करणे रुके १॥

सदरहू प्रमाणे निमे अमानत करणे बाकी निमे जमीन चावर व रोजमुरा येणे प्रमाणे भट माचा दुमाले करणे बिता।

जमीन चावर १॥ गजशराइनी १॥

दर सवाद मौजे पिपले सौदागर चावर १

दरसवाद मौजे पर्वती अज चावर १ पैकी निमे अमानत बाकी दुमाले भट मा। व पाटी देसील ख सेत पाटी जमीन चावर निम •॥•

रोजमुरा बदल दिवाबती जागा बर माहाल जकाती अज दरोज रुके ८३ पैकी निमे अमानत रुके ८१॥ बाकी निमे दुमाले करणे रुके ८१॥

देसील नख्तयाती व महसूल व बाजे बाबा ता। ठाणे व ता। देहाये पायेपोसी खर्चपटी कुल बाब कुलकानु दुमाले करणे

सदरहूप्रमाणे हाली मोइन केली असे सदरहूप्रमाणे निमे दुमाले करणे साल मजकुराकारणे सदरहू इस्कील सादर आहे त्याचा उजूर न करणे व याचे घर जलाले त्याबराबरी पेसजीचा भोगवटा याचे कागद कुल पहिले जलाले आहेती त्याचा उजूर न करणे हाली मोइन सदरहूप्रमाणे केली आहे सदरहूप्रमाणे निमे भट

मजकुराचे दुमाले करणे तालीक लेहोनु घेउनु असेली परतोन देणे दर साल ताजा खुर्द सताचा उजूर न करणे भट मा। ज्या प्रजेस सद्रहू जमीन लावितील त्या प्रजेस तुम्ही वेठी बेगारी फर्मासी जरा तसवीस नेदणे हा। अवल सालापासूनु स चालवणे पा। सा। जैनाखान पीरजादे मोर्दबसुद ( मो. ब. को. )

तेरीख २९ मादे जिलकादी

जिलकादी रुजु सुरुशुद

---

ले. १२३ श. १५९७

श. १६७५

राघो बलाळ सुमेदार व कारकुन यांसी ( १ ) यांस पत्र पाठविले सु॥ सीत सबैन अलफ–महाराजसाहेबाचे खुर्दखत माहादभट बिन मुदगलभट पुरधरे यांनीं दाखविलें तें पाहिलें तरी पूर्वीच्या भोगवट्याप्रमाणे याजकडे परवती पिंपळे पिंपरी येथील इनाम जमिनी व रोजमुरा "सालगुदस्ता गलबलिया करिता भोगवटा जाला ( नसला ) तरी पलिकडील सालप्रमाणे" पुढें चालविणे बद्दल मजकुराचें पत्र बरेंच फाटलेलें असून वरील भाग गेला आहे, शेवटीं मोर्तब सुदचा शिक्का असून शिवाय वर मजकुरास लागूनच डाव्या हातास ( श्री । च्या मागे पुढें सूर्य चंद्र असून राजेश्री । राघो ब । लाळ । अशा अक्षरांचा व चार ओळींचा शिक्का आहे. )

---

ले. १२४ श्री श. १५९९ माघ शु॥ २

ता. १४।१।१६७८

राजश्री त्रिंबक गोपाल सुबेदार व
कारकून सुबा पा। पुणे गोसावी यांसि

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य—सेवक माहादाजी अनंत सरसुबेदार सुबे माहालानिहाये नमस्कार विनंती सु॥ समान सबैन अलफ वेदमूर्ती राजश्री माहादेभट बिन मुदगल भट पुरंदरे सेकिन कसबे पुणे यास इनाम व रोजमुरा राजश्री —साहेब पुणा असता जेणे प्रमाणे भोगवटा चालिला असेल तेणेप्रमाणे हाली ता। सालगुदस्ता जेणेप्रमाणे चालिले असेल भट गोसावीयाच्या दुमाले पडिले असेल तेणेप्रमाणे चालवीत जाणे दर हर साल ताजा सनदेचा उजूर करीत नव जाणे

---

१ ते ५ ही अक्षरें निरनिराळीं व जोडावर शिक्का वेगळा आहे.

तालिक लेहोन घेउनु असल परतुनु देणे छ ३० जिलकादी 'पत्राव धिकारि श्रीमुद्रा ( वाटोळा. शि. त अक्षरें व ३ ओळी अशा ) ( बाजूस शि. ५ ओळींचा. त्यांतील कांहीं अक्षरें लागलीं तीं अशीं ) १ शिव + २ + + ३ भूपि नः ४ महादेव मुद्रा म, ५ कृतिष + +

---

लें. १२५ श. १५३८ श्रावण व. १

ता. १९।७।१६१६

( फा. वा. शि. ) हैबतखान

छ अज रूतखाने खोदायेवंद खान अलीशान—साहेब खुली दामदौलत हू तां कारकुनानी पा। पुणा चिदानद की हर्वी सु॥ सन सबा असर अलफ सेत पाचुद प्रज पद्माजी राम होनप व कुर्ण नदीकिनारे दर सवाद मौजे वेहरवडे ( ता। ) मजकूर

सेत पाचुद प्रज पद्माजी राम कुरण व सेत नदी किनारे मा ( हासु ) होनप रकम गला ४।३॥ ल नरूतयाती वा नकद कटयाण टके ३२ बा। इनाम गणो गबाजी तवीब सेकीन का। मजकूर या ( ! ) औवलियाद अफवादु बमोजिब भोगवटा खुर्दखत रूतखा मोकरम दर साल गु॥ छ २६ माहे दो माहासूल नरूतयाती वा बाजेयार बाबे मुतेन रवा अस्त बायेद की येशाब की जाबात सन तल मजकूर बा। सालगु॥ दिल्हे असे दुबाला कीजे तालीक लिहून घेउनु असली परतोनु दीजे मो।

+ तेरीख १४ माहे रजब

---

लें. १२६ श. १५४० श्रावण शु॥ ९

( फा. शि.१४ दलांचा ) ता. २१।७।१६१८

( २४ ओळी फारसी मजकूर व तीन शिक्के )

अज दिवाण रा। खा। सो। वजानेबु कारकुनानी हाळ व इस्तकबाळ व देसमुखानि पा। पुणे व मुकासाइयानि व हुदेदारानि आाहर्ता मुकासाइ हाळ व इस्तकबाळ व मोकदमानी देहाये बाजे कर्याती पा। मजकूर चिदानद शुहुरसन तिसा अशर व अलफ गणो गबाजी तबीब सो। कसबे पुणे बंदगी हजरती मालुम केले जें आपणासि इनाम जमीन सेत व बाग व आंबे व बाजे झाडोरा व कुरण दर सवाद बाजे कर्याती पा। मजकूर बिता।

---

१ ऐ. सं. व. १ अं. २–३ पृ. ३४ वर ले. १ मध्यें हें इनाम नमूद आहे. + पत्राच्या मागेंहि असेंच आहे.

जमीन सेत व कुरण दर सवाद मौजे वेहरवडे देणें हैबतखान हुजती सन अर्बा अशर व सन सबा अशर

जमीन सेत पाचुंद्रे प्रज पद्माजी होनप रकम गला खंडी ४।३॥.

कुरण सेत नदी किनारे महसूलु नख्तयाती व नकद कटु बाण रकम टके बत्तीस ३२

जमीन बाग दर सवाद मौजे देहू देखील महसूल व नख्तयाती व सेव व बाजे बाब व पायपोसी कुळबाब व अंबराई गैरी पडती नव बाजे झाडोरा प्रज जाऊमा बाग येके हुजती हैबतखान सन सबा असर व अलफ व सन समेस अलफ पेसजी भोगवटा व तसरुफाती प्रमाणे यासेरजि भोगवट गुम जाले

सद्रहूप्रमाणे भोगवट व तसरुफाती सालाबाद चालत आहे ये हरनिसबती फर्मान करून देणे म्हणोनु रोखा खा मा मदारी मा अंबर सन समानं अशर व अलफ छ ५ माहे जमादिलाखर आहे फर्मान मन्हामती होये मालुम जालें बा इस्यारती दिवाण आला बराये इलतमेस देवविले गणो गबाजी तबीब सो कसबे पुणे यासि इनाम जमीन सेत व बाग व कुरण व आंबे व बाजे झाडोरा दर सवाद बाजे कर्याती पा मजकूर देखीळ सद्रहू बा हुजती खा हैबतखान दिधले आहे तेणेंप्रमाणें करार केलें असे ता सन सबा अशर व अलफ जैसा भोगवटा व तसरुफाती चालत असेली तेची हर निसबती दुमाला कीजे औळाद व अफलाद चालवीत जाईजे दर हरसाल फर्मानाचा उजूर न कीजे तालिक घेउनु असेली फिराउनु दीजे बा रोखा मलिक अजम सन समानं अशर व अलफ छ ५ माहे जमादिलाखर बा सवाद दफ्तर खा(स) मोर्तब सुद ( मोर्तब षट्कोनी )

जमीन सेत व ( वरीलप्रमाणें ) जमिन बाग दर ( वरीलप्रमाणें )




+ ६ हि अक्षरें वेगवेगळालीं. १ श. १५३५ व १५३८. २ श. १५३६. ३ श. १५३९ ज्येष्ठ शु. ६ ( ता. ३०।५।१६१७ ). ४ हा हिजरी सन १०२७. ५ त्रै व. २ पृ. ५७ पहा.

ले. १२७

श. १५५२
स. १६३०

( फा. अ. शि. )

अज दिवाण ठाणे + + ता। मोकदमानी देहाये + + + मौजे आवेते ता। पौन + मौजे वाडिवले ता। नानेमावल सा। मजकूर बा। सु॥ इहिदे सलासीन अलफ बोपाजी गणपती तबीब ना। किले मजकूर हुजूर मालुम केले जे आपणास तनखा बा। सुर्दा दर माहे होनु ४ तैनाती + + + + + + + + + + खास मौजे आविते देह सारा व ता। उबर मौजे वाडिवल सादर आहे यासि ठाणाहुनु साल निषतांच डुमाले सु॥ मन्हामत होत नाही वरात सनदेन आदा तुटतो येणेकरुनु वख्तसीर आदा होत नाहीं आपण रंजीस होतो ये बाबे हुजूरही येक दोनी मार्गे + + + करुनु तनखा कुलबाब देहाये विहीवाटी फर्मासी डुमाले करणे म्हणोनु सनद घेउनु माहालास आलो सनदे प्रमाणे माहाली सरजामी देवणे तरी बाजे तनखेदार आहेती ते रयती न जात सनद तुटते आपण ब्राह्मण आहे आपणांस व पाटिलास आदा जाला पाहिजे साहेबी नजर येनायत फर्माउनु साल मजकुरापासुनु बा। सनद बा। सिके खास येकंदर सु॥ देवविली बाज वरातेचा उजूर नव्हे आपणांस वख्तचा वख्त आदा होत जाईल इतार आखेर साली जे तनखा होईल ते हिसेबे वजावाटाऊ देत जाईल सरजाम होये मालुम जाले बोपाजी गणपती तबीब यासिहे तैनाती दर माहे होनु ४ येकुनु होनु ४८ यासि जागा

| मौजे आबिते | | उबर ता। मौजे वाडिवले | |
|---|---|---|---|
| अैन होनु बा। | सु॥ | होनु बा। | सु॥ |
| खर्च पटी | ४२६८७ | खर्चपटी | ५१८३ रकम |
| ॥ | ३ + भात | ·।॰ | ११॥॰+ +भात |
| | ४२६८७ | | ५२॥५ |

येकुनु होनु ११॥॰ खुर्दा टके ४८१॥। येणेप्रमाणे येकंदर बेरिज सदरहू तैनातीच्या येवजास डुमाले केले आसे वरात सनदेचा उजूर न करणे खर्च पेसजी आदा बसेली तो वजा करणे पेस्तर सदरहू बेरीज पाठ + +

---

ले. १२८

श. १५६२
स. १६४०

( फा. शि. अनेकदली )

( दहा ओळी फारसी मजकूर )

अजरहुनखाने खुदायेवंद खान अजम मोहमदखांन काजी सैद साहेब दाम दौलत हू ता। कारकुनानी ता। नानेमावल किले लोहगड बिदानद की हर्चीं सु॥

सन इह्दिदे अर्बैन आलफ दरीविले बोपाजी गणपती तबीब किळे मजकूर हुजुरु येउनु मालुम केले जे अपणासि मोकासा दर देहा ताा मजाा देहा १॥ बिाा

मौजे गोमुत्री — मौजे नागरगाऊ

देहाये सारा कुल — निमे देहा ·॥·

बाब १

मौजे बोडवल्ले देहा ·।·

अज रा मराहीम कुलबाब कुलकानु दुबाला असे तरी हाली साहेबासी तपे मजकूर मोकासा अर्जानी जाहालेवरी माहाली कारकून खुर्द खताचे उजूर करून देहाये मजकुरु दुबाला करीत नाही साहेबी नजर इनायेत फर्माउनु खुर्दखत मरहामत कराब्या रजा फर्मावणे म्हणून तरी मालुम जाले अता बोपाजी गणपती तबीब सो किळे लोहगड दर वरुत मुकासा साहेब १॥ ताा मजकुरु देखील माहासूल वा नकदयाती कुलबाब कुलकानु व वेठी बेगारी व फर्माइयेसी व पायेपोसी व खर्चपटी व फर्मा मा ( स ) तवा वरहाड [ लग्न ] टका व पाटदाम व बाजेपटीया देखील दुबाळा केले आसे दुबाला कीजे दर हरसाला खुर्दखताचा उजूर न कीजे तालीक लिहून घेउनु असल खुर्दखत परतून दीजे मोर्तब सुद ( फा. मो. )

---

ले.१२९ — श. १५७५ माघ व. ९
ता. १।२।१६५४

असेली

७ माा बाा दया राजेश्री हुदेदार व मोकदम काा पुणा पाा माा यासि सिदी अंबर बगदाद हवालदार व कारकून पाा माा सुाा अर्बा खमसैन अलफ बोा विनाजी फर्जंद नागोजी तबीब सो काा माा ( फारसी वाटोळा शिक्का ) ठाणा मालूम केले जे अपणास इनाम जमीन चावर १ऽ यकंदर सवाद काा माा देाा माा व नख्तयाती व पायेपोसी खर्चपेटी कुलबाब कुलकानु आहे यास हुजरून सदरहू चावर पैकी नीम चावर आपले दुमाला केले आहे पंच साल मजकुराकारणे हुदेदार व मोकदम ताजा सनदेचा उजूर करितातो सनद देवविली पाहिजे म्हणौन मालूम केले तरी यासि जैसे काही सालगुाा चालिले असेली तेणेप्रमाणे सालमजकुरीहून दुमाळे करणे तालिक घेऊनु असेली परतउनु देणे मोर्तबु+ सुद रुजु ( फा. मो. )

तेरिख २२ माहे रबिलावल

---

+ अक्षर वेगळें

ले. १३० * श्री * श. १५७७

राघोजी स. १६५५

बळाळ

( अष्टकोनी अशा तीन ओळींचा ! )

अज दिवाण ठाणे पा चाकण ता मोकदमानी मौजे वेहरवडें पा पुणे हाली कमावीस पा मा सुा सीत समसैन अलफ बो गणो गबाजी तबीब इनामदार सो का पुणा ठाणा येउनु मालूम केले जे आपणासि इनाम दर सवाद मौजे मजकूर व बा फर्मान व भोगवटे वजिरा( नि ) कारकीर्दी दर कारकीर्दी येणेप्रमाणे इनाम आहे बितपसिल

सेत निसारी प्रज पद्माजी राम होनप कास रुके ·॥· येकूण

महसूल गला दर ससगाणीस निमे नरुत व निमे गला

निमे नरुत कटु बाण येन जिनस गला

·॥१८॥ जोरी दा मापाऊ

दर खंडीस टके ११॥~॥ मण ·॥१८·॥

या टके ५॥ गला जोरी केलो

कडबा पुलें २८ २८४.

येकूण नरुत टके

२३॥

कडबा पुले ११२

बा कुरण टके ३२

येणेप्रमाणें इनाम आहे हाली मौजे माचे हुदेदार ताजे सनदेचा उजूर करिताती म्हणौनु मालुम केले तरी गणो गबाजी तबीब यास सद्रहू इनाम आहे तरी सालगुा हुजरुनु तुम्हास जैसी सनद असेली व भोगवटा चालिला असेली तेणे·प्रमाणे साल मजकुरी इनामदार मजकुरास आदा करणे तालिक लेहोनु घेउनु इनामदार मजकुरास असेली फर्माउनु देणे मोर्तबसुद ( ष. मो. )

---

ले. १३१ श. १५९९ पौष व. १० मंगल

ता. ८।१।१६७८

राजश्री बजाजी नागनाथ हवालदार व कारकून ता हवेली पा पुणे

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य—यासिं सेवक त्रिंबक गोपाल सुभेदार व कारकून सुभा पा मा नमस्कार सुा समान सबैन अलफ मा गणो

गव्हाजी तबीब सो का पुणे यांस मौजे वेन्हवडे ता मा येथें इनाम आहे तो बा भोगवटा व तसरुफाती पेसजींपासून चालत आलें असेली तेणेंप्रमाणें साल मारा-कारणे हि दुमाल करणे तुम्ही तालीक घेऊन असल परतोन तबीब माइलेचे करणे छ २४ जिलकाद मोर्तब सुद ( प. मो. )

---

ले १३२ श्री श. १५९३ माघ वा १०
इ. स. १६७१ फेब्रु. १३

स्वस्ति श्री नृप शालीवाहान शके १५९३ विरोधकृत सवसरे माघ वद्य दसमी मगलवार ते दिनी राजश्री येमाजी रगनाथ बोकील गोसावी याचे सेवेसी, बालाजी त्रिमल व हरी विश्वनाथ सुरूरकर कुलकर्णी व जोतीसी देहाये बीतपशील

| प्रा सिरवल देहे ६ | | पा वाई देहे (४) |
|---|---|---|
| मौजे सडाले १ | मौजे बावडे | माजे सुरूर, मौजे कवठे |
| मौजे पारगाव १ | मौजे आजनुज | मौजे वाहेगाव, मौजे धोम |
| मौजे यलके १ | मौजे भादवड | उपाध्यपण |

सुा इसने सबैन अलफ कारणे गोसावी यासी लिहून दिल्हे पत्र ऐसी जे आपली वायेदेसची मिरासी बहूत दिवस गेली होती तेथील आपण वाद वेवाद सागोन निमे मिरासी साधिली यावरी आपले सिरी सेरणी ठेवणार व खर्चवेच लाग-णार आपण निदरवी म्हणऊन राजश्री पताजी पतासी आपण वर्तमान सागोन आर्धी वृती याबद्दल आवघी वृती साधिलीया येक गाव देऊनू जे कर्ज घ्यावे ते उसणे कले मुदतीस वसूल करून देऊन कलतरावरी गाऊ येक द्यावा येणे प्रमाणे आमचे नेम होता यासी निमे वृत्ती साधिली यासी आपले सिरी दिवाण सेरणी होन १२५ सवासे व बाजे खार्च देखील होन २२५ सवा दोनसे द्रव्य देणे लागले यासी मागणे लागले म्हणऊनू आम्ही येऊन राघो गोविंद कुलकर्णी मौजे वीर ता निरथडी ते राजश्री पताचे खासनिसी करीत होते त्या विद्यमाने पहिलेहि नेम जाला होता म्हणोन राघोपतास वर्तमान सांगितले व सेर-णीचा कौलू दाखविला यास होन २२५ देणे वृती निमे साधिली आवघी साधती तर येक गाऊ देतो निमे साधिली तर येक गावात निमे वृती करून देऊ म्हणऊनू सागितले तेही राजश्री पतास विचारिले ते मान्य न करीत म्हणऊन राघोपती सांगि-तले यावरी मोगलाचा गलबला मोगल येऊनू मोरेश्वरी उतरलेती रयेती वोस जाली कर्जवाम मिलना निकड जाली पैकीयाची मग आपण तुम्हास येऊन समा-चार सागितला मग तुम्ही आमचे वचन मान्य केले मग आपण तुम्हापासून होन १५० दीडसे घेतले हे मुदले मुदल दर साला होन २५ पंचवीस इा सन सलास ता स समान सबैन आलफ पावेतो मुदले मुदल उगवणी करून पैकीयास

---

१ श. १५९४–९९.

कलातर बहूत होत होते मग तुम्हास कलातरावरी मौजे येलके येथील कुलकर्ण व जोतीस पौ। निमे मिरासी करून दिल्हे आसे तुम्ही लेकुराचे लेकुरी मौजे येलक्याचे कुलकर्ण व जोतीष आर्धे खावे आर्धे आमचे आम्ही खाऊ मौजे येलका तुम्ही आमचे निमेचे भाऊ यासी आम्ही मनापासून केले यास मुरुख बेइमान होणार नाही हे आपले वडिलाचे सत्य इमान गावीचे पानमान टिला विडा व तश्रीफ जे उत्पन्न काली-पादरीवरी होईल ते आम्ही आर्धे खाऊ आर्धे तुम्ही खावे येणे प्रमाणे तुम्ही लेकुराचे लेकुरी चालावे आम्ही चालवावे दुतर्फा मुरुख होऊ नये आम्ही मनापासून केले आसे तुम्ही आम्ही बेइमान न करावा व आम्ही तुम्हासी बेइमान न करावा व तुम्ही आम्ही येलका भाऊपणे आसावे केले मुदतीस प्रमाणे तुमचे पैके मुदल होन दीडसे १५० देऊन कलातरावरी तुम्हास मौजे येलकाचे आर्धे कुलकर्ण जोतीस निमे मिरासी करून दिल्हे ते खाऊन सुखे आसणे हे पत्र सही

गोही

राजश्री मल्हारजी येशवंतराऊ देश-मुख पा। सिरवल ( सिका )

सेख सेटी बीन निल सेटी व काल सेटी बीन खल सेटी सेटीये प्रो सिरवल नि॥ तागडी १

राम जोसी माडके को। सिरवल

यादव जोसी माडके को। सिरवल मोकदम मौजे येलके पा। मा॥र

आडबोजी बीन बालोजी आवरे नागर | उमाजी बीन चादजी व म्हालोजी बीन दादजी आरडे नागर

लखमोजी गोन्हा नागर

नवलोजी पा। गोफणा रा। मजकूर नागर

नानोजी बीन सूर्याजी पाणसारा जकाती पा। मा॥र डांग

धोकाजी आढलराऊ मोकदम मौजे खेड बु॥ पा। मा॥र नागर

माहादाजी राम देशकुलकर्णी पा। सिरवल

सोमू नाईक बीन बतगाजी नाईक-वाडी चाकर ठाणे पा। मा॥र नि॥ कटार

भिलोजी पाटील मोकदम मौजे खडाले पो। मा॥र नागर

नरसूजी बीन दंत पा। व पिलाजी बीन मावजी पा। मोकदम भादवडे पा। मा॥र नागर

गगाजी बीन दादजी व चादजी बीन येसाजी रिठा मो। पारगाव पो। मजकूर नागर

आबाजी पा। व कालोजी पा। मोक-दम मौजे बावडे पो। मा॥र नागर

जाऊजी आढळराऊ व सिदोजी आभगराऊ मोकदम मौजे अहिरे पा। मा॥र नागर

ले. १३३

श. १५९३ माघ वा १०
इ. स. १६७१ फेब्रु. १३

राजेश्री येमाजी रगनाथ बोकील
स्वामी गोसावी यासी

छ श्रीसकलगुणपरिपूर्ण आखडित लक्ष्मी सदाप्रसन्नं राजमान्यं श्रह आकित मल्हारजी येशवतराऊ देशमुख व माहादाजी राम देस कुलकर्णी पा सिरवल दडवत आनुक्रमे नमस्कार विनती उपरी स्वामीस राजश्री गोमाजी त्रिमल कुलकर्णी सुरुरकर देहे ६ मौजे खडाले व मौजे बयेवडे व मौजे पारगाव व मौजे आजणोज व मौजे वेलके व मौजे भाद्वडे याणी वृतीपत्र करुनु दिले ते पत्र आणऊन आम्हास दाखविले तेथे मजकूर की स्वति श्री नृप शालिवान सके १५९३ विराधकृत सवतछेर माघ वद्य दसमी मगलवार ते दिनी राजश्री येमाजी रगनाथ बोकील गोसावी याचे सेवेसी बालाजी त्रिमल व गोमाजी त्रिमल व बाबाजी त्रिमल व शामजी विश्वनाथ जाखो त्रिमल व हरि विश्वनाथ व सुरुरकर कुलकर्णी व जोतीस देहे बिा

| | | | |
|---|---|---|---|
| पा सिरंवल देहे ६ | | पा वाई | |
| खडाले | पारगाव | मौजे सुरुर | मौजे कविठे |
| वलके | बयेवडे | मौजे वेहगाव[1] | मौजे धोम |
| अजणोन | भाद्वडे | १ | उपाधपण |

सुा इसने सबैन अलफ कारणे (यापुढील मजकूर ले. १३२ तल्याप्रमाणें आहे.)

---

ले. १३४

श्री

श. १५९५ पौष व. ५
स. १६७४ जाने. १६
नकल

माहामेरू राजमान्य राजश्री गगोपत तथा राजेश्री माहादाजीपंत बोकील स्वामी गोसावी यासि

विनंती पोष्य बाहिरो बाबाजी सुरूरकर सां नमस्कार विनंती उपरी सुा अर्बा सबैन अलफ कारणे लिहून दिल्हे पत्र ऐसी जे राो 'येमाजी रंगनाथ बोकील यासी आम्ही व आमचे भाऊ कृष्णाजी मुदगल येही ऐसे मिलोन होन १२ कर्ज घेतले होते त्यास कलतर दर माही दर होनास रुके ०।६ प्रमाणे केल होते ऐसियांसी मुदती केली होती ते मुदती टलोन पाच महिने अधिक जाले तो राा पतास देव-

आज्ञा जाली मग तुम्ही आपणास बोलाऊन आणून पैके मागितले मग आपण तुम्हास मुद्ती सवछर प्रतिपदा मागितली त्यास तुम्ही बोलिलेस की कलंतर देखील हिशेबु करणे मग कर्जपत्र लिहून दिल्हे होते ते समीप नवते मग वरीस दीड सवछर प्रतीपदा पावेतो मुद्ती जमा धरून हिशेब पाहिला तो दरमाहा टके ४॥ साडे च्यार येकूण दीढा वर्षाचे कलंतर टके ८१ येकूण होन ८ व मुद्ल होन १२ ये॥ होन २० वीस सवछर प्रतीपदा जालिया कृष्णाजी मुद्गलास घेउनु येउनु तुमचे पैके देउनु जरी न देऊ तर कलंतर दरमाहा टके ७॥ साडे सात प्रो देउनु सवछर प्रतिपदा जालिया पैकियाचे लिगाड न तोडू तर पहिले तुम्हास कर्जपत्र लेहून दिल्हे आहे तेथे लिहिले आहे की मुद्तील पैके न देऊ तर निमे कुलकर्ण व जोतिष आपले तक्षिमेचे आहे ते तुम्हास दिल्हे असे लिहून दिल्हे आहे तेणेप्रमाणे तुम्हास देशकाचा कागद करून देउनु सवछर प्रतीपदा जालिया तुमचे पैके न देऊ तर आपणास कुलकर्ण व जोतिस म्हावसीचे त्यास समंध नाहीं त्यास व आपणास मौजे मजकुरचे कुणकर्णास व जोतीशास समध आर्थाआर्थी नाही हे लिहिले सही श्री शके १५९५ प्रमादी नाम सवछरे पुस वद्य पचमी सुक्रवार लेहून दिल्हे ऐसी जे आपले इमाने सही

गोही

पढरी गोविंद कुलकर्णी मौजे वीर ता॥ निरथडी प्रा॥ पुणे

गिरमाजी म्हसका चौगुले मौजे मजकूर

---

**ले. १३५** **श्री** **श. १५९७ श्रावण वा॥ ३**

**इ. स. १६७५ जुलै २९**

राजश्री पंताजी गोपिनाथ सबनीस व चिटणीस का॥ सासवड गो यासी

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य सेवक त्रिबक वासुदेव हवालदार व कारकून ता॥ कर्‍हेपठार नमस्कार सु॥ सीत सबैन अलफ कर्याती मजकुरीची वतनी तुमची सबनिसी चिटनीसी आहे त्यास तुम्ही आपला गुमास्ता कृष्णाजी गोविंद सलदकर ठेविला होता त्यास काही अवदा मोगलाचे धामधुमेकरिता काही > पावले नाही म्हणून रुसवा करून स्वामीकडे आला आहे तरी स्वामीनी कृष्णाजी गोविंदास ताकीद करून सासवडास पाठविले पाहिजे त्याचा मुशारा साल गु॥चा व साल मजकूरचा गावगना रोसे देऊन त्याचा हक पावते करून येविसी अंतर पडणार [ नाही ] स्वामी फड प्रसगी आहेत हरयेकविशी साहितेस अंतर न करणे

आपले वर्तमान (वर प्रारंभीं चंद्र, त्रिंबक । वासुदे । व । अशा तीन ओळींचा वर्तुळ शिक्का. ) क्षणक्षणा अलिया माणसाबा सविस्तर लिहीत गेले पाहिजे सेवसी आपलीयापासून आतर पडणार नाही स्वामीने कृष्णाजी गोविंदास सत्वर पाठविले पाहिजे विशेष काय लिहिणे कृपा वर्धमान आसो दीजे छ १५ जमादिलोवल हे विनती ( वा. मो. ) हे विनंती*

---

ले. १३६ श. १५९७ श्रावण वा। १२
इ. स. १६७५ आगष्ट ८

( त्रिंबक वासुदे । व । अशा तीन ओळींचा वा. शिक्का. )

अज दिवाण ठाणे का। सासवड ता। मोकदम देहाये का। मजकूर सु।। सीत सबैन अलफ देहाये मजकुरीहून येणेप्रमाणे तूर्त रसद पाठवणे

| | | | |
|---|---|---|---|
| २५ | कोढीत | १० | बेलसर |
| २५ | खलद | १५ | राक |
| १५ | नालोली | २५ | मोढवे |
| १५ | बाबूरडी | ३५ | दिये |
| २० | कारखेल | | |
| १०० | | १०५ | |

येकून दोनीसे पाच होन सिताब पाठवणे उजूर न करणे या कामास कृस्णाजी गोविंद आ। सबनीस व चिटणीस व नाईकवाडी पाठविले आसेत तरी सिताब रसद घेऊन मोकदम कुलकर्णी हिसेबू घेऊन सिताबीने येणे येक घडी ढील न करणे यासी दूर गावी मसाला होनू पा ॥ प्रताप रासप्रमाणे आदा करणे देहाये मजकुरीच्या टीपा गुरे घरे जाबिता करून भेटीस येणे छ २५ जमादिलोवल मोर्तब सुद

बार

---

ले. १३७ श्री श. १६०५ आश्वी. वा। ७
इ. स. १६८३ आक. २

राजश्री कृष्णाजी गोविंद आजहत सबनिसी व चिटनिसी दि॥ राजश्री पताजीपत यास आंताजी गोविंद हवालदार व कारकून का। सासवड नमस्कार सु॥ आर्बा समानीन आलफ तुम्हास मुशारा पावला नाही म्हणून हसबा करून

---

* पत्राचे शेंवटीं व मधोमध हे शब्द लिहिले आहेत.

घरास गेले आह्मा येथे दिवाण काम टाकून न पुसता घरास गेलेस आम्ही माहालास येऊन तीन च्यार महिने जाले भेटीस येत नाहीत तरी पहिले पासून तुम्ही सबनीसीचे काज काम करीत आलेस आता आम्ही आलो म्हणून घरी राहिले आह्मा तरी ऐसे न करणे देखत कागद भेटीस येणे मुशारा राहिला असेल तोहि विल्हे करून देऊन तुमचे विशई राजश्री पताजीपंत याणी लिा आहे याकरिता तुमचे चालवणे आगत्य आहे तरी लौकर येणे छ २० सवाल मोर्तब सुद

---

## ६ जेजुरी- पुणें पेशवे घराणें

ले. १३८ श. १५६४ आषाढ वद्य १

इ. स. १६४२ जुलै ३

श्रीमल्लारि

( श्री, नीळक, ठराऊ, अशा तीन ओळींचा वाटोळा शिक्का. )

रस्तखाने राजेश्री नीलकंठराऊ राजे बजानेबु हुदेदारानी हाल व इस्तकबाल व मोकदमानी ( जेजु )री पाा पुणा बिदानंद सुाा सलास अर्बैन अलफ खडो मुरारी भक्त स्थानश्री——मुकाम मौजे मजकूर हुजूर मालुम केले जे आपणास इनाम जमीन जिरात सेत निवघाट व बाग देखील फुलझाडे व अबराई व चिचा व जाबुली व अनार व अजीर व निबोणी व नारंगी व नारेली व बाजे झाडझाडोरा देखील नख्तयाती टके ४० चालीस व ठाणे व द ( बाबे खर्च ) पटी व पायेपोसी व सरदेसमुखपटी व तरफपटी व तूटपटी व सरनाइगौडा व सादिलवार व वेठीबेगार व फर्मासी व सादिलवारपटी व महसूल व कडबा व तूप व सेलबैल व बाजे बाबा तालुक ठाणे व ताा देहाये बाा फर्मान व सिके खास व खुर्दखते वजिरानी कारकीर्दी दर कारकीर्दी भोगवटे व तसुरूफात सालाबाद चालिले आहे हाली मौजे मजकूर साहेबास मुकासा अर्जानी जाला आहे हुदेदार खुर्दखताचा उजूरु करिताती दरीबाब खुर्दखत होये म्हणौनु मालुम ( केले ) बराये मालुमाती खातिरेस आणोनु खंडो मुरारी भक्तश्री——मुाा मौजे मजकुरु याचा इनाम[1] जमीन जिरात सेत निवघाट कास ( रु ) टके ।• बारा व बाग देखील फुलझाडे व अबराई व चिचा व जाबुली व अनार व अजीर व निबोणी व नारंगी व नारेली व फणस व बाजे झाडझाडोरा देखील नख्तयाती टके ४० व ठाणेबाब + पटी व पायेपोसी व सरदेसमुखपटी व ब(स)राफपटी व तुटपटी व सरनाइगौडा व सादिलवार व वेठीबेगार व फर्मासी व सादिलवार पटी व महसूल व कडबा व तूप व सेलबैलु व

---

१ म शिवाय इतर अक्षरें बाळबोध आहेत.

लिहिले तरी अनताने हिसाबाची नकल करून सेवेस पाठविली आहे त्यावरून मनास येईल आम्ही रविवारी स्वार होऊनू तुमचे गावास येऊन भेटी जालियावरी जैसे आमचे विचारें व तुमचे विचारे होईल तेच करून स्वामिने लिहीले जे सिरसोफली अभये दिधले होते तेणेप्रमाणे करणे म्हणऊनू लिहिले तरी तेच वचन खरें होईल आम्ही कटकीहून स्वार होता वेचास थोडे बहुत आणिले होते तो वाटेस तस्कर उपद्रवाचा समाचार कलला गावी घरी लुगडी व अथरण नाहीत त्याकरिता स्वामिस लिहिले आहे तरी रुपये तीस ३० पाठवणे आम्हास खर्चास निभाव नाही म्हणऊन लिहिले आहे भेटी जालियावरी दरवाडियाचे वर्तमान कलेल कागदी काये म्हणऊनू लिहिणे रा माणकोपताचा मनुस्य व अमचा मनुस्य येक ठायी होती भेटी जालियावरी साकल्य वर्तमान कलेल आम्ही तुमचे पैके कटकात देऊन दोनी दिवस उसणे म्हणऊनू पाठवणे

हे ॥ तफ्तरदार सास्तांग नमस्कार लिा परिसीजे पत्रापत्री साभाल करीत जाणे हे विनती

---

ले. १९६

छ. मोहबतशारी मुरवत अलीवांरी सेखदार व कारकून पाा सिरोल अजी मिर्जा महमद मुकीम करोडी पाा पारनेर तुवा मकसूद कितायती पाठविली हकीकती मालूम जाली विठोजी व बापूजी यांचे बाबे लिहिले तरी विठोजी येथे हाजीर जाला आहे त्यासि पुसतां बोलिला की येथे गोतामधे निवाडा केला त्या निवाडे माफीक तेथे चालों देत नाहीत याबदल आपण मागुती येथें आलो आहो व खता रुयान ती तरी आपण केली नाही जरी आपण करू तै पातशाही गुन्हेगार म्हणोनु कतबा लेहोनु दिधला आहे व गोते चुकविले असोनु त्यासि हि कलाफ करीता काय माकुल आहे अमा जे काही गोते चुकविले असेली तेणेप्रमाणे चालवणे जरी न चालवा तरी तुमचे काम जाणे तुम्ही जाणा दराज काय लिहिणे

---

ले. १९७

छ मसूरल हजरती अखडित लक्षुमी प्रसन माहामेरू राजमान्ये राजश्री मल्हारजी नाईक देसमूख पाा सिरवल गोसावी यासि सेवक देसमूख व मोकदम काा सासवड जोहार विनती उपेरी चाऊ व बकाजी लोहार याचे सडीचा कागद पाठविला तेणेप्रमाणे समजाविले असेती तरी राऊले ठाणाचा कौलू व आपला कौलू चाऊस पाठऊनू घेऊनू गेले पाहिजे चौगला व सुतार दोघ बलूते याबराबरी

कौलू पाठऊनू द्यणे चाऊस तुम्हाजवेली पाठऊनू देऊनू जाणीजे + + + चाऊस तेथून नेलीयावरी बरे करणे आम्हास बोल न लगे ते करणे येविसी बहूत लिहिणे तरी लेकरे तुमची आहेती लिहिणे न लगे हे विनती माऊजी ।

देसमुख । (नांगर)

---

## ११ कारी- जेधे देशमूख

**ले. १९८**

श. १५४६ भाद्रपद शु. १२
स. १६२४ आगष्ट १५

( अष्टकोनी शिक्का )

अज रख्तखाने खुदायेवद् मलिक शर्क मलिक अंबर खुली दयाम दौलतहु बजानेब देसमुख तरफ भोर ता। रोहिडा बिदानद् सु॥ खमस इसरीन अलफ आ। छ १४ रमजान[1] रा। छ २३ सौवाल[2] मजमून की बहिरो गणपती लाइनी हुजूर फिर्यादी लिहिताती आनी खूर्दखते आनिली जे देसमुख ठाणियास येत नाहीत व दिवाणकाम चालवीत नाही तरी कमीन रात्री दिवस ठाणियात देस-कुलकर्णी व अजहती ठेविला आहे व कमीनाचा गाव कोस १॥ आहे तेथुनु येका दो रोजा येतो दिवाणकाम चालवितो म्हणौनु बयाजवार लिहिले तरी ये बाबे बहिरो गणपतीस लिहिले आहे मोर्तब

तेरीख १० रुजु सुरु

जिलकादी माहे जिलकादी नि......

बारसुदु सुरुसुदु

---

**ले. १९९**

श. १५४६ भाद्र. शु. १२
स. १६२४ आगष्ट १५

बंदे दरगाह
यगानी मलिक
अंबर चेंगिज
खानी

अज रख्तखाने खुदायेवद् मलीक शर्क मलिक अबर खुली दयाम दौलतहु बजानेब बहिरो गणपत मजमूदार ता। रोहिडा बिदानद् सु॥ खमस इसरीन अलफ

---

१ आषाढ व. १ ( २१ जून ). २ श्रावण व. ११ ( ३० जुलै ).

देसमुख तरफ भोर ता। मजकूर अर्दास छ १४ रमजान रा। छ २३ सौवाल मजमून की गावगना हिडोन सचणी करा म्हटिले ते न होती व ठाणा कुणबी गेला तरी त्यास उगेच मोकल द्यावे सेरीकर गावगना गस्ती करून लावणी करितो म्हणौनु बयाजवार लिहिले तरी तू चावडीस बैसोन कैफतीच लिहितोस परी विलायती गस्ती करून कीर्दी करवीत नाहीस येणे अमले तुझी पैरवी नाही अता तमाम विलायती गस्ती करून कीर्दी करवीजे उगवणी कीजे मोर्तब

रुजु सुरु-
निवीस

तेरीख १० माहे जिलकाद
जिलकादी

बारसुदु
सुरुसुदु

---

ले. २०० श. १५४६ अश्वीन शु.४
स. १६२४ सपटंबर ६

( अष्टकोनी शिका )

अज रख्तखाने खुदायेवद मालक सर्क मलिक अंबर खुली, दयाम दौलतहू बजानेब देसमुख तरफ भोर ना। रोहिडा बिदानद सु॥ खमस इसरीन अलफ आ। छ २९ सवाल[1] रा। छ २३ जिलकादी[2] बहिरो गणपती मजमूदार ता। मा।आले याजवली खु॥ दोनी २ होती येक खु॥ यको नारायण ठाणदार व तिमाजी नरसीह मजमूदार दुरी करून बहिरो गणपती मजमूदार पाठविला आहे दुसरे खु॥ मजमुदार तैनाता पाठविला आहे तैनाती दरमाहे होन १३ प्रमाणे आदा करणे मजमुदारास तैनात माजी तरी होन ६ असेत बाहिरो गणपती लाइनी फिर्यादी लिहितातो खु॥ आनिले जे देसमुख ठाणा येत नाहीत तरी (पेसजी ?) आपण आपले अजहती पेसजी व देसकुलकर्णी ठेविला आहे येसे असोनु लाइनी फिर्यादी करितातो कमीन विलायतीस गस्ती करा कौल द्या लावणी करा म्हणता बोलतातो मी विलायतीस न ये जास कौलाची चाड असेल तो ठाणा येईल मौजे वाटेदार कुली उठोन गेले होते त्यास सेरीकरे जाऊन लावणी केली कमकसर मदती करिता तकसीर करीत नाही ते लायनी फिर्यादी लिहितातो म्हणवुनु लिहिले तरी ये बाबे कारकुनास लिहिले आहे तैनातीचे अलाहिदा खु॥ सादर असे मोर्तब

रुजु सुरनि

तेरीख २ ... ... जिल्हे
जिल्हेज बारसुदु सुरु सुदु

---

१ भाद्रपद शु १ (५।८). २ भाद्रपद व. १० (२८।८).

ले. २०१

श. १५४६ कार्तीक व. ८
स. १६२४ आक्टो. २४

( अष्टकोनी शिक्का )

अज रख्तखाने खुदायेवद् मा। सर्क मा। अबर खुली दयाम दौलतहु बजानेब देसमुखानी तरफ भोर ता। रोहिडा बिदानद् सु॥ खमस इसरीन व अलफ अर्दास छ १२ जिलकादी[1] रा। छ १५ मोहरम[2] तेथे मजमून माहालीचे कारकून आपल्या पोटस्ता बदल कमीनाची लाइणी फिर्यादी लिहिताती म्हणौनु बयाजवार लिहिले तरी ये बाबे पेसजी जाब सादर असे मोर्तब

रुजु सुरु
निवीस

तेरीख २१ माहे मोहरम
मोहरम बारसुदु सुरु सुदु

---

ले. २०२

श. १५४६ पौष शु. ६
स. १६२४ डिसें. ५

( अष्टकोनी शिक्का )

अज रख्तखाने खुदायेवद् मा। सर्क मा। अबर खुली दयाम दौलतहु ता कान्होजी देसमुख तरफ भोर तपे रोहिडा बिदानद् सु॥ खमस इसैन व अलफ अर्दास छ माहे मोहरम इरसाल केली रा। छ ८ सफर[3] तेथे मजमून की ता। मजकुरी राजप्रज प्रमाणे उगवणी होते नाकीर्दी बाद नाही सेरीकर कीर्दी कीर्दी करिता तकसीराती केली नाही सादीलवार जाबिता इा। छ १४ साबानु ता। छ २२ मोहरम इरसाल केली असे पेस्तर जे सादिलवार होईल तो बदगीस रवाना करीत जाऊनु म्हणौउनु लिहिले तरी कीर्दी मामुरीचे बाबे तकसीर न कीजे रकम प्रमाणे उगवणी कीजे ज्याजती नफराई कीजे व बाजे सादिलवार काये जाला तो जाबिता लेहोनु पाठवीजे पेस्तर सादिलवार होऊ ने दीजे मोर्तब

रुजु सुरु-
निवीस

तेरीख ४ माहे रबिलौल
रबिलौवल

बार सुदु सुरु सुदु

---

१ भाद्रपद शु. १३ ( १७-८ ). २ कार्तीक व. २ ( १८-१० ).
३ मार्गशीर्ष शु. १० ( १०-११ ).

ले. २०३

श. १५४९ पौष वद्य ८
स. १६२८ जानेवारी २०

( फा. शि. २ )

( सहा ओळी फा. म. )

( फा. अ. शि. ) ( फा. बदामी. शि. )

अज दिवाण रा। खास बजानेबू कारकुनानी हाल व इस्तकबाल अमानत व अजहनी मुकासाई तेपे रोहिडा चिदानद् सुा सन समान इस(री)ने अलफ हेजिबू कान्होजी देसमूख तर्फ भोर तपे मजकूर हुजूर बदगी हजरती मालुम केले जे तर्फ मारच्या देसमुखास इसावती मौजे आबोडे कुलबाब कुलकानु व गावगना हक लाजिमा व साहाणे सारी व पालक मौजे कारी बिा महसूल टके २७६।। हे दिवाणात उगवणी होते वर्तोला हरानिा बाजे देह हे मौजे मजकुरासी बदल इनाम देसमूख पालक आहे व देसकुलकर्णी तर्फ मा। यासी इनामती व हकलाजिमा व सेटीया हकलाजीमा व इनामती व गावगना मोकद्म व बलुते व चौगले व पाडेवार या नफरासी इनामती हकलाजिमा सालाबाद् कारकीर्दी दरकारकीर्दी भोगवटा व तसरुफाती चालत आहे व सुा मा। मा। अवर सन तिसा अलफ आहे त्यासी सन सबा १ कारणे हुजरून सुा रोखा माहलास सादीर जाला जे तरफ मा। देसमूख व देस-कुलकर्णी व सेटे व माहाजन व गावगना मोकद्म व बलुते यासी इनाम व हकला-जिमा खातातो यासी हुजती गैरहुजती आहे तो जाबिता करून हुजूर पाठवणे हुजरून जाब सादर होईल तेणेप्रमाणे अमल करणे तोवरी अेकजरा आद्दा होऊ नेदणे म्हणोउनु रजा त्यावरी माहाली कारकुनी इस्कील केली आहे म्हणताती हुजुरून ताजा फर्मान घेउनु येणे तेणेप्रमाणे दुमाले करून तरी नजर येनायती फर्माउनु माहलास फर्मान सादर कराव्या रजा होये मालुम जाले बराय मालुमाती खातिरेसी आणुनु दिधले असे देसमुखास इसाबती मौजे अंबेडे कुलबाब कुलकानु व गावगना हकलाजिमा व साहाणे सारी व पालक मौजे कारी बा। महसूल टके २७६।। दिवाणात उगवणी होते व बाजे वर्तोला हरनिसबती बाजे देह हे मौजे मजकूर बदल ईनाम देसमूख पालक व देसकुलकर्णी यास इनामती व हकलाजिमा व सेटियायासी इनामती व हकलाजिमा व गावगना मोकद्मासी व चौगले यासी बलुतेयासी व पाडेवार या नफरासी इनामती व हकलाजिमा बा। हुजती मा। मा। मा। अबर व बा। भोगवटे व तसरुफाती गहद्म सालाबाद् ता। सन सबा इसैन चालिले असेल तेणेप्रमाणे चालवीजे दरहर साल फर्मानाचा उजूर न कीजे तालिक घेउनु असेल फर्मान फिराउनु दीजे मोर्तब ( फा. मो.)

+रुजु +रुजु सुरु निवीस

+तेरीख १८ माहे +जमादिलावल पा। छ १५ माहे जमादिलाखर

जमादिलावल

---

+ चार अक्षरें वेगळालीं. १ श. १५४८

ले. २०४ श. १५५२ अ. आषाढ शु. १५
स. १६३० जून १४

काबाजी व गंगाजी
छ १२ जिल्काद् सुा
( फा. वा. शि. दोन शब्द व ओळी ४ )

॥छ बजानेब देसाइयानी तपे रोहिडे अं की अज सुहुर सन सलासीन वा अलफ तपे मजकूर बाबत कोबाजी खडाड दरवख इस्तकामती मोकदम व इमसाल गंगाजी माकुलबाब मरहमत करून दिले असे बायेद की तपे मजकूर दुबाला कीजे याचे कबज वा तसरुफात करून दीजे छ १२ माहे जिलकाद् सन तिसा सलासीन वा अलफ १०३९* परवानगी हुजूर अशरफ अकदस हुमायूनआला

ले. २०५ श. १५५५ मार्गशीर्ष शुा ११
ता. ११२।१६३३ स.

( फा. मजकूर व तीन फा. शिक्के )

अज रख्तखाने खास बजानेबु कारकुनानि हाल व इस्तकबाल व देसमुखानि तपे रोहिडा बिदानद् सुा सन अर्बा सलासीन व अलफ कान्होजी जेधा देसमुख तर्फ भोर ता। मजकूर यासि इनाम अजरा मऱ्हामती मौजे कारी तपे रोहिडा कुलबाब व कलकानूसी दिधले असे बाब महसुलेसी दुमाला कीजे दर हर साल फर्मामाचा उजूर न कीजे तालीक घेऊनू असली फिराऊन दीजे मोर्तब सुदु ( वा. शि. ) रुजु सुदु

तेरीख ९ माहे जमादिलाखर रुजु मुश्रीफ पा। हुजुरु
बार सुदु बार सुदु तारीक सुदु

ले. २०६ श. १५५७ माघ शुद्ध ८
ता. ४।२।१६३६

( फा. शि. व फा. म. सात ओळी )

॥छ अज रख्तखाने खुदायेवंद् खान अलीशान खा अजम रणदुला फरादखान खुली दयाम दौलत हू बजानेब कारकुनानि हाल इस्तकबाल व देसमुखानी रवारसुदु पा। वाई विदानद् सुा सीत सलासीन अलफ कान्होजी जेधा मोकदम मौजे वेलंग ता। मजकूर हुजूर मालूम केले जे आपणासी

* हिजरी सन.

इनाम सन आर्बा[1] सलासीन अलफमधे मा। वेदजी आनद हवालदार (धोमेसी) आले होते तेथें आपण येउनु भेटी घेतली आपणासी तश्रीफ देऊ लागले त्यावरी आपणे अर्ज केला जे आपण साहेबाच्या फर्जद आहे आपणासी इनाम जमीन येक चावर १ करून दिधलिया साहेबासी दूा[दुवा] आशीर्वाद देउनु गावकीर्दी मामुरी करून आपण साहेबाचा नवाजीस आहे म्हणौउनु त्यावरून कारकुनी आपणासी इनाम जमीन चावर येक देसील नख्त व माहसूल व खा। गला व तूप येसा लेहोन देऊनु हुजूर साहेबाचे बंदगीस अर्ज लिहिला त्याचा जबाब माहालासी सादर जाला आहे तरी साहेबी आपणासी भोगवटियाचे खुर्दखत अजरा मन्हामती करून देविलिया तेणेप्रमाणे चालेली आपण तरी साहेबाची नफराई करावयास तकसीर करीत नाहीं म्हणौउनु मालूम जाले तरी यासी इनाम चावर येक १ माहाली कारकुनी सन आर्बामध्यें देउनु हुजूर लिहिले होते त्याप्रमाणे ता। साल गु॥ चालिले जैसे चालिले असेली तेणेंप्रमाणे चालवणे सदरहू इनाम दर सवाद मौजे वेलग पा। मजकूर देसील नख्त व मा। व खा। गला व तूप दिधले असे दुमाला कीजे हद्महदूद घालूनू मज नेमून देणे दर हर साला खु॥ उजूर न कीजे तालीक घेऊनू असेली फिराउनू दीजे परवानगी कारकून अवलाद व अफवाद चालवीजे मोर्तब

(शि.)

रुजु दफतर खास रुजु शुरुनिवीस

तेरीख ६ रमजान माहे रमजान

---

ले. २०७

श. १५५७ फा॥ शु. ७
ता. ३।३।१६३६ स.

मकेचे

॥७॥ अज रख्तखाने मसुरुल अनाम राजश्री गगाजी नाइक साहेब खुली दयाम दौलतहू ता। कारकुनानी हाल व इस्तकबाल तपे रोहिरे सु॥ सीत सलासीन

फारशी शिक्का

अलफ हेजीब कान्होजी नाईक देसमुख ता। मजकूर हुजूर येऊन माळम केले जे तपे मा। साहेबास मुकासा आर्जानी जाला तपे मजकुरीचे देसमुखास इनाम थोडा आहे दिवाण नफराई हलालखोरी करितां तकसीर करीत नाही तरी साहेबी नजर अनायत करून मौजे नाटंबीगांव ता। भोर देहे १ इनाम मन्हामत केला पाहिजे म्हणौन तरी देशमूख तपे मजकुरास अजरा मन्हामत करून दिल्हे असे अवलियाद व अफवाद कुलबाब कुलकानूसी

---

[1] श. १५५५.

मौजे नाटंबी दिल्हे असे दुबाले कीजे मुसलमान व हिंदु यास सुवराचे आण व गाइचे असे हरसाला खुर्दखताचे उजूर न कीजे तालीक लेहून घेऊन असल परतोन दीजे ( ष. शि. )

तेरीख ५ माहे सौवाल

सौवाल

---

ले. २०८ श. १५५७

स. १६३५

कारकुनान व देशमुखान परगणे वाई शुहुर सन सीत सलासीन अलफ कानूजी जेधा मुकाम मौजे वेलंक सिम्त मोरा परगणे मजकूर मालूम नमूद के महूरुल अनाम बेद + + हवालदार परगणा मजकूर .ब ई सरीकार इनाम जमीन यके चावर दर सना अर्बा[1] अजन्हाये मरहमत नमूदा दादा अस्त आं इनाम मजकूर खुर्दा कर्द व जमेदारी मौजे मजकूर नमूदा आं के साहेब सलामत खुद बख्ते या सिका मरहमत फर्मायन पेश्तर मामूरी मौजे मजकूर खाहं नमूद मालूम बाशद बराये मामिलात मुकदम खुर्दखत मरहमत फर्मूदा ईम बरहुकम ब ए आनत माल सालगुदस्ता जारी दारन्द दरहरसाल उजर खुर्दखत न कुनन्द

दाखिल नग्द व महसूल व खरीद व गला व रोगन

---

ले. २०९ श. १५५९ पौष शु. १५

ता. २१।१२।१६३७

बन्द ए दर्गा है। आदिलशाही। गडागाजी। ( अशा फारसी ३ ओळी वाटोळ्या शिक्क्यांत आहेत. )

छ अज रख्तखाने मसुरुल आनाम राजश्री गगाजी नाईक साहेब खुली दयाम दौलतहु ताहा कारकुनानी व देसमुखानी व मोकदमानी देहाये ता। भोर ता। रोहिरे बिदानद की हर्चा खुा समान सलासीन अलफ दरवख्त बदल इनाम इजाफती अज राहा मन्हामत बाो कान्होजी जेधे देसाई ता। मजकूर यास मौजे चिखलगाऊ तपे मजकूर इनाम दिल्हे असे बा। फर्मान हूमायून दिल्हे असे दे। माहासूल व नख्तयाती व बाजेबाब व कुलकानु कुलब.ब दे। देह मजकूर दुबाले केले असे दुबाले कीजे

१४ साबान

---

[1] श. १५५५.

ले. २१०

श. १५६० भाद्रपद व. २

स. १६३८ सपटं. १५

( फारशी मजकूर ३ ओळी व दोन शिक्के )

अज दिवाण किले रोहिडा ताा मोकदमानी मौजे चिखलगाऊ बिदानद की सुरुसन तिसा सलासीन अलफ मौजे मजकूर कानोजी जेधा देसमुख ताा मजकूर साा असाफनी दुमाला केले असे दुवाला कीजे मो ( मुरतब सुद हीं फारशी अक्षरें. )

रुजु खास दफ्तर

तेरीख १६ माहे जमादिलोवल

जमादिलोवल

---

ले. २११

श. १५६० भाद्रपद व. ५

स. १६३८ सपटं. १०

( फारशी मजकूर व दोन शिक्के )

अज दिवाण किले रोहिडा ताा मोकदमानी व रैयानी तपे भोर बिदानद की सुरुसन तिसा सलासेन अलफ पटी पछोडी व हक लवाजिम कान्होजी जेधा देसमुख तपे मजकूर यासी कारकीर्दी दर कारकीर्दी सालाबाद प्रमाणे दुवाला केला असे दुवाला कीजे मोर्तबु

( फारशी अक्षरें ५।६ )

रुजु खास दफ्तर

तेरीख १९ माहे जमादिलोवल

जमादिलावल

---

ले. २१२

श. १५६० माघ व. ४

स. १६३९ फेब्रु० ११

( फारसी मजकूर )

अज दिवाण किले रोहिडा ताा मोकदमानी व रैयानी मौजे चिखलगौऊ ताा भोर किला मजकूर बिदानद की हर्च सुरुसन तिसा सलासीन अलफ बाा फर्मान हुमायून ब तेरीख ६ माहे जमादिवल सानी हुकूम सादीर असे जे दरीविला बदर-गाहा वलाजा रोशन गर्दीद कान्होजी जधा देसाई ताा भोर किले मजकूर मशवत करव्या ( ण्या ? ) ताकसीर केला नाहीं मुत मार्जा••• •••दफत सफत बिनाबरा अजराये मराहीम पादशाना व फर्ता अबार्तीकी खुशराबान मौजे मजकूर दरबख्त

इनाम कान्होजी देसाई मजकूर मन्हामत फर्मूदा देहानींदा सुदा अस्त मेचायद्के देहे मजकूर मा कुल बाब व कुल उजुहती दुबाला करणे बाद् ऊ अवलाद् ऊ अफलाद् ऊ रवा दारंद् तालीक घेऊन असल फर्मान परतून देणे बा। हुमानयुन दुबाला करणे म्हणौन तरी मौजे मजकूर माकुलबाब कुल कानुहती बा। फर्मान दुबाला केले असे दुबाला कीजे दर हर साल सुर्दखताचा उजूर न कीजे तालीक लिहून घेऊन असल परतून देणे

( फारसी अक्षरें ५।६ )

रुा खासनीस
तेरीख १७ माहे सवाल

---

ले. २१३

श. १५६१ भाद्रपद शु. ७
ता. २५।८।१६३९ इ. स.

( फारसी वाटोळा शिक्का )

( ४ गांवांचीं नांवें नंतर २१ ओळी फारसी मजकूर शेवटीं मोर्तब षट्कोनी )

( फारसी शिक्का वाटोळा )

अज दिवाण किले रोहिडा तां मोकदमानी वा रयानी व वलुतेयानी देहाये ४ चारी बितपसील टके

मौजे आंबोडे ८० मौजे कारी ६० माजे चिखलगाऊ १०० मौजे नाटंबी ६० ता। भोर किले मजकूर अज शुहुर सन अर्बैन अलफ बा। फर्मान हुमायून छ २० माहे जिल्हेज पो छ १६ माहे रबिलोवेल दरीविला कान्होजी देसमुख ता। किले मजकूर बद्रगाहा जां पन्हा इलतिमास नमूदके मौजे आंबोडे मां बाजार व मौजे कारी अज कदीम बमोजिब कारकीर्दी मा। अंबर व हाली मन्हामत मौजे चिखलगाऊ वा मौजे नाटबी ता। मजकूर जुमले चारी देह बनाम खुद् मा कुलबाब कुल ( कानु ) व कुल उजूहाती व साई व कानुनाती व लमाजिमात व जमीयेबाब-हा व पटीहा बमोजीब फर्मान निजामशा व फर्मान कजाजरीयान शाहे जम जा रवानअस्त व खारीजं ई हकलवाजिमा व पटीपछोडी व साणे सारीनीज जारी अस्त अंमा दरी वख्त अज ताहा ना उजूर ताकीद् फर्मान पेश अऊर्दा मजाहिम मैशवंद् व जरबाजे बाबहाके सालाबाद् बर देहाये नबूद् अंदास्ता मजाहामत मेरसानंद् येहतमाम शवद् हरगाहा के देहात मजकूर वगैरेहू बमोजीब फर्मान निजामशा व फर्मान हुमायून आला रवा बाशद् बाज अज ताहाना उजूर ताकीद् फर्मान पेश अउर्दा मजाहिम शुदंन व जर बाजे बाब हा ये गाहे नमूदह बालतअं तसवीश रसानंद् न चि माने दारद् अनून मिबायद् के व मुजरद् उसूर फर्मान वजा जरीयांन शाही हर श्याहार देह मजकूर मां बाजार माकुल बाब कुल उजु हाती

व साईर कानुनात व लवाजिमात व जमीये पटीहा व बाबहा बमोजीब फर्मान निजामशा व फर्मान हुमायून अकदस माहक लवाजिमा व पटीपछोडी व साणे सारी वगैरे हू व इनाम देसमूख मजकूर मोकरर दानिस्ता दुवाला नुमायंद व जर बाजे बाबहा व जकातेपटी व जकाते हुडा व चिखल वेटेया व बेलेकटी व पोयपोसी मेज-वानी व नऊ शेल बेल व खर्चपटी व जंगपटी व पेशकसी व तकदमा व वजयेक माहे हुदेदार व अबराई व पाडेवार व पलमा सुतार व सर व गुन्हे व मोहतर्फा व वेठबेगार व फर्मायेसी वगैरे माहासूल व पत्र केणी व बाजे बाबा आ चे के अस्त व पेस्तर खोहद सूद तालूक देहाये मजकूर दुवाले ऊं फर्मूदे शुगा अस्ता मन बाद मजाहिम न शवंद व बाहे ष बादी खलेल न कुनन्द व बाद ऊ व अवलाद ऊ व अफवाद ऊ जारी साजद दरीमाने बारकी हरकत कुनंद गुन्हेगार दरगाः पादशाही बाशद हर साले नमूदे फर्मान मुजदद न कुनंद तालीक निविस्ता गिरिफता असल फर्मान बाज देहंद ता दानद बा। फर्मान अशरफ रवंद अकनून ताहारीर फी अशरीन श्याहार जिल्हेज सन हजार नौ म्हणोन तरी बा। सदरहू बाब हाय देखील सारी देहे वा बाजार अंबोडे वगैरे माहासूल चारी देह सदरहू दुवाला केले असे दुवाला कजि तालीक लिहून घेऊन असल बदस्ते देसमुख परतोन दीजे मोर्तबु
तेरीख ५ माहे जमादिलोवल (षट्कोनी शिक्का)

---

ले.२१४

श. १५६४ ज्येष्ठ शुा ११
इ. स. १६४२ मे १०

(फारसी मजकूर दोन शिक्के)

अज दिवाण किले रोहिडा ता। मोकदमानी व रैयानी मौजे चिखलगाव ता। भोर किले मजकूर सुा सन सलास अर्बैन अलफ बिदानदके बा। फर्मान हुमायून छ ११ माहे रमजान पौ महाल मजकूर छ ९ माहे रबिलोवल सादीर सुदा के दरीविल कान्होजी देसमूख ता। भोर किले मजकूर बदरगाह माला इलतिमास नमूद के खुदरा इनामत देसमुखगिरी मजकूर मौजे अंबोडे माबाजार व मौजे कारी व मौजे चिखलगाव मौजे नाटंबी ता। मजकूर बा कुलबाब व कुल उजुह्मत बमोजिब फर्मान साबिक मुतैन व रवानस्त व अज कदीम लअयाम कारकीर्द दर कारकीर्दान भोगवटा ज्यारी दारद दरीवरून ताजे बीबी दोस्तर काजी हुसेन हकीमशरा कलियान भिवडी गैरवाका मालूम नमूदा मौजे चिखलगांव मजकूर बदल इनाम खुद नविसा-नीदा गिरिफता अस्त व खुद लेलू न नेबारू दर मोहिमात देसमुखी मजकूर मशगुल बूद नफरी दरगाह जेहां पनाह नमूदः व मेनुमायेद येह तमाम शवद बिना अल-येदा खातीर मुबारक आला आवरदः मौजे चिखलगाव मजकूर अज ताजे बिबी

दुर नमूदा बादे देसमुख मजबूर इनाम अबादी बदस्तुर साबिक मोकरर व मराहमत फर्मूदा देहानीदा शुदा अस्त मेबायेद्के मौजे मजकूर माकुलबाव व कुल उजूहात व साइर कानुनात व बरा तरीकाव व ठाणा नकदी व जिनसी व कुर्‍री व जुजवी उच दर दफ्तातीर आला सबत अस्त व पेस्तर अहद्दास शवद् इरकी व रस्की कलमी व कद्मी तमामी दुवाला वो दारीस्ता बावेच व जमीनल उजूह मुजाहीम व मारी जब हाल देहाये मजकुरान शवींद् व हक लवाजमा पटी पछोडी व साई-नसारा व बाजे लवाजमात हनचे सालाबाद् जलबी बूदा अस्त हमीन वे रवा दारंद् व बाद् वो अवलादे व अफलादे वो इलामाती जासुदु अताकीबु ज्यारी साजंद् अगरकसे हिंदु या मुसलमान बईचनाम खलेल कुनद् बळानत व ऊ दर नफरीन हजरत रसालत पनाही गिरिफ्तार गर्दद् तालिक निस्ता गिरिफ्ता असल फर्मान दारद् गुंजारद् म्हणऊन तरी मौजे मजकूर बा॥ फर्मान कान्होजी देसमुख ता॥ मजकूर याचे दुवाला केले असे दुवाला कीजे तालीक लेहून घेऊन असल मिसेली कान्होजी देसमुखास परतोन दीजे ( फा. मो. )

तेरीख १० माहे रविलोवल

---

ले. २१५ श. १५६५ ज्येष्ठ व. १

( फारसी शिक्का वाटोळा ) स. १६४३ मे २४

( फारशी मजकूर. त्यांत शेवटीं १०५३ हा सनाचा आंकडा )

( फारसी शिक्का वाटोळा )

अज दिवाण किले रोहिडा ता॥ मोकद्मानी मौजे चिखलगाऊ ता॥ भोर किले मजकूर सु॥ सलास अर्बैन अलफ ठाणा किले मजकुरी फर्मान हु॥ सादीर जाहाला असे मौजे मजकूर कदीम मोकासा इनाम कानोजी नाईक देसाई ता॥ मजकूर मोकरर तरी बा॥ फर्मान हु॥ मौजे मजकूर देसाई याचे दुवाला केले मो॥ (फा. मो.)

तेरीख १५ माहे रविलोवल

---

ले. २१६ श. १५८० श्रावणा नंतर

कौलनामा ब इस्म बाबाजी सर्जाराव देसमूख तर्फ रोहिरखोरे व तर्फे भोर आंके हकीकत इलतजा आउर्दन् ब इरादा बंदगी दर्गाह खलायक पनाह मनाजी शंकर जाहिर नमूद् बेनाबर कलमे मी गर्दद् के बखातिर जमीयत नमूदा कबाइल सुदहा दर मौजे कारी आमदा सकूनत वर्जन्द् व दर आबादानी तर्फ कोशीदा आंचे इनाम हक लवाजिम बदस्तुर ए साबिक बाशद् मुफस्सला बर्निगारन्द् के मुताबिक आं मारूज बजनाबे मुकद्दस गर्दन्द् सनद् इनायत साहद् शुद् दरी बाब हेच वसवसा बखातिर नियावुर्दा दर मौजे मजकूर यिया यन्द् तारीर तारीख गुऱ्हा शाबान सन खमसि

---

ले. २१७

श. १५८२ भाद्रपद शु० १०
ता. ७।९।१६६०

श्री सकें १५८२ शार्वरीनाम संवछरें भाद्रपद सुध दसमी वार मंग(ल)वार तदिसी बि हुजूर राजश्री कान्होजी नाईक देशमूख ता भोर किले रोहिडा व हजीर मजाले(सी) कारकून व हशम व देसक व बारा बैते तपे मजकूर या विदमान



राजेश्री कान्होजी नाईक देशमुख ता भोर किले मजकूर

( जि ना ( वा. शि. )
देमुख )

घारोजी नाईकजी घोलप

गोरखोजी बिन राघोजी घोजी कोढलकर

रामाजी व आनाजी जेधा

येसजी इद्रोजी जेधा रामाजी सोनजी घटलावा

येकोजी कृस्ण पेशवे हसनिवीस बिद्स्तुरखुद

येमाजी गोपिनाथ व आबाजी बलाल हेजीब

आलिभाई बिन सैद बाबाजी

देउजी लखमोजी नाहावी

रेखोजी नाईकजी जेधा

कण्णाजी लुखजी फर्जद

तान्हाजी पिलाजी तुपा

---

ले. २१८

कोडजी घारोजी वाडकर

सटउजी व सोनजी पेटकर

मुला

तुकोजी घोलप

देसक व बारा बैते तपे मजकूर

सोनजी बिन हिरोजी येमाजी बिन बाजी व बान(ल)जी बिन रामजी मोकदम का। भोर

दादाजी कृस्ण व रखमाजी हिरदेऊ कुलकर्णी का। भोर

बापूजी व म्हाउजी खोपडे मोकदम मौजे पोमलवड

रामजी बिन बागोजी पा। मोकदम मौजे चिखलगों

कान्होजी सदाजी चव्हाण व सोनजी भोरजी मोकदम मौजे वेल्हवड

राघोजी आपाजी गिरा मोकदम मौजे सिरवली

---

१ हीं दोन्ही अक्षरें दुबार पडलीं आहेत.

येसजी बिन जिवाजी व नाइकजी बिन परसोजी खोपडा मोकदम मौजे आंबेघर

राघोजी सोनजी व कोडजी अेल्होजी कोढलकर मोकदम मौजे चिखलवड

नामाजी व सुन्याजी राउत मोकदम मौजे खाकसाले

जानोजी आवोला मोकदम मौजे कनसर

वाघोजी व बालोजी राविडा मोक-दम मौजे राविडी

तान्हाजी व तुळाजी व भिकाजी चिकणे मोकदम मौजे कोरलें

क्रस्णाजी वाघोजी तुपा मोकदम मौजे म्हाकोसी

खंडसेटी बिन मल्हार व आबसेटी बिन गदसेटी सेटीया पा मजकूर

साव ठाकूर व सीव ठाकूर व गोद ठाकूर ता। मजकूर

भील सुतार बिन (म)हाद सुतार मौजे आबोडे

गण सालवी व राम सालवी कुभार मौजे आबोडे

ताननाक व रगणी माहार ता। मजकूर

कमाजी व रामजी व कान्होजी व बालोजी मोकदम मौजे नाटिंबी

बालोजी व नाइकजी कुसळा मोक-दम मौजे करजया

चागोजी सटवाजी घोलप मोकद(म) मौजे सागिवी

मलजी व नाइकजी भडाला मोक-दम मौजे आबोडे

घर्मोजी व आपाजी सडा मोकदम मौजे वाटेघर

रामाजी व येसजी मालोसरे खोतु बाबजी...मौजे मोकदम मौजे तिटेघर

सबाजी व विठोजी सालवकर मोक-दम मौजे वडतबी

रुद्रभट बिन माहादे भट व विसभट बिन विनायेकभट भिकंभट बिन निल-कंठभट जोतिसी ता। मजकूर

जाख माहाला बिन दाद माहाला व लखममाहाला बिन देऊ माहाल मेहतरीया हजाम तपे मजकूर

घारटा वा चा द यप्रावा परीट मेहतरिया ता। मजकूर

अंत द(र)णा व नरस दरणा गुरव मौजे अबोडे व कारी

मुल्हारी बिन बायाजी सोनार पोतदार ता। मजकूर

सु॥ इहिदे सितेन आलफ कारणे केला महजर येसा जे बाजी सर्जाराऊ फर्जंद कान्होजी नाईक देसमूख ता। भोर किले रोहिडा यास देशमुखीचा सिका नागर व देसमुखी राजश्री नाइकी आपणा हुजूर दिल्ही भावा भावास तकसिमा वाटू(न) महजर केलों ते वस्ती येसा तह केला कीं येसाई

नाइकिणीस लेक नाही तीस लेक बाजी सर्जाराऊ दिल्हा आहे पुढे जरी तीस लेक जाला तरी सर्जारायाने आपले तकसिमेमधी जैसी सुभानजी नाईकजी रायाजीस तकसीम बेसली आहे त्याप्रमाणे देउनी समजावीस करावी येसा नेम होता यावरी येसाई नाइकिणीस सभाजी फर्जंद कान्होजी नाईक पुत्र जाला त्यास देसमुखीची तकसीम वडलाचे आज्ञेप्रमाणे सर्जाराऊ फर्जंद कान्होजी नाईक इही दिल्ही की तो आपला भाऊ यास आपले निमेची तकसीम दिल्ही बितपसील

नख्त हक लाजिमा टके——टके

पटी पासोडी

५१॥। वेल्हवडी
१९८८ कोरले
१७८४॥ का॥ भोर
८८८०॥

पलंग जा॥ सुतार टके

२८ वेल्हवडी
२८ कोरले
१॥१०॥ म्हाकोसी
५॥१०॥

पाग जा॥ माहार टके
२।४॥

१८६ वेल्हवडी
०॥० कोरले
०॥१० । भोर
२।४॥

पाडेवार मुकास बाब——टके
११। चिखलगो
४।६ नाटिबी
६ आबोडे
१५॥।

बाबे जमा——टके
१॥१०॥

०।३ कोरले
१। वेल्हवडी
०७॥ का॥ भोर
१॥१०॥

दुसरा बकरा टके
५।०

२८ वेल्हवडी
२८ कोरले
१।० जानवले
५।

सोत्र जा॥ गुरव चिखलगो टके
०।५

इनाम गाव पैकी ता॥ रकम टके ३४८
८॥। आबोडे
१२॥ चिखलगो
७॥ नाटिबी
४॥ कारी
०॥।० वेल्हवडी
३४८

तेरीज नख्त
८८८०॥० पटीपासोडी

| | |
|---|---|
| रावणुक माहार इनाम गाव पैकी तक० | १॥१०॥ बाबे जमा |
| सीम राबिजे सा | ५। दसरा बकरा |
| ६ | ५॥१०॥ पलंग सुतार |
| ३ᐟ कारी मधील | २।४॥ पाग |
| ३ᐟ आबोडे मधील | ०१५। सोत्र गुर |
| ६ | १५॥। पाडेवार |
| | ११९ᐟ७। |

येन जिनस गला कैली

| | |
|---|---|
| १ᐟ२॥ कोरले | ᐟ२॥।०॥। चिखलगो |
| १ᐟ२॥ वेल्हवडी | ᐟ२॥।०॥। आबोडे |
| ᐟ।१॥– सोत्र गुरव चिखलगो | ᐟ२॥।०॥। नाटिंबी |
| | ०।४॥। पाग जाा माहार |
| २।०।१॥– | ᐟ२ कोरले |
| ०॥।०१॥ म्हाकोसी | ᐟ४॥ वेल्हवडे |
| २॥१ | ᐟ२ म्हाकोसी |
| | ᐟ१। नाटिंबी |
| | ०।४॥। |
| | ॥।३ᐟ२॥। |
| | २॥१ᐟ०ᐟ– |
| | ३।४ᐟ२।– |

सद्रहू प्रमाणे सभाजी फर्जंद कान्होजी नाईक याणी आपली तकसीम खाउनी सर्जाराऊ याचे पाटीसी असावे रजा तलब वर्तावे येका जिवे वडिलासी चालावे याप्रमाणे सर्जारायाने सबाजीस चालवावे यास आनसारीखे करील तो वडिलापासुनी जाला नाही वडिलाची आज्ञा मोडूनी महजरप्रमाणे न चले तो वडिलाचा व गोताचा आन्याई बि दस्तुर येकोजी रुस्ते पेशवे खासनिवीस

फारसी मोर्तब ( ष. को. )

हरसाला खुर्दखताचे उजूर न कीजे तालीक लेहून घेऊन असल परतोन दीजे ( सहाकोनी शिक्का ) मोर्तब सूद

तेरीख १४ माहे साबान

ले. २१९

सके १५८४ आषाढ व॥ ६
ता. २७-६-१६६२ इ.

मसुर अनाम राजश्री सर्जाराऊ जेधे देशमुख ता॥ भोर व ता॥ रोहिडखोरे

( श्रीशिवन र पति हर्ष निदान महा देव मतिम त प्रधान वाटोळा शिक्का. ) प्रति राजश्री सिवाजी राजे सु॥ सलास सीतैन अलफ बसैर पाठविली लिहले जे लोकी फुटोन हुजूर येत आहेत तरी साहेबी हुजूर चाकर ठेविले न पाहिजेत म्हणउनु लिहले तरी तुमचे लोक हुजूर येतील त्यास साहेब हुजूर ठेवणार नाहीत तुमचे तुम्हापासी फिराउनु पाठवितील मोर्तब सुद

तेरीख २० माहे जिलकाद (सहाकोनी शिक्का)
जिलकाद पो॥ छ २४ मि सुरु सुद

---

ले. २२०

श. १५९० आश्विन व. १
ता. १०।१०।१६६८ इ.

मसहुरल हजरत राजश्री कृष्णाजी भास्कर सुबेदार व कारकून सुबा ता॥ मावले प्रति राजश्री शिवाजी राजे दडवत सुहूर सन तिसा सितैन अलफ सर्जाराउ ( श्रीशिवनरपती हर्ष निदान महादेव मतिमतप्रधान ) ( वाटोळा शिक्का ) जेधे दसमूख ता॥ भोर ता॥ रोहिडखोर हुजूर येऊनु आर्ज केला जे आपला हक व इनामगाऊं कुल अ-मानत केले आहे आपणास कांहीं पावत नाहीं या-कारितां आपला अवकात चालत नाही बहुत जबुन वख्त तंगतुरासी जाहाली आहे तरी साहेब मेहरवान होऊनु आपला अवकात चाले आणि साहेबाचे चाकरीस हाजीर राहों येसे केले पाहिजे म्हणून त्यावरून याचे इनाम व हक कुल मनास आणून त्यापैकीं साल मजकुरापासुन दुबाले केले असे बिता॥

| इनाम देह पैकीं मौजे कारी | | हाक गावगना टके |
|---|---|---|
| अ ज रकम टके | ६९९॥६ | पटी पछोडी |
| ६४३॥५॥ येन | ५५८॥ | गला खडी २२।२ |
| १६। गला १॥२॥ | | दर २५ येकून |
| दर १० येकून | १२॥॥ | लोणी ८१॥८ |
| ८९ ताग ८८५ येकून | | दर सेर ८९ येकून |
| ॥ लोणी ८८४ येकून | ५॥६ | ताग ८२४५ दर २॥९ |
| । काबले १ येकून | ४। | काबली १७ ये॥ |
| । कोबडे १ येकून | ४। | कोबडी १७ ये |
| ६६।२॥. | १५ | पाटकोरला |

| | |
|---|---|
| यासि हाली धारा प्रमाणे बेरीज टके | १६ मोहतर्फा तलीनक ( ? ) |
| १२५० कास टके ४० | १५ तेल निा तेली ८३ येकम |
| दर कासेस टके ७ | ४.............. |
| गला खंडी १। येाा | १३४ किा किरकोळ नक्त्याव |
| खडी ५० दर २५ | २॥ बाजार |
| १०० नख्त बाब कुलबाब मख्ता | ५ मोहतर्फा कुल |
| १३५० | १२ उभा मार्ग |
| मौजे मजकूर पेशजीपासून सीकया- | ५ सिगोठी |
| खाले चालत होते तेणेप्रमाणें हाली | १५ वारोण |
| सीकयाखाले दिल्हे असे यामधे सिवाजी | १० वराड... |
| व चादजी व नाइकजी याणी खासगत | ५० गैर माा महसूल |
| सेते केली असतील ती++++दुबाले | ++ पत्र केणी ( लोणी ? ) |
| करणे बाकी कुलबाब कुलकानु मौजे | १३४ |
| मजकूर सर्जारायाचे दुबाले करणें | १४६९। |

येकून बेरीज टके २८१९। आठावीससें सवा येकोणीस टके रास दुबाले केले असे बमोजीब सदरहु सर्जारायाचे दुबाले करणे दरहर साला ताजा सनदेचा उजूर न करिता साल दरसाल याच सनदेप्रमाणे चालवणें तालीक लिहून घेऊनु असल फिरोन मारनिलेपासी देणे पा हुजूर ( सहाकोनी शिक्का मर्या देयंविरा जते )

तेरीख १३ सुरु सुद

जमादिलोवल

---

ले. २२१ श. १५९१ आषाढ व. १

स. १६६९ जुलै ४

मशहुरल अनाम राजश्री बाजी सर्ज्याराऊ जेधे देसमूख ता भोर ता रोहिडखोरे ( शिक्का ) प्रती राजश्री शिवाजी राजे सुहुर सन सबैन अलफ तुम्ही अर्दास पाठविली ते रसीदगी जाहाली तपसिले लिहिले की आपली भागाची सेते सिवाजी जेधे करितात त्यांत आपणात कथला होईल म्हणून तरी त्याचा तुमचा निवाडा होउनु गेला असता मागते कथला कराया काये गरज आहे सेते हि याना घर हि याना म्हणजे हे गोष्टी कैसी चालो पाहते इतकिया उपरी सेताविसी कथला न करणे जेणेप्रमाणे निवाडा जाला आहे तेणेप्रमाणे सेते ते व तुम्ही तकसीमप्रमाणे करून निसूर असणे कथलियात फाइदा नाही जाणिजे छ १५ सफर मोर्तबसुद मर्या

देयंविरा

जते

ले. २१२ श्रीशंकर श. १६०९ चैत्र शु. १
ता. ४।३।१६८७इ.

( पांच ओळींचा शिक्का. )

( श्री । शंभु भज । नीलकंठ मोरे । श्वर सुत । नीलकंठ )

कौलनामा अज स्वारी मशुहुरल हजरत मोतमीद दौलत राजमान्य राजश्री नीलकंठ मोरेश्वर ताहा बाजी सर्जाराउ जेधे देसमुख तपे भोर ता। रोहिडखोरे मालुम दानद शहुरसन सबा समानैन अलफ बादे कौलनामा दिला येसा जे तुम्ही मुद्दा येकनिस्टता धरून आपले वृतीवरी यावे शेवा येकनिस्टतेने करावी मुलेमानसे कबिला आणावा म्हणून मुद्दा सागोनु पाठविला व आपल्या पासून जे काये अन्याये जाले आसतील ते माफ करावें आभये देउनु मस्तकी हात ठेऊन शेवा घ्यावी म्हणून कितेक वजेने मुद्दा सागोनु पाठविला म्हणून तरी बहुत बरें याहून काय बरें आहे तुम्ही आधीच या प्रांतीहून नव जावे आणि गेलेस तरी ते सर्व अन्याये तुमचे आसतील ते तुम्ही येकनिस्टता माहाराज राजश्री स्वामींच्या पायासी धरून आलिया कुल माफच केले असेती तुम्ही राजश्री-स्वामींच्या अभयपत्राचा उजूर कराल तरी सहसा न करणे तेहि पत्रें आणून देउनु तुम्ही आलियाने तुमच्या कबिल्याची खायांखर्चायाची विले मामला करून देउनु तुम्हापासी जे जे लोक आसतील तेहि तुम्ही घेउनु आमचे भेटीस कबिला घेउनु येणे कबिला रोहिडागडी ठेउनु तुम्हीं आम्हापासी श्रीवर्धनगडी भेटीस येणे भेटीनंतर तुमच्या मुद्दा मवाफिक सरंजाम आवघाच करून व लोक तुम्हा बराबरी येथील त्याची विले करून तुम्ही कोणेविसी शक आदेशा सहसा न धरणे तुम्हास अभय दिल्हे असे त्यास अन्नेथा सहसा न करू ये विशई तुमचे अन्याये कुल माफ असेत ये विसी आम्हास राजश्री पंत कैलासवासी पंताचे पायाची अण आसे ये बाबे कौल आसे आज्ञा प्रमाण

ले॑ सनौ वधिर्मु ब्रौं (अशा ४ ओळी शिक्क्यांत आहेत.)

तेरीख २९ रबिलाखर सुरु सुद

---

ले. २१३ श. १६११ ज्येष्ठ शु. ३
ता. ११।५।१६८९ इ.

( फारसी मजकूर ओळी ७ )

( फारशी शिक्का. त्यांतील अक्षरें ओळ १ आलमगीरशाही; ओळ २ नाहिरखान २५ )

कौलनामा दायाजी सर्जाराउ देसमुख ता। रोहिडखोरे ता। भोर सु॥ सन १०९८ बाबे कौलनामा येसा जे तुम्ही बाबे राजाजी शकर हुजुर जाहीर केले कीं देसमुख मजकूर कौलाचा उमेदवार आहे की ता। मजकुरीचे देसमुखीची चाकरीस उमेद धरून हंदियात जमा होवयाची उमेद धरिली आहे म्हणौउनु मालूम केले

बराये मालुमाती खातिरेस आणून तुज कौल दिधला असे तुवा आपली खातीर-जमा राखोन मौजे कारीस ता। मजकुरी समेत कबिला व शिबदी समेत राह्मणे कोण्हे बाबे शक न धरणे बेशक होऊन ता। मजकुरीची आबादानी करणे तुझा गुमस्ता चाकरीस सिरोली ठाणियात चाकरीस देणे तुझे वतन तुज हुजरून बाहाल करून देऊन तुवा आपला गुमस्ता व हकलाजिमा व इसापती ज्या आहेत त्याचा जाबिता करून पाठवणे त्याप्रमाणे हुजरून सनद करून आणून देऊन तुवा खातीर-जमा असो देणे दरी बाब कौल असे (वाटोळा शिक्का फारसी मोर्तब)

तेरीख १ माहे साबान

---

ले. २२४ श्री. श. १६१२ आषाढ व १३
ता. २३-७-१६९० इ.

राजश्री माहादाजी सामराज सुभेदार ता। मावल गोसावी यास

॥छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये-सेवक अताजी आप (देव) सरसुभेदार माहाय प्रा। पुणे नमस्कार सु॥ इहिदे तिसैन आलफ बा। सनद रा। पंत सचीव छ २५ सोवाल सनद सादर येसी ज मौजे आबवडे येथे देव श्री नागेस आहे याचा पूर्वीपासून नजीक गूल सेत मोईन आहे व सेत बा। इनाम टके तीन आहे हे चालवणे म्हणून आज्ञा येसीयास गोसावियाचे सुभेमधे श्री-देव आहे तरी सालाबाद कारकीर्दी दर कारकीर्दी चालत आले आहे त्याप्रमाणे चालविले पाहिजे येणेकरून गोसावियाचे हि बरवे आहे तरी हे गोस्टीस अनमान सहसा केला न पाहिजे देवकृत्य आहे जाणिजे छ २६ सोवाल (इतिम
बांदा)

---

ले. २२५ श. १६१३ भाद्रपद शु० २
ता. १५।८।१६९१ इ. स.

(सात ओळींचा गोल शिक्का.)

४० । श्री धर्म प्र । योतिताशेष व । र्णा दाशरथेरिव । राजारामस्यमुद्रे । यंविश्ववंद्या । विराजते ।

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके १८ प्रजापती नाम संवछरे भाद्रपद शु(द्ध) द्वितीया मंदवासर क्षात्रिये कुळाव(त)स श्रीराजाराम छत्रपती याणी देशमुख

| | | |
|---|---|---|
| श्रीराजाराम नरपतिहर्षनिदान मोरेश्वर सुतनीळकंठ मुख्य प्रधान ( लंबवर्तुळ ) ( अष्टकोनी ) | श्रीलक्ष्मि नृहरिप्रीत मुद्रानीराजि जन्मनाः ॥ राजा रामप्रतिनिधे प्रल्हादस्य विराजते | देशकुलकर्णी व गावकुलकर्णी व व चौगुले व सेटे महाजन व बाजे ता। गुंजणमावल यासि दिल्हे आभय-पत्र येसे जे मा। सर्जाराऊ जेधे देशमुख ता। रोहिडखोरे हे स्वामीस-निध चंदीचे मुकामी येऊन विदीत केले की ता। मा। चे वतनदार व |

रयेत देखील स्वामीचे पायासी येकनिस्ट आहे तरी स्वामीनी कृपालु होऊन वतन-दारास वतने पहिलेपासून निजामशाही व अदिलशाही याचे कारकीर्दीस चालत होते तेणेप्रमाणे चालवावयाची आज्ञा करून अभयेपत्र देविले पाहिजे म्हणऊन तरी तुम्ही स्वामीचे पायासी येकनिस्ट आहा या गोस्टीवरून स्वामी तुम्हावरी संतोसी आहेत त्या प्रांतीच्या राज्याचे कार्यभागास स्वामीने राजश्री रामचंद्रपंत आमात्य व राजेश्री शंकराजीपंत सचीव ठेविले आहेत त्यावरी मख्तीयार आहे ते तुमचे वर्तमान मनास आणून वतनाचा निर्वाह करून सनदा दिधळ्या आसतील त्या स्वामीच्याच सनदा आहेत त्याप्रमाणे स्वामी चालवितील आपले समाधान असो देणे मावलप्रांत राजश्री शंकराजीपंत सचीव याचे दिमतीचे मुलकात आहे याकरिता तुम्ही त्याचे आज्ञेप्रमाणे वर्तणूक करीत जाणे आणि स्वामीकार्य करून आपला मुजरा करून घेणे खुद स्वामी त्या प्रांतास येतील तेव्हा तुमचे उर्जीत करितील हे *आभय आसे जाणिजे निदेश* समक्ष ( तीन ओळीचा षट्कोनी मोर्तब ) मर्या । देयविरा । जते ।

रुजु

सुरु सुदबार बार

---

ले. २२६

७, जनाब कान्होजी जेधा देसमुख ता। रोहिडे व भोर खा। रणदुलाखान सलाम मकसूद तुमचे बाबे वजारतमाहा बजाजी नाईक याचे हेजिबी मालुम केले की देसमुख मजकूर साहेबाचे मुलाकतीस यावियाची वारता धरितो कौल जालिया येईल मणोउन तरि याहुन काय खुद येउन मुलाखती घेणे कोणे बाबे काही शक अदेशा न करिता येणे मुलाकत जालियावरी जो मुद्दा असेली तो पेश करणे सर-जामी करून हे कि ( यापुढें फारशी अक्षरें व त्यावर मोर्तबाचा शिक्का )

---

ले. २२७

छ इजतमाह मा। कान्होजी जेधे दाम इजतहु अजी रणदुलाखान सलाम मोहवल मकसूद अर्दास पाठविली तपसिले मालूम जाली व मा। नागोजी पडिती जयानी सागितले त्यावरून कलो आले तरी तुम्ही पातशाहीचे दौलतखोहा आहा दाईम दौलतखोहीस तकसीर केली नाही व मा। हजरती वेदाजी पडित येही तुमची बहुत काही सिफारसी सागितली तरी आम्हास येकीन मालुमच आहे ते तरफेस कोढाणेकरी हरकती माडिली आहे तरी तुम्ही ये वख्ती दौलतखोहीस तकसीर न करणे हाली दिल घालून गडास येऊन वेढा घालून कैद करणे तेथील माया तुम्हास व मजला आहे तेथील काम तुमच्यान होऊन येईल येसे येकीन मालूम आहे हाली गडानजीक येऊन दौलतखोही करणे सवगदेचे बाबे व रोटीचे लिहिले तरी आम्ही ज्यास इमान व कौल देऊन त्यास तकरार नाही हे तुम्हास परबाहिरे मालूम असेली दौलतखोही दिल घालून केलिया आमचा इमानच आहे त्यास तकरार नाही रोटीविगी सदकचा हात करून हाली तुम्हास पाठविले आहे ते घेऊन व तश्रीफ पाठविली आहे ते घेणे हजरतीची दौलतखोही केलिया रोजबरोज सरफराजीच होणार ये बाबे खातीरजमा राखोन हसम घेऊन गडास येऊन वेढा घालून खालील जरा जवाद (१) न जाता गड सिताबीने कैद होऊन कामावरी ये गड हजरतीचे तरफेस होये ते करणे यामधे कुली फाइदा व सर्फराजी आहे तुम्हाकरिता या गडाचे काम सर होउनु आलिया तुमची हि सर्फराजी कैसी होते तेहि मालूम होईल दराज काय लिहिणे तुम्ही पेसजी येक तागाईत जो गुन्हा केला आहे तो तुम्हास माफ केला आहे तरी तुम्ही बेफिकीर होऊन दिल घालून दौलतखोही करून दाखविणे ये बाबे आमचा कौलु आहे हे कि ( मो. )

हे क

---

ले. २२८

रामराम

छ इस्टजनमनोहर खंडेस्वरी सदा येसवत दा। राजेश्री कानोजी नाईक देसमुख ता। रोहिडे गोसावी यासी मध्वाजी क्रुस्ण हवालदार पा। वाई उपरि मौजे चिखलगावासी अपुले मुतालीक देउनु राजश्री...नजी अजेचे मोकासासी तोरग बाधविले बहुत बरवे केले तुम्ही दाइमादिवाणाचे हलालखोर असोनु मशारनुलेसी खर्चाचे बहुत त गा तु रु सी असे तरी नीम कडाची सीस्त करुनु देवणे जरूर आहे हजरतीखान साहेबाचे खुर्दखत सादर आहे काही उजूर न करणे बहुत लिहिणे नलगे हज-

---

१ वेदाजी पंडित म्हणजे वेदाजी अनंत असावा व त्याची कान्होजीशी मैत्री व कौलइनाम १५५१ च्या अभिनांत झाला. खं. १५ पृ. ३६६

रतीखान साहेबी देह ४* दिल्हे असेती (वा. शि.) तुम्ही तेरिखेचे उजूर करिता म्हणौउनु तुम्ही अम्हासी लिहिले होते तरी साहेबी आपुले सिकेसी मन्हामत केले असे तेरीखचे उजूर न करणे रजाप्रमाणे दुवाला तुम्हीं विवेकी असे हे विनाति ( षट्. मो. )

पौ छ १८ रबिलवल

विनति

---

ले. १२२८

छ मा। कान्होजी जेधे व खोपाड अदिकारी पा। रोहिडा अजी हबसखान हवालदार समत तलकोकण सलाम मकसुदु मसलतीचे बाबे पेसजी तुम्हास हातरोखा होता तो तुम्हानजीक पाठविला पेसजीच आहे व आम्ही लिहिले होते की आम्ही दाभोल तर्फेस येऊन स्वार होऊन माहाडास येऊन तेथे तुम्ही येताच मेलऊन घेणे तरी आम्ही माहाडास आलो असो ( वा. शि. ) सिताब(ब)च दाभोलेस जाऊन तुम्ही किताबती देखताच स्वार होऊन येइजे घडीचे देर न कीजे ( वा. शि. ) हे कि

---

ले. २२९

छ मा। कान्होजी रोहिडेकर अजी हबसखान हवालदार समत तलकोकण सलाम मकसु[द] मसलतीचे बाबे तुम्हास दोनी बारी (?) फर्मान सादर जाले व समतेहुनु हि ताकीद लिहिली अमा हैगै करुनु आले नाही तुम्ही दिवाण नफर मिरासी होउनु मसलतीस हैगै केलिया या अमले कैसी सरफराजी होईल ( वा. शि. ) हाली ताजा फर्मान सादर जाला असे हा फर्मान तुम्ही खा। इभराइमखाना नजीक सिताब स्वार होउनु येइजे देर केलिया तुमची पैर येत नाही तुम्ही जाणा ( शि. )

छ १३ माहे रमजान

या कामाबदल सेख अहमद नाईकवाडी समत पाठविले असेती यास खुद निसबती............आदा कीजे...........

पौ छ २२ माहे रमजानु

---

* हे चार गांव १ चिखलगांव, २ आबोडा, ३ नार्टिंबी आणि ४ कारी हे असावे. खं. १५ पृ. २९२ आणि ह्याच पुस्तकांतील २१३ व २१४ ले. पहा.
१ पृ. २१६ वर २१८ हा लेखांकाचा आकडा चुकीनें अधिक पडला आहे. तो येथें दुरुस्त करून घेतला.

ले. २३०

छ मसरुल रुद्रादत (!) कान्होजी जेधे देसमुख तपे रोहिडा अजी हबसखान हवालदार समत तलकोकण सलाम येथील खुसी जाणोनु आपली खुसी लिहिणे महुवल मुराद ऊ की हजरती साहेबाची हाली मागत्यान दाभोलेचे मसलतीचे रजा सादर जाली यावर...आम्ही स्वार जालो असो मोहीब मा। हजरती आ... जी पंडित याची रजा घेउनु गावास आलेती आइकोन खुसी जाली आता दाभोलेचे मसलतीचे काम बहुत असान आहे तुम्हासारिखे जाती असलेयान फतेच असे दाभोलेमधे आमह्यामधे गावा ती चहूचे अतर आहे......बा चहु रोजाचे आहे तरी तुम्ही किताबती अहडताच ( वा. शि. ) सिताब जमेतीसी येइजे मुद्दा इनसाफ तुम्ही येताच फते होईल सिताब आले पाहिजे याबद्दल तमाजी पाठविले आहेती*...... ......खातिरेस येईल सिताब स्वार होउनु......तुमचे सिरी असे

ले. २३१

छ मसुरल हजरती मोतमीद दौलतराव अजम कान्होजी राजे जेधे अजी खा। बबूखान हवालदार सा। तलकोकण सलाम बाजदसलाम येथील खुसी जाणोनु आपली खुसी लिहिणे म॰वल मकसुद तुमचे बाबे मा। येकोजी रुष्णा लिहिले येक ब येक मालूम जाले बहुत खुसी जाली तरी तुम्ही हजरतीचे दौलतखा असा तागाईत मसलती सरंजाम केलिया आहा तेथे आम्हास मदती कराल याचे काय अजब आहे अमा आम्ही तुमची रोज ८ विन्हेरा वाट पाहिली जे आमची किताबती पावताच आम्हास मेलउनु हवालदार देर जाले आमचा मुद्दा होता जे जनाब मिर्जा अबदुल फते खा। इभराईमखान जमेती घेउनु पडित अजमापासुनु आम्हास मदती येताती तरी जे (शि.) जोवरी येती तोवरी दाभोल कबज करणे तरी मा। रुस्णाजि राजे व तुम्ही सिताब जमेतीसी मेलऊनु घेणे घडीचे देर न करणे मसली पाठविलीया आहेती ते घेणे ये बाबे मा। येकोजी रुस्ण बोलता खातीरेस आणोनु दरहाल येणे खेडी (!) रोज ४ वाट पाहत आसो सिताब येइजे हे कि ( मो. )

कि.

ले. २३२

छ मसुरुल अमाम कानोजी जेधा देसाई रोहिडे अजी अफजलखान महमदशाही सलाम मकसुद चंद्रराउ कर्दीम मयत जालियावरी गैरी लोकी पैस करून बलकाविले आहे याबदल त्यावरी नामजादी केली आहे येसीयास तुम्ही दौलत-

* तेथून अक्षराचें वळण निराळें

खाहा आहा तुम्ही आपले तर्फेने ( शि. ) हसम लोक मेलउनु आपले तर्फेने सुरु करणे उजूर व मुलाहिजा न करणे याच कामावरून तुमची बहुत काही सरफराजि आहे कागद पावताच हसम व लोक जमा करून सिताबीन सुरु करून खबर लिहून पाठविणे दराज लिहिणे न लगे हे कि ( मो. )

---

ले. २३३

छ मा। कान्होजी जेधे देसमुख किले रोहिडा खान अफजलखान माहामद्शाही औलाम ऊ की तुम्ही अरीजा पाठविला पाऊन ता। खातिरेस आला व तुमचे हेजीब मा। आबाजीपत येही मालूम केले जे हणमतराये काबीज केले आहे ते आपणास दिधलिया काबीज करून देईन व जाउलीची मसलत करीन तेथील आपणास दोनीसे लोकाची नाइकी देविली पाहिजे व वेलग आपले पाटिलीकीचा गाव आहे त्या गावीचे दस्तं(क) मवाफीक लोक चाकरीस ठेवीन येसे ता। बोलिले मालूम जाले येसियास हाली जोहरची मिसेली पाठविली आहे तेथे तुम्ही खासा येऊन काबीज करून तेच जागा तुम्ही खासा राहाणे तलग आम्ही हि वाईस येतो आलियावरी तुम्ही आपले जमेतीनसी आमची भेटी घेणे जाउली काबीज जालियावरी तेथील नाइकी दोशा लोकाची तुम्हास देऊन व वेलगचे बाबे लिहिले तरी जाउली काबीज जालियावरी वाईचे नाइकीचे लोक चाकर ठेउनु त्याचे मुशाहिरा दस्तमाफिक पाहून तोहि सरजाम करून देउनु दरीबाब आपला खातीरजमा असो देणे कामावरून तुमची बहुत काही सरफराजी होईल व पेसजी येक ता। तुमचा जो गुन्हा असेली तो माफ आहे काही फिकीर न करणे खातीरजमा करणे ( मो. )

( पौ ता। छ २० रमजान )
हे किा।

---

ले. २३४

छ इजतमाब कान्होजी जेधा देसमूख किले रोहिडा खान अफजलखान माहमद्शाही येलाम ऊ की तुमचे हेजिबु हुजूर येउनु जोहरखोरियाची मिसेली* घेउनु गेले त्यास बहुत रोज जाले अमा हनोज तुम्ही येउनु जोहर काबीज केले नाही तरी हे ( शि. ) दिरग करावयाचे काम नव्हे आम्ही हि चाद जालियावरी

---

*कान्होजीस श. १५७१ च्या भाद्रपदांत जोहरखोरें काबीज करण्याची परवानगी मिळाली [ खं. १५ ले. ३३५ ].

वाईस येतो तलग तुम्ही जमेतीसी येउनु सिताब जोहर काबीज करून हुजूर खबर लिहिणे दि्रग न करणे बहुत सितावी करणे दराज लिहिणे न लगे यावरून तुमची बहुत काही सरफ[रा]जी आहे सिताब हणमतरायास उठवणे ( मो. )

---

ले. २३५

श्री माहादेवाचे आण आसे

॥छ सौजान्या कानोजी जेधे देसाई ता॥ भोर किला रोहिडा यासी

जायेणे पडित वजरतमहा मुझफर ऊ लिहावयाकारणे यैसे जे तुम्ही आम्हासी अर्दास पाठविले पावले आपण यख्त्यार होउनु भेटीस येणार कौल वा आपले आत्मिक पाठवणे म्हणौउनु तरी तुम्हासी हजरत साहेबाचे कौल पहिलेच पाठविले होते अता हि तुम्हासी कौल असे तुम्ही कोणविशी ( दोनै शि. )अदेश न करिता येउनु भेटी घेइजे तुम्हाविसी दुसरे विचारे नाही खातीरजमा करून येइजे आमचे इनाम आहे तुमचे दिलासे बदल आमचे माहातीचे राजश्री विठो पडित वा विस्णेपत पाठविले आहेत दुसरे विचार न करिता येइजे काही खिलाफ न धरणे आम्हासी तुम्हाविसी हजरत साहेबाचे नमकाचे······ असे तुम्ही आलिया खानसाहेबाची भेटी करून सरफरज हो(ई)ल मोर्तब

पो॥* छ २६ माहे रमजान रमजानु

तुम्हाविसी राजश्री गगाजी राजे व अबाजी राजे घोरपडे बहुत सागितले आहे तेहि तुम्हासी लिहिले आहे अवश येइजे हे वि

---

ले. २३६

॥छ इजतमाब साआदत निसाहा कान्होजी नाईक देसमुख ता॥ रोहेडा व ता॥ भोर अजी मलिक शाहे सलाम मोहबत अंजाम मकसूद अर्दास पाठविली मजमून मालूम होउनु खातीर निस्या जाला सरदारकी स्वारां से दोनी देउनु व पटी व मुकासे देउनु म्हणौनु कौल पाठवण बदगीस येउनु म्हणौनु ता॥ लिहिले बहुत खुष केले तुम्ही आपली खातीरजमा राखोनु बेमुलाहिजा होउनु कुल जमेतीसी येउंनु मसलतीस शरीक होणे बरल्यास तेजी व सिरन्हावनी ( ! ) पटी व मुकासा देउनु बेमुलाहिजा होउनु येण ये वख्ती आलिया न्याहायत दौलतखाही जाहीर होईल पेसजीचि कुल तकसीर माफ असे काही मुलाहिजा न करणे बेमुलाहिजा होउनु सिताब येणे खातीरजमा कीजे ( शिक्का व मो. )

---

* हा मजकूर पत्रांत समासांत मागाहून तिरपा लिहिला आहे. २ मजकुरांतच जेथें कंसांत असे शिक्के दाखविले आहेत तेथें डाव्या समासात त्या मजकुराच्या सुमारें तो शिक्का आहे असें ले. २२८ पाहून समजावें.

ले. २३७ श. १५४६ आश्वीन शु. ४

( फारसी सिका ) इ. १६२४ सप्टेंबर ६

अष्टकोनी

अज रख्तखाने खुदायेवद मलीक शर्क मलीक अंबर खुली द्याम दौलतहू बजानेब कृस्णाजि बादल देसमुख तपे हिरडसमावल बिदानद सुा खमस इसरीन अलफ देसमुख तरफ भोर तपे गेहिडा अर्दास छ १२ रमंजान पाा छ २३ सौवाले मजमून की तरफ भोर नजीक राइरेस्वर डोगर आहे येके तरफेनी तपे हिरडसमावलीचे दोनी च्यारी गाव आहेती त्याची सीव लागली आहे व येके तरफेनी सेरकिराचे ताचे गाव मौजे कारी व मौजे वडटेवी व मौजे कोरले या तिही गावाची सीव डोगरासी लागली आहे डोगरु दोही मुलकाचे सरद्मधे आहे यैसे असोनु हला कृस्णाजी बादल नवी जिकीर करून करकसा माडला आहे जे समुदा पठार भोये आपलीकडे आहे म्हणोनु जमेतीच्या बले भोये आपलिया तपियाखाली घालितो रोज बिरोज येऊनु कमीनाच्या गावाचे पाठीमागे डोगराचे माथा उभे राहून उपराला करिताती आपले तरफेचे गावीची गुरेढोरे चरो देत नाहीं यैसा अमल माडिला आहे खुदी म्हणौनु लिहिले होते तरी सिवेचा अमल व नीरनदीचे थडीचा अमल निवाडा जाला असोन लाइनी करकसा करितोस येणे अमले तुज ताकीद करणे दुरुस आहे— आता गहदम सालाबाद तसरुफाती जमीन निवाडा जैसा जाला असेली तेणेप्रमाणे चालवणे नवी जिकीर न कीजे मोरतब ( फारशी कोयरी शिक्का. )

तेरीख २ माहे जिल्हेज बारसुदु रुजु सुरनीस

जिल्हेज सुरु सुदु

---

ले. २३८ फारसी श. १५४६ कार्तीक व. ९

( अष्टकोनी शिक्का ) इ. १६२४ आक्टो. २५

अज रख्तखाने खुदायेवंद माा सर्क माा अंबर खुलि दयामदौलतहु बजानेबु कान्होजी देसमुख तर्फ भोर तपे रोहिडा बिदानद सुा खमस इशरेन अलफ अर्दास छ २९ माहे जिल्हेजे पौा छ १५ मोहेंरम मजमून साहेबाचे बद्‍गीस सेरकिर अर्ज लिहिला होता राइरीस्वरडोगर तपे मजकूर व तपे हिरड [ स ] मावळ व नजीक वाइ विलायेती द्रम्यानें आहे येके तरपेनें सेरीकराचे गाव मौजे कारी व मौजे वडतेवी व मौजे कोरले या तिही गावीची सीव डोगरासी लागली आहे व तपे हिरडस मावलीचे गाव दोनीच्यारी सीव लागली आहे यैसे असोनु कृष्णाजि बादल देसमुख तपे हिरडसमावळ नवी जिकीर करून सताति लाविली आहे जे समुदी पाठारीची भोई

---

१ आषाढ शु. १४. २ श्रावण व. ११. २ कार्तीक शु. १. ३ कार्तीक वद्य २.

आपलिया तपियाखाली आहे म्हणौनु कुसूर करून खेत कुणबियासि करू देत नाही तरी ये बाबे राइरीच्या हवालदार व किले रोहिडाचे हवालदार व रोहिडाचे कारकुनास खुर्दखत सादर करणे जे तुम्ही राइरीस्वराचे माथा बैसोन रुस्णाजि बादल बोलाउनु निवाड करणे येसे खुा सादर जालिया सिवेचा निवाडा होईल गावीची सचणी होईल येसे न व्हता बादुली सवि वळुनु नेली आहे तीन गाव खराब होती म्हणौनु ताा लिंहिले तरी ये बाबे कारकुनास दखल कीजे ते जे सरजामी करितील ते खबर हुजूर लिंहिणे व येसेच मागे कुसूर लाउनु मौजे आकसाळे तपे मजकूर व मौजे भावखल हिरडसमावल हरदो गावामधे सीव आहे त्याचा पेसजी सेरीकराच्या गावीच्या माहार रवा केला तो खरा निघाला येसे असोन ते खेत काढू दिधले नाहीं तो गला खडी १० दहा धहुड सवत (!) केला निवडिलिया अमलास येसा हुकूम होतो म्हणौनु लिहिले तरी ये बाबे कारकुनास दखल कीजे व हर दो तपेयामधे नीरानदी आहे दोही थडी नदी आपली च म्हणौनु सेरीकराचे तपाचे भोये पाण्यामधे सी गखत नाहीं येसी जोरी होते दोही थडिया नदी आपलीच म्हणौनु खातो येसा सिरजोरीचा अमल माडिला आहे म्हणौनु लिहिले तरी ये बाबे कारकुनास दखल कीजे व सेरीकराची इसाबती व हकलाजिमा अनामत केला आहे साहेबी हातरोखा सादर केला तो सिरी धरून बाई विलायेतीस जमेती होती त्यावरी जाऊनु भाडण जाहाले मबलक लोक पडले जखमी जाले तरी कमीन दिवाण सफराई करिता तकसीर करीत नाही तरी हक लाजिमा मोकली होण्यास नजर येनायत फर्माउनु खुर्दखत सादर होण्याची रजा फर्माविली पाहिजे म्हणौनु लिहिले तरी ये बाबे अलाहिदा जाब येकदर सादर असे तुवा आपलेया कबुलाती खेरजि सन और्या व खुमस हरदो सालाचे आणीक होनु पाउणसे ७५ झाडा कीजे व इसाबती व इनामतीचे बाबे अल्हाहिदा खुा सादर असे मो... फारसी मोर्तब

तेरीख २२ माहे मोहरम रुजु सुरुनिवीस

मोहरमु[1]

बार खुदु सुरु सुदु

---

ले. २३९ [ श्री श. १७१७ मार्गशिर्ष शु. ३

इ. १७९५ डिसें. १४

तकरीर जबानी आनंदराव सर्जाराव जेधे देशमूख तर्फ भोर तपे रोहिडखोरे सुरसन सीत तिसैन मया अलफ तर्फ मजकूरचे देशमुखीचें वतनसंबधे पदाजी जेधे व

---

१ श. १५४५-४६

त्याचे भाउ वाद सांगतात त्याची हकीकत ऐसी जे त्यांचा व आमचा मूळ पुरुष कान्होजीराव बिन नाइकजी जेधे यांच्या लग्नाच्या स्त्रिया थोरली सावित्रीबाई दुसरी येसूबाई तिसरी चंद्रावा चवथी रखमाबाई आणि पाचवी भोगपत्नी कृष्णाबाई याना पुत्रसंतती सावित्रीबाईस पुत्र बाजी सर्जाराव त्यास पुत्र दोन वडील मताजी नाइक धाकटे कान्होजी मताजी नाइकास पुत्र नागोजी नाइक त्यास पुत्र बाजी नाईक त्याचे पुत्र आनंद्राव हली आहेत कान्होजीचा वंश नारोजी हली आहे येसूबाईचे पुत्र संभाजी नाईक त्यास पुत्र जनाजी नाइक त्यास पुत्र महादजी नाइक त्यास पुत्र रघोजी नाइक हलीं आहेत चंद्रावास पुत्र नाही रखमावास पुत्र संतान नाही भोगपत्नी कृष्णाबाईस पुत्र वडील शिवजी नाइक दुसरा चांदजी नाइक तिसरा नाइकजी नाइक चौथा रायाजी नाइक त्यातले वडील शिवजी नायकाचे नकल दुसरे चांदजी नाइक यास पुत्र कान्होजी त्यास पुत्र बहिर्जी त्यांचा पुत्र कान्होजी हलीं आहे तिसरे नाइकजी यास पुत्र बावाजी त्यास पुत्र वाघोजी त्यास पुत्र राणोजी हलीं आहेत चौथे रायाजी यास पुत्र हणगोजी त्यास पुत्र राजाजी नाइक यास पुत्र नागोजी व पदाजी असत लग्नाच्या स्त्रिया चौघी यातून दोघींचा वंश आहे थोरले सावित्री बाईस देवाज्ञा. झालेवर दुसरी स्त्री येसूबाई ही घरातील कारभार चालवू लागली तेव्हा तिचे नाकर्तेपण कान्होजी नायकास समजावून कृष्णाबाई व वेंकाजी कृष्ण लोहोकरे खासनीस हे घरातलि व महालातील कारभार चालवूं लागली तद्नंतरी वतनाचे वाटणीचा प्रसंग पाडोन कान्होजी नायकापाशीं वाटणीची बोली घातली हें वर्तमान सर्जारावास कळतांच मुलखावर उठोन चालिले ते समयीं चिकणे सालेकर आडवे होऊन इमान प्रमाण देउन मौजे कोरले येथें घेउन आले त्याजवर कल्याण भिवंडीचा काजी हुसेन याची लेक ताजबिबी इने बादशाहाजवळ गैरवाका समजावोन मौजे चिखलगाव आमचे इसापतीचा तो तिने इनाम करून घेतला आणि वरकर (!) इसापतीवर जाजती गडधू जाले कान्होजी नाइक वृध जाहले दरबारचे कामकाज त्याच्यानें होईना तेव्हां सर्जाराव याजकडे चौघास मध्यस्तीस घालोन इमान प्रमाण देऊन मौजे कारीस घेउन आले कान्होजी नायकानी त्यास ताजबिबीने चिखलगाव घेतला वगैरे आपल्या वतनावर गडधू जाले हें वर्तमान सांगितले त्यावर सर्जाराव बोलले कीं आपले आज्ञेवरून पादशहाकडे जाउन बंदोबस्त करून येईन परंतु कृष्णाबाई व वेंकाजीपंत खासनीस यानी वाटणीचे कागद केले आहेत त्याजवर आपणा जवळून शिका करून घेतील त्यांची भीड आपणास पडेल त्याविशई मासी खातरजमा जाहाली पाहिजे त्यावरून कान्होजी नाइक यानी शिका करणार नाही ऐसी आणभाक करून करार केला व वतनावरील गडधू दूर करण्यास खर्चवेच पडेल त्याची खातरजमा केली याप्रमाणे दोनी ठराव करून घेउन सर्जाराव

पादशहाकडे जाउन मेहेनत करून ताजाबिबी कडील गाव सोडवले गडधू दूर करून कान्होजी नायकाचे नावचे फर्मान आणले तेव्हांचे खर्चाची याद् आहे त्याजवर महाराज शिवाजीराजे यांचा अंमल जाला तेव्हां शिदी जोहार याने पन्हाळियास वेढा घातला तेव्हां सर्जाराव साहेब चाकरीस गेले मागे कृष्णाबाई व वेंकाजीपंत याणी वाटणीचे कागद् घरामधे करून कवायतीने कान्होजी नाइकास समजावून सर्व देश-कांच्या साक्षी व शिका करून घ्यावा हा प्रसंग पाडिला तेव्हां कान्होजी नायकाने चितात आणले कीं कान्होजीने वतनावरील गडधू दूर केले ते हलीं मोहिमेस गेले आहेत त्यासी माझी शपतक्रिया वचन गुंतले आहे व मी याना नको म्हटल्याने ही बायको ऐकणार नाही व तूर्त घरात कटकट पडेल यास्तव परभारा देशकावर टाकिले त्यावरून वीस गावचे पाटील कुळकर्णी देशक आणोन कागदावर साक्षी घालणे ऐसी कृष्णाबाई बोलली त्यावरून साक्षी घालू लागले मग इंद्रोजी पाटील आंबवला मौजे कर्नवडे व समस्त मंडळीने दिकत घेतली जे कागदपत्र पुरता वाचून पाहिला नाही तोंच साक्षी कैशा घालीत चालिला मग वाटणीचा कागद् वाचून दाखविला त्यातील वाटणी इसापत गावची मररकमी धरिली पाटिलाची बलुत्यांची इनामे व श्री नागोबाचें इनाम व नंदादीप व नैवेद्य वगैरे धर्मादाय आणि दसऱ्याचा खर्च व नाइकीमुळें खर्च व हशम लोक व कारकून पाळावे म्हणोन त्या वाटणीपत्रावर लिहिले आहे आणि चाकर लोक मुळवे यांची शेतें व कारकुनाची शेतें व खासनिशीचे वेतन व इसापतीच्या पांढरी ( गाव ) व कान्होजी नाइकानी वडील स्त्री सावित्रीबाई याना पानसुपारीस इनामगाव मौजे आंबवडे पैकी मजरे घोरपडवाडी रकम टक्के ९नऊ व मौजे चिखलगाव पैकी कामथशेत येथील रकम टका १॥ दीड एकूण साडेदहा १०॥ टके जमीन सावित्रीबाई होती तोंपर्यंत त्यांचेकडे चालली त्यांस देवाज्ञा झालेवर त्यांची सून सर्जेराव यांची स्त्री तुळजाइआवा यांजकडे कान्होजी नायकानी चालविली तो भोगवटा असोन ती कलमें वाटणीत यावी ती दिली नाहीत आणि शिक्याचे वाटणीचे नावच नाही पुढे कान्होजी नायकास पुत्र जाहले तरी सर्जाराव याणी आपले वाटणीच्या तक्षमेमधीं चौघा भावास बसली आहे त्याप्रमाणे देउन समजावीस करावी ऐसे वेंकाजीपंतानी कैपक्ष धरून वाटणी पत्रांत लेहून ठेविले आहे ऐसा मजकूर गहीर रितीचा पाहून सर्वांनी वाटणीपत्र ठीक नाही व देशपांडे याणी वाटणीपत्र लेहावे तें लिहिले नाही ऐसे चितांत आणोन हा पधतवार कागद नव्हे ऐसे जाणोन उतर केले जे सर्जाराव मोहिमेस गेले आहेत ते हाजीर नसतां आम्ही साक्षी घालीत नाही ऐसी सर्वांनी ते समयीं उतरें केली तेव्हां वाटणी पत्रावर साक्षी घालावयाच्या राहोन सर्व मंडळी उठोन गेली तो कागद् तैसाच राहिला सर्जाराव शिवाजी महाराजाबरोबर किले कोट घेणे व स्वाऱ्या शिकाऱ्या नेहमी करणे ते त्याजबरोबर करीत गेले तों इकडे घरी कान्होजी

नाइकास बरे वाटेनासे जाले यास्तव माहाराजांचा निरोप घेऊन सर्जेराव घरास आले तदनंतर कान्होजी नायकास अतिशय वासा जाहला आणि संभाजी नाइक यांचे पुत्र लहान हे गलबला करू लागले म्हणोंन सर्जाराव यानी कडेस घेऊन श्री नागोबाच्या देवळीं गेले आणि मुलास खेळवीत बसले तों घरांत कान्होजी नाइक यांचा काळ जाहला ही संधी पाहून कृष्णाबाई व वेंकाजीपंत व कृष्णाबाईचा धाकटा पुत्र रायाजी जेधा याने प्रेताचा हात धरून त्या कागदावर शिका केला ते वेळेस सर्जारावाची स्त्री तुळजावा घरांत होती त्याणी पाहिलें मग उभयतानी कान्होजी नाइक मृत्य पावले म्हणोन बोभाटा केला तेव्हां सर्जाराव देवळांतून उठोन घरांत आले पाहू लागले तों कान्होजी नायकांनी कैलासवास केला मग सर्वत्रानी मिळोन अग्निसंस्कार करोन घरास आले मग प्रेताचे हातें पत्रावर शिका केला हें सर्वत्रास कळलें त्याजवर कांहीं एका दिवशीं शिवजी नाइक व नाइकजी व चांदजी व रायाजी व कृष्णाबाई व घरचे बापे एकत्र होऊन लोकांची घरें वतनी शेतें मौजे कारी येथील घेतली यास्तव लोकांच्या कटकटी जाहल्या तद्नंतरी लोक उठोन महाराज शिवाजी राजे याजकडे जमाव सुधा चाकरीस म्हणोन गेले जाऊन अर्ज केला कीं आम्हास राहावयास जागा दिली पाहिजे त्यावरून माहाराजानी पुशिले कीं जागा काय निमित्य मागता तुमची जागा मौजे कारीत असोन मागावयाचें कारण काय तेव्हां लोकांनीं उत्तर केले कीं आमची घरें व वतनी शेतें शिवजी चांदजी नाइकजी रायाजी यानी घेतली याकरितां स्वामीपाशी आलों मग महाराजानी लोकांस पुरशीस केली जे पूर्वीपासोन तुमची वतनदारीची हकीकत कैसी आहे ती सांगोन देणे त्याजवरोन लोकानी उत्तर केले जे आम्ही पूर्वी पासोन शिक्याखालीं चाकरी करीत आलों तरी महाराजानी कृपाळू होऊन गाव शिक्याखालीं पूर्वीप्रमाणे दिल्हा म्हणजे आमचीं नांदणूक होईल त्याजवरून महाराजानी अर्ज ध्यानात आणून सर्जाराव यास हुजूर बोलावून आणिले मग पुशिले कीं हे लोक तजावजा काय निमित्य होतात सर्जारावाने महाराजाला विज्ञापना केली कीं महालोमहालच्या देशमुख्या व देशपांडपणाची वतने सरकारात अमानत आहेत त्याप्रमाणे आमचेंहि सरकारांत आहे त्यास नेमणूकमाफीक हकलाजिमा चालतो त्यापैकीं दुमाला लोकास आहे तो वजा करून बाकी ऐवज राहतो तो आम्ही घेतो त्याने आमचीहि आवकात चालत नाही परंतु लोक लोकपाळांचा दुमाला वडिलापासोन चालत आला आहे त्याप्रमाणे चालवितो त्यास शिवजी वगैरेनी लोकांची घरें व शेतें घेतलीं आहेत त्यानिमित्य लोक तजावजा जाहले साहेबी बंदोबस्त केलियास राहतील त्यावरून स्वामींनी शिवजी वगैरेकडील शेतें व घरें दूर करून मौजे कारी पूर्वीप्रमाणे शिक्याखाली दिली सर्जाराव यास दस्तमाफिक हक गावगना किरकोळ बाब करार करून दिली याचें पत्र राजश्री

कृष्णाजी भास्कर सुभेदार प्रांत मावळ यास दिले त्याजवरून सुभेदारानी शिवजी वगैरेना ताकीद करून लोकांची शेतें घरें वगैरे त्यांची त्यास देविली शिवजी वगैरे घरचे बांपे करीत होते ते काढोन लाविले नंतर ते शिरवळी मोगल होता त्याची पाठ निघोन शिवाजीराजे कैलासवासी जाहल्यानंतर संभाजीराजे यांचे कारकीर्दीस शिवजी वगैरे भाऊ मोगलास मिळोन कारांची व आमचे महालातील गुरें वळून नेली मुलखास उपद्रव करून उद्वस केला मग संताजी निंबाळकर हवालदार किले विचित्रगड व गडकरी व सर्जाराव एकत्र होऊन विचार केला कीं मुलकाचा बंदोबस्त कोणें रीतीने होतो हवालदारें सला दिली जे तुम्ही शिरवळास मोगलाकडे जाणे आणि शिवजी वगैरे यांचा सालजाब करून मुलखाची वसाहत होय तो अर्थ करणे त्याजवरून सर्जाराव शिरवळास जाऊन अविंधाची भेट घेउन सर्व हकीकत जाहीर केली त्याजवरून शिवजी वगैरे यास मोगलानें दूर करून गावगनाची वसाहत करावयाची आज्ञा केली त्यावरून मुलखाची वसाहत जाली हें वर्तमान संभाजीराजे यास कळलें त्याजवर सर्जाराव मोंगलाकडे गेले ऐसे जाणोन महाराजानी इतराजी केली तेव्हां संताजी निंबाळकर हवालदार यास पूर्वीची सर्व हकीकत ठावकी होती त्यानी महाराज याना सर्जारावाविशीं पत्र लिहिलें जे शिवजी जेधे मोगलाकडे गेले त्याने महालांत उपद्रव करून मुलख बेचिराख केला सर्जेरावांची गुरें ढोरें वळून नेलीं सबब मुलखाच्या बंदोबस्तास सर्जाराव गेले त्यास महाराज यानी कृपाळू होऊन अभयपत्र पाठविले पाहिजे त्यास महाराजानी शब्द लावून उतर लिहिले आणि हुजूर येणे ऐसी आज्ञा केली आज्ञेप्रमाणे सर्जाराव दर्शनास गेले मागें मोगलानें किला रोहिडा घेतला ती मसलत सर्जाराव यास सांगोन आज्ञा देऊन रवाना केले आज्ञेप्रमाणे कारीस येऊन मुलेंमाणसे यास ठिकाण धरवेना हें जाणोन वाइ देशांत जांबळीस नेऊन ठेवली आणि आपण लोकांचा जमाव करून किले रोहिडा हस्तगत केला मग महाराज राजश्री संभाजीची भेटी घेतली बहुत मेहेरबान होऊन सर्जाराव यास शिरपाव दिल्हा कांही एक दिवसानंतर या प्रांती औरंगजेब पादशाहा यांची मोहीम जाली तुळापूर येथें पादशाहा यांचा मुकाम होता तेथें महालोमहालचे देशमुख व देशपांडे गेले तेसमयीं सर्जारावहि गेले तेथें कचलांखान वगैरे मुत्सद्दी यास नजर व अंतस्थ देऊन निरोप घेऊन घरास आले मुलखांची वसाहत केली तेथें खर्च पडिला तो आमचे वडिलानी पदरचा दिला दुसऱ्या कोणी दिला नाही पातशहांचे पुत्र शाहाबकस व अजनतारा यानी कसबे शिरवळीं येऊन मुकाम केला आणि सर्जाराव व बाळाजी नाईक खोपडे देशमुख तर्फ उत्रोली यास बोलाविले कीं किले रोहिडा घेऊन देणे त्यावरून सर्जाराव बोलिले जे आम्ही जमीदार तेव्हां हा मनसोबा आम्हास कैसा होईल मग बाळाजी नाइक याणी कबूल केले कीं किल्ला घेऊन देतों व सर्जाराव

याची बापगूद् (?) केली त्यावरून सर्जाराव यास अटकेत घालावे ऐसा ठराव दरबारांत जाहला हें वर्तमान सर्जारायास कळतांच रातोरात निघोन कारीस आले आणि किल्यास सावध केले मार्गे बाळाजी नाइक खोपडे यानी स्वारी घेऊन किल्याखाली आले गडकरी हरजी पवार याचे डोचके कंकरी जवळून कापून नेले आणि किल्याभोंवता वेढा घालोन अंधरवडाजवळ मुकाम करून राहिले आणि सर्जाराव यास आणावयाकरितां चार भले लोक पाठविले त्यावरून सर्जाराव याणी दुखणियाचें मिस घेऊन आपले पुत्र मताजी नाइक याजला बरोबर देऊन सलूख वरकरणीचा करून पाठविले तद्नंतरी मताजी नायकास जमाव सुधा येऊन त्यास सांगितले कीं किल्यास मोर्चे लावून लढावे तेव्हां मनाजी नाइक मुळीच्या बेताप्रमाणे मावेची लढाई करूं लागले इकडे सर्जाराव याणी किल्यास बातमी खबरहुशार असणे अवसान न सोडणे ऐशिये रीतीची वरचेवर खबर शिद्रोजी जाधव हवालदार यास पोहचवीत गेले व किले मजकुरी गला बेगमीस पाठवावा म्हणोन मौजे चिखलगाव येथें आपला खासगत गला होता तो परभारा गडकरी यास सूचना देऊन घेऊन जाणे ऐसी बातमी खेळविली वगैरे गावगनाचा गला नेणे ऐसे सांगितले त्यावरून गडकरी दरवाजाबरोबर उतरोन गला घेऊन गेले तो खर्चवेच शिवजी व चांदजी वगैरे यानी दिल्हा नाहीं व मसलतेसहि सामील जाहले नाहीं पुढें पादशहा यानी किले पुरंदर वगैरे किले हस्तगत केले ते समयीं सर्जाराव यानी पुरंदरचे कोळी व बेरड यास आणोन आपल्याजवळ ठेवून घेऊन आपले पदरी खर्चवेच देऊन किले पुरंदर हस्तगत करून साहेब चाकरी करावी म्हणोन मसलत करून सरकारची कामे काजे उमेदी धरून करावयाचा निश्चय केला आणि वतनदाराचाहि बंदोबस्त जाला पाहिजे म्हणोन महाराज राजश्री राजाराम छत्रपती स्वामी चंदीस होते मार्ग न चाले तेव्हां फकिराचे सोंग घेऊन चंदीस गेले तेथें जाऊन महाराजांची भेट घेऊन इकडील वर्तमान राज्यकांतीची निवेदन केली तों तेथंहि पुन्हा भांडणाचा प्रसंग पडिला तेव्हां कामकाज महाराजाच्या चितानुरूप केली ते समयी बक्षीस देऊ लागले तेव्हां सर्जाराव याणी विज्ञापना केली जे महालोमहालच्या देशमुखीची व देशपांडपणाची वतने अमानत आहेत त्यास महाराजानी कृपाळू होऊन वतने सोडावयाची आज्ञा करणार धणी आहेत हा अर्ज खातरेस आणून राजश्री रामचंद्रपंत अमात्य आणि राजश्री शंकराजीपंत सचीव यास महाराज यानी वतने सोडावयाविशी दुमाले पत्रें दिली व सर्जाराव यानी आपला देशमुखीचा इनामगाव व गावगनाचा हक्क लाजिमा दुमाला करावा म्हणोन दुमालेपत्र राजश्री शंकराजीपंत सचीव यास आणिली त्यास खर्चवेच चंदीचे मुकामी वगैरे दरबारखर्च पडिला तो सर्जाराव याणी देऊन पत्रें काढिली तो सर्व भावानी व चांदजी जेधे वगैरे यानी कांहीं दिला नाही सर्जाराव सर्व वतन अनभवू लागले पुढे महाराज राजश्री

छत्रपती चंदीहून आणावयाकरितां धनाजी जाधवराव व संताजी घोरपडे यांची रवानगी राजश्री रामचंद्रपंत व शंकराजीपंत सचीव यानी केली ते समयीं सर्व जमीदारा जवळून खर्चवेच घेतला तेव्हां सर्जारावाजवळूनहि घेतला तो कोणी भावाबंदानी व चांद्जी जेधा यानी दिला नाही याउपरी शंकराजी पंत सचीव सिंहगडी होते त्याजकडे चांद्जीचा पुत्र कान्होजी व तुळाजी बिन रायाजी जेधे याणी जाऊन आपली हकीकत निवेदन केली तेव्हां सर्जाराव यांचा पुत्र मताजी सर्जाराव राजश्री पंतसचीव याजबरोबर हुजूर होते व मावळप्रांतीचे देशमूख तेथेंच होते तेव्हां पंतसचीव यानी महाल व प्रांतीच्या देशमुखांस सांगितले व मताजी नाइक यास विचारिले कीं याचा खटला कैसा आहे त्यावरून मताजी नायकानी उतर केले जे आपले तीर्थरूप घरीं आहेत त्यास सर्व माहितगारी आहे त्यांजला बोलावून विचारावे म्हणजे जाबसाल करतील तों राजश्री पंतसचीव यास राजक्रांतीची मसलत पडली म्हणोन जाबसाल तैसाच राहिला त्याजवर राजश्री पंतसचीव सर्जाराव यांच्या समाचारास मौजे कारीस आले दोन दिवस मुकाम केला आणि देशपांडे-ण तर्फ भोर येथील वतन करून घेतले आणि पंत निघोन चंदनवंदनास गेले हे काहीं दिवसानंतर सर्जाराव यांचा काळ जाला मताजी नाइक देशमुखी करूं गले परंतु त्यास मीर्गीची व्यथा होती पोटी संतान नाही मग श्रीनागोबाची करू लागले त्यांचे पोटी संतान नाहीं याकरितां वतनावर आस्था नाही उदा- जाले आणि आपले निसबतीनें हणगोजी बिन पायाजी जेधे व शिवाजी गोपि- थ लोहोकरे खासनीस ऐसे येक होऊन याजला कारभार करावा म्हणोन सांगि- ले मग ( ताराउ ) आइसाहेब किले प्रतापगडचे मुकामी होती तेथें जाऊन यानी महाराज मातोश्री आइसाहेब यांस कान्होजी नाइक यांचे पत्र समजाविले आणि राजश्री शंकराजीपंत सचीव यास मताजी जेधे यांचे बाप सर्जाराव जेधे याणी देश-पांडेपणाचें वतन दिले त्याणी इनाम प्रमाण केले आहेत व शाहूमहाराज मोग-लाईत आहेत त्याच्याहि फितुरात आहेत कागदपत्र खेळत आहेत त्यामुळे आमचा भोगवटा चालू दिला नाही ऐसे समजावोन गिरजोजी यादव याजवर आईसाहेबांची एकत्यारी होती व नवलोजी सणस हे हि कान्होजी बिन चांद्जी जेधे याचे शरीर-संबंधी व कृष्णाजी गोळे व पिलाजी गोळे पद्तीसेनाधर हे हि कान्होजी जेधे यांचे शरीरसंबंधी पिलाजी गोळे याणी मौजे वेलंग येथें मनमानेशीं शेतें चार चाहूर जबरदस्तीने केली होती तेथें पाटीलकीचा गुमस्ता आमचे वडिलानी भनाजी रांजणा ठेविला होता त्यानी जमीनीमुळे कटकट केली त्याजमुळे मताजी नाइक याणी रामचंद्रपंत अमात्य यास पत्र लिहिले आहे जे पिलाजी गोळे याणी जबरदस्तीने वेलंग येथील जमीन घेतली आहे त्यास ताकीद करून आमची जमीन आम्हास देवावी मग आम्हास राजश्री पंती गोळे मजकूर यास ताकीद करून

जमीन माघारी देविली मग गोळे मजकूर याणी जमीन पांच बिघे मताजी नाईक याजपासून मागोन घेतली परंतु गोळे याने मनात डंश धरिला मग गिरजोजी यादव व नवलोजी सणस व पिलाजी गोळे या त्रिवर्गांची भीड महाराज मातोश्री आईसाहेब याजपाशी होती तेव्हां हाणगोजी व मानाजी व शिवाजीपंत खासनीस याणी त्यांस वश करून त्यांजकडून मातोश्री आइसाहेबांस समजाविले जे हाणगोजी वगैरे याचा वाटा कान्होजी नाइक याणी करून वाटणीपत्र दिले आहे त्याप्रमाणे चालत नाही त्यास मताजी नायकास सांगोन ताकीद करोन वाटणीपत्राप्रमाणें सरकार रुजू वाटणीपत्र करून करून देऊन वतनाचा भोगवटा चाले ऐसे करावे म्हणोन अर्ज केला त्यावरून मातोश्री आईसाहेब यांची आज्ञा मताजी नाइकास जाहली जे पूर्वीचे वाटणीपत्राप्रमाणे हलीं वाटणीपत्र करून देणे तेव्हां मताजी नायकानी न्याय करावा ऐसी विनंती केली परंतु मातुश्री आइसाहेबी ध्यानास न आणिता मताजी नाइक यास किले प्रतापगडास नेऊन तेथें एक महिना अटकेत ठेविले त्यास मताजी नाइक याजला आस्वलीने खादले होते त्याची जखम होती ती आटकेत ठेवल्यामुळें फुटली त्याने हैराण फार जाले आणि पोटापाण्याची आबाळ होऊ लागली हें वर्तमान राजश्री शामजी हरी सुभेदार प्रांत मावळ यास कळले मग सुभेदारानी रद्‌बद्‌ल मातुश्री आईसाहेबाकडे करोन मताजी नायकास आपल्या जवळ आणिले आणि बोलिले कीं गिरजोजी याद्‌व व पिलाजी गोळे व नवलोजी सणस हे हणगोजी नाइक याची पाठ राखतात तेथें तुमचा परिणाम कैसा लागतो तरी जैसा कागद् मागतील तैसा करून देणे मग मताजी नायकानी उतर केले कीं या प्रसंगात जैसा कागद् मागतील तैसा देणे प्राप्तच जाले त्यावरून राजश्री सुभेदार याणी हणगोजी व कान्होजी जेधे यास बोलावून आणले आणि पुसिले जे मताजी नायकाचे हालअपेष्टा काय निमित्य करविता तेव्हां ते बोलले कीं आमचा भोगवटा सर्जाराव याजपासोन वतनात चालत नाही यास्तव सरकारात फिर्याद् होऊन यास आणविले तेव्हां सुभेदार बोलिले कीं त्यात आणोन काय करिता त्यावर कान्होजी व हणगोजीने उतर केले कीं आपले आजे कान्होजी नाइक याणी वाटणीचा कागद् करून दिला आहे त्याप्रमाणे यानी करून द्यावा म्हणजे आमची समजूत पडेल त्याजवरून सुभेदार यानी वाटणीपत्र लेहोन आपली साक्ष व मावळ प्रांतीच्या देशमूख व देशपांड्यांच्या साक्षी घातल्या त्या प्रसंगामधे राजश्री संकराजीपंत गांडेकर देशपांडे यासहि साक्ष घालावी लागली मुतालिका जवळून पत्र त्याहावेसे जाले न लिहावे आणि साक्ष न घालावी तरी दरबारचा प्रसंग या रीतीचा ऐसी अडचण पाहून साक्ष घातली परंतु वाटणीपत्रात इनाम गावच्या पाटलाची इनामे व बलुत्यांची इनामे व नागोबाचे इनाम व श्रीचा नंदादीप नैवेद्य वगैरे धर्मादाय खर्च व नायकीमुळे खर्च दुसरा व हशम लोकांची इनामगाव पैकी शेतें व

कारकुनाची शेतें व खासनिसांची शेतें वेतने व इसापत गावच्या पांढरी व कान्होजी नाइक यानी आपली मून सर्जाराव यांची स्त्री तुळजावा यांचें मजरे घोरपडवाडी वगैरे साडे दहा टके इनाम ही कलमे वजा द्यावी ती दिली नाहीत व कान्होजी नायकाची धाकटी स्त्री लग्नाची येसूबाई त्याजला पुत्र संभाजी नाइक जाहला त्याचे वाटियाचे नाव नाही शिक्याचे वाटणीस नाव ठेविले नाही मौजे कारी पूर्वी शिवाजी-महाराज याणी शिक्याखाली दिली याची चोकशी मनास आणलीच नाही वाटणी धरून बाद दिली कृष्णाबाइचा पुत्र शिवजी जेधा याचे नकल जाहले असतां त्याचा वाटा काढला ऐसा अंदेशा काहीच पाहिला नाही वतनामुळे खर्च पडिले ते देविले नाहीत ऐसे वाटणीपत्र प्रांतपक्षाचे जाले मग मताजी नाइक निरोप घेऊन घरास आले त्याजवर संकराजी पंतसचीव यास मावळ प्रांतीचा जिल्हा मातोश्री आईसाहेबी सांगितला तेव्हां कान्होजी हणगोजी जेधा याने किले प्रतापगडच्या वाटणीपत्रावरून मौजे घोरपडवाडी तुळजाई आवाची ते तिसी खटला करो लागले तेव्हां पंतसचीव मुकामं किले विचित्रगडी होते त्यांजकडे तुळजाइ आवा गेली आणि पूर्वील हकीकत निवेदन केली व घोरपडवाडीचा मजकूर समजाविला ते समयीं राघो व्यंकटेश लोहकरे पंताजवळ होते वरकडहि माहितगार त्याजला दाखलादुखला पुसला त्याणी सांगितले जे कान्होजी नाइक याणी दिल्यापासोन घोरपडवाडी तुळ-जाइ आवा याजकडे चालत आली आहे हा भोगवटा मनास आणोन कान्होजी व हाणगोजी यास ताकीद केली कीं घोरपडवाडीविशी खटला न करणे आणि देशमु-खीचा मजकूर खालियाचा मनास आणावा तो पंताचा काळ जाला त्याजवर कान्होजी व हणगोजी याणी मौजे चिखलगाव यातील पाटलांची शेतें रकम टके वीस २० व आंबवडे येथील लोकांची शेतें घोलप व कोंढाळकर वगैरे यांची होती ती ते काळादुकालामुळें देशावर गेले त्यांची त्यांची शेतें रकम टके दहा १० पडली होती तीं जबरदस्तीनें केली तेव्हां लोकास कळताच परागंदा होते ते गावी येऊन द्वाही-दुराई देऊन राजश्री नारो शंकर सचीव याजकडे सरकारांत फिर्यादीस गेले मग सर-कारातूनहि लोकांची शेतें देणे ऐसी आज्ञा जाली असतां जबरदस्तीने हणगोजी व कृष्णाजी वगैरे शेते खात आले कजिया लोकांचा शेतसंबधे होतच आहे गावगनाचा हक जबरदस्तीनें मौजे वडतुंबी मौजे टिटेघर व मौजे रावडी व मौजे चिखलावडे मौजे आंबेघर व मौजे शिरवली व आंगसोळे वाडी कारीची येथील प्रतापगडच्या पत्रापासून खाऊ लागले मताजी नाइक यास घोरपडवाडीविशी हणगोजी व कान्होजी मागती खटला करूं लागले मग हें वर्तमान मताजी नाइकानी राजश्री पंतास निवेदन केले पंती चौकशी करून थोरल्या पंताच्या कारकीर्दीस चालिले त्याप्रमाणे चालविले पुढे हाणगोजी व कान्होजी यांचा जाबसाल मनास आणावा तों नागोजी बिन तुळाजी जेधा हिंगणगावकर देशमुखीविशी वाद सांगू लागला.

यामुळें हणगोजी व कान्होजी यासी थोडेबहुत वतन अनभवायास फावले परंतु खटला करीतच गेले नागोजी बिन तुळाजी याने सरकारात फिर्याद करून नागोजी सर्जाराव यास मसाला करून हुजूर नेले आणि मावळप्रांतीचे देशमुख व देशपांडे या गोतावर मनसुफी नेमून घेतली मग गोताने मनास आणोन पूर्वीच्या भोगवट्याप्रमाणे ठराव केला आणि निवाडपत्र गोताचें व नारो शंकर सचीव यानी सरकारातून निवाडपत्र करून दिले त्यास खर्चवेच पडला तो मावाबंदानी व कान्होजी व हणगोजी यानी काही दिला नाहीं व आम्हीहि काही त्याजवळ मागितला नाही हणगोजीचा लेक रामाजी व नागोजी सर्जाराव यांचा खटला होत गेला तेव्हां रामाजी याणे मौजे नाटंबी येथील बहिर्जी पाटील नाटंबा याचे वतनी शेत रकम टका दीड १॥ जबरदस्तीने घेतले सरकारात जाऊन खटल्याचे होय नव्हे करावी तों अंमलदाराचे व आपले ठीक नाही यामुळें वतनावर अधीकच नानाप्रकारचे गडधू होऊं लागले मौजे नाटंबी येथें कृष्णाजी सावंत यानें नुकान घेतले कीं बाजी सर्जाराव याने सरकारचे कागद मानिले नाहीत व मजला जेवणावरून हाती धरून उठविले ऐसे सरकारात समजाविले तेव्हां त्याच्या सांगितल्यावरून चौकशी न करिता आदावत घालविली तेथें खर्चवेच पडला तो काही भावाबंदानी व पदाजी जेधे याने दिला नाही ती संधी पाहून मौजे चिखलगाव येथें वेठीबिगारीविशी खटला करून पदाजी व नाईकजी जेधा याने आमचा खासगत भाताचा तरवा राहविला आणि मौजे मजकूरचे आमचे शेत अगदीच पाडले तेव्हां त्याकडील शेतास आम्ही खटला केला परंतु त्यानी सरकारचा शिपाई आणून शेतें पेरली मौजे वडतुंबी येथील वेठबिगार सालाबाद आम्हाकडे येते तिजला खटला करून द्वाहीदुराइ केली ऐसे कितेक प्रकारचे खटले केले व अगोदर सदाशिव घाणेकर यास मिळोन भासवीत होता आणि वेलंगकर कुलकर्णी याचा व आमचा घरठाणियाच्या जागानिमित्य वतनदारीच्या कज्या पडला ते समयी वेलंगकर कुळकर्णी सदाशिवपंत घाणेकराकडे जाऊन त्यास समजावून श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांची स्वारी गार्दीयाची घेऊन मौजे कारीस आले आणि आमचे घरदार व गाव लुटला त्यामधे मागील कागदपत्र काही फाटले व कांहीं गळाठले काही फाटके तुकडे धड सापडले याप्रमाणे जाले पदाजी बिन रामाजी जेधा याने श्रीमंत राजश्री पंतसचीव याजपाशी वतनसंबंधे फिर्याद केली सरकारातून हरदू जणापासोन कतबे घेऊन महालोमहालच्या देशमुखास व देशपांडे व गोत नेमून दिले आणि हरदू जणानी गोतास पत्रें लाविली पुन्हा पदाजी जेधा याने गोत जमा करावयास आम्हास बोलवावे तें न केले गोतात गैर हजीर ठरवावे तें न करिता राजश्री पंतसचीव यासहि समजवावे तें न समजाविता परभाराच श्रीमंत राजश्री पंतप्रधान याजकडे

फिर्याद करून गार्दी यांची स्वारी आणिली त्याजमुळें खर्च वेच पडला तेव्हां राजश्री गोविंद भट तात्या निदसुरे यांस हकीकत समजाविली त्यानी सरकारांत विनंती करून मसाला मना करून स्वारी माघारी आणविली ऐसे कितेक खटले पडत गेले सारांश पहिल्यापासोन त्यांचे व आमचे खटले पडत गेले त्याचा करिणा वडिलांनी सांगितला त्यावरून लिहिला असे आणि त्याचे दाखले मोंझे व कागदपत्र आणि भोगवटा पाहून ही तकरीर लिहिली असे शके १७१७ राक्षस नामसंवसरे मार्गशीर्ष शुद्ध ३ तृतीया

---



ले. २२९ १२ रांजे-गुजर पाटील श. १५६७ माघ कृष्ण ७

श्री ता. २८।१।१६४६ इ.

( प्रतिपच्चंद्र हा शिवाजीचा शिक्का. )

अज रख्तखाने राजेश्री सिवाजी राजे दामदौलत ज्यानिब कारकुनानि हाल व इस्तकबाल देसमुखानि व देसकुलकर्णीयानी तर्फ खेडेबारे बिदानद के सुहुरसन सीत अर्बैन अलफ बावाजी बिन भिकाजी गुजर मोकदम मौजे रांजे तर्फ मार हा मौजे मारची मोकदमी करीत असता याजपासून काही बद अमल जाला हे हकीकत हुजूर साहेबासी विदीत जाली त्यावरून बहुकुमी तलब करून साहेबी हुजूर आणून वाजपुस करिता खरे जाले याजकरिता बावाजी मा। याची वतनी मोकदमी हुजूर आमानत केली बावाजीचे हातपाय तोडून दूर केला ते वख्ती सोनजी बिन बना(जा)जी गुजर किले पुरंधर हे जनात गोत म्हणून येऊन अर्ज केला जे आपले हाती देणे बराये अर्ज खातिरेस आणून बावाजी मार याचे माथा गुन्हेगारी होन पा। तीनसे करार केले ते सोनजी मार याने देऊन बावाजीस हाती घेतले याचे पोटी संतान नाही हे कुळीचे गुजर म्हणोन साहेबी मेहेरबान होऊन मौजे रांजे ता। माची मोकदमी सोनजी बिन बजाजी गुजर याचे दुमाला करून याजपासून दिवाणात सेरणी होन पा। दोनसे करार करून घेऊन मोकदमी यास दिधली असे यास कोणी मुजाहीम न होणे असल पत्र फिराऊन भोगवटियास देणे उजूर न करणे मोर्तब सूद

रुजु सुरु निवीस

तेरीख २० माहे जिल्हेज सुरु सुद

---

ले. २४०

श. १५८९ श्रावण व. २
इ. स. १६६७ जुलै २७

( फारसी सिक्का पिंपळपानी )

छ बजानेब कारकुनानी हाल वा इस्तकबाल वा देसमुखानी पा करहाड बिद्रानद की हर्ची सुहूर सन समान सितैन अलफ दर्शविले निलकठभट बिन अमणभट अग्नीहोत्री सेकिन कसबे मजकूर हुजर माळूम केले जे आपणासी इनाम जमीन चावर वा धर्मादाउ बिा

इनाम चावर पावणा

·॥·

मोज गोवारे कासार–सिंबे खराडे

पाव ·।· ·।· ·।·

धर्मादाउ नकद वा बदल निमक वा तेल
ताळुक खाते जकात पाा माा दररोजीना रुके ८३
धर्मादाउ गावगना साड चौदा होन १४॥

कसबे करहाड होनु १
मौजे तुलसणी होनु १८
मौजे सेमिये होन ·॥·
मौजे वडिगाउ होन १
मौजे कडगाउ होन ·॥·
मौजे सासवाडी होन १
मौजे कोणेगाऊ होन ·॥·
मौजे कोरटी होन ·॥·
मौजे खराडे होन ·॥·
मौजे खोडीद होन ·॥·
मौजे दुइ होन १
मौजे कोटिये होन १
मौजे वारुजी होन ·॥· ( वारुळी ? )
मौजे वालगाउ होन ·॥·
मौजे गुडाले होन १
मौजे पाडली खुर्द होन ·॥·
मौजे गुडी होन १
मौजे गोवारे होन १
मौजे गोदी होन १

येणेप्रमाणे बरहुकूम फरमान हुमायून वा खुर्दखत मोकासाई ( वार ? ) यानी भोगवटे चालत आहे हाली पाा माा अमानत हवाले साहेबासी जाहले आहे नजर इनायेत करून खुर्दखत मराहामत होये म्हणून तरी बराये माळुमाती(सी) खातिरेसी आणून सदरहु इनाम दुबाले केले आहे भोगवटा वा तसरुफात सालबाद ताा साल गुाा चालिले प्रमाणे रुजू पाहून दुबाला कीजे हरसाला खुर्दखताचे उजूर न कीजे तालिक लिहून घेऊन असल परतून दीजे मोर्तब फारसी

रुजु

तेरीख १५ माहे सफर

---

३१-१७

ले. २४१ श्री श. १६०२ फा शु. १०
इ. स. १६८१ फेब्रु. १७

श्री
चिंतामणिच
रण शरण

श्री सकल गुणालकर्ण अखडित लक्षुमी आलकृत राजमान्ये राजश्री भानजी गोपाल देशाधिकारी व देशलखक प्रा कन्हाड वर्तमान व भावी गोसावी यांसि पोष्य मोरेश्वर पंडितराये कृतानेक नमस्कार सुा इहिदे समानीन अलफ राजाभिशेक शके ७ रौद्र नाम संवछरे फालगुण सुध दशमी ब्रस्पतीवार वेदमूर्ती सिवभट नीलकंठ भट अग्नीहोत्री वास्तव्य कन्हाड ब्राह्मण बहुत योग्य वैदिक आग्निहोत्री देखोन धर्मादाय देविले जोधले केली कोठी मापे खंडी २८ दोनी सु(!) जोवरी भट गोसावी क्षेमं असतील तोवरी प्रतिवर्शी परामर्श घेउनु सदरहुप्रमाणे आदा करणे प्रतिवर्शी नूतन पत्राचा अक्षेप न करणे प्रति लिहून घेउनू मुख्य पत्र भट गोसावी याजवली देणे रा छ ९ माहे सफर भट गोसावी याची वृती का मजकुरी चावर ३८ व नख्त होन २० होते ते कुली अमानत केले म्हणौन धर्मादाये देविले हे[1] विज्ञाप्ति मोर्तब सुभ। भवतु ।

बार सुद बार (षट्कोनी दोन ओळी)

---

ले. २४२ श्री श. १६०३ चैत्र शुा १
स. १६८१ मार्च १०

श्री सकल गुणालंकर्ण अखडित लक्षुमी आलकृत राजमान्ये राजश्री भानजी गोपाळ प्रा कन्हाड वर्तमान व भावी गोसावी यांसि पोष्य मोरेश्वर पडितराये कृता-

(श्री* नेक नमस्कार सुा इहिदे समानीन अलफ राजाभिशेक शके ७
चिंतामणिच दुर्मती नाम संवत्सरे चैत्र सुध प्रतीपदा (ब्र)स्पतीवार वेदमूर्त
रण शरण) रुद्रभट नीलकंठ भट अग्निहोत्री वास्तव्य कराड का मजकूर यासी वृ(त्ति) चावर १८ व नक्त होन पा १५ येणे प्रमाणे होते ते कुलि अमानत केले·ब्राह्मण निराश्रित देखोन धर्मादाय देविले जोधले केली·कोठीमापे मण ·॥· जोवरी भट गोसावी क्षम असतील तोवरी प्रतिवर्शी परामर्श घेउनु सदरहू प्रमाणे जोधळे मण पधरा देणे प्रतिवर्शी नूतन पत्राचा आक्षेप न करणे प्रति लेहून घेउनू मुख्य पत्र भट गोसावी याजवली देणे रा छ १४ रबिलोवल सदरहू भट गोसावी याचे इनामपैकी आदा करणे हे[1] विज्ञप्ती मोर्तब (सुभं भवतु)

बार सुद बार

---

१ हीं बालबोध अक्षरें पंडितरायांचीं असत. *लांबट वाटोळा शिक्का.

ले. २४३ श्री श. १६१७ फा शु. ४

स. १६९६ फेब्रु. २६

स्वस्तिश्री राज्याभिशक शके २२ युवा नाम संवत्सरे फालगुन शुध चतुर्थी सौम्य वासरे क्षेत्रीयकुलावतंस श्री राजाराम छत्रपती याणि राजश्री

०॰ श्री राजाराम । नरपति हर्ष निदान । मोरेश्वर सुत नीळकं । ठ मुख्य प्रधान ।

( चार ओळी बदामी शिक्का )

श्री लक्ष्मि । नृहरि प्रीतेः । मुद्रा नरािज । जन्मनाः । राजाराम प्रतिनिधेः । मल्हादस्य । विराजते । ( सात ओळींचा शिक्का )

देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी प्रांत हाय प्रा पनाला प्रांत सातारा प्रात कऱ्हाड यांसि आज्ञा केली येसी जे वेदमूर्ती कृस्णभट बिन वीस्वनाथभट अग्नहोत्री सेकीन का कऱ्हाड याचे विषयीं यांचे बंधु सिवभट बिन नीलकंठभट अग्नहोत्री याणीं चंदीचे मुकामी स्वामीसमीप येऊन विनंती केली कीं कृस्णभट यांचे बाप विस्वनाथभट यांसि शाहा इभ्रांम जगदुरू अदलशाहा पातशाहा याणीं इनामभूमी चावर व धर्मादाव गांवगंना रयेत नि करून दिल्हा बि बि

भूमी जिरा चावर ३८२० ता

| | |
|---|---|
| ।॰ मौजे पाली | ।॰ मौजे कासारसिंबे |
| ।॰ मौजे येरोले | ॰ मौजे रेटरे खुर्द |
| ।॰ मौजे करवडी | ।॰ मौजे आफलापूर |
| ।॰ मौजे आइतवाडे | ८२० मौजे निगडी |
| ।॰ मौजे गोवारें | ।॰ मौजे खराडें |
| ।॰ मौजे विंग | ।॰ मौजे दुसेरे |
| ।॰ मौजे कोले | १।२० |
| १॥। | |

धर्मादाव गांवगंना सालिना होन पा ४५

| | |
|---|---|
| १ मौजे गुंडाले | १ मौजे नागठाणे |
| १ मौजे नागझर | १ मौजे आतीत |
| १ मोजे सासपडें | १ मौंजे तारगांव |
| १ मौजे वडगा उसैद | १ मौजे गोवारें |
| १ मौजे पाली | १ मौजे सांगवड |
| १ उंबरज | १ मौजे किवल |
| १ का मसूर | १ मौजे तुलसणी |
| १ चरेगांव | १ मौजे इंदोली |

१ मौजे येणेगांव
१ मौजे आगसिंगे
१ मौजे आइतवाडे
१ मौजे येरोलें
१ मौजे कालिये
१ मौजे गारवडे
१ मौजे रेटरे बुा
१ मौजे गोंदी
·॥· मौजे कोणेगांव
·॥· मौजे कासील
·॥· मौजे वाटारखुर्द
·॥· मौजे वाटार बुा
·॥· मौजे वेनके
·॥· मौजे वालगांव
·॥· मौजे खोडद
·॥· मौजे पांचमरी
·॥· मौजे सानूर
·॥· मौजे वाघेरी
·॥· मौजे सिरगांव
·॥· मौजे कोपील
·॥· मौजे नडसी
·॥· मौजे डेखण
१ कसबे कन्हाड ( करराबाद )

२४

१ मौजे कैंढिये ( लोंढिये ? )
·॥ा· मौजे वारोजी ( वारोळी )
·॥ा· मौजे भोवर्ले
·॥ा· मौजे मारुल
·॥ा· मौजे हेलगांव
·ा· मौजे शापूर ( शाहापूर )
·॥· मौजे टेंबू
·॥· मौजे सिरटे
·॥· मौजे कोपर्डे बुा
·॥· मौज सिरंबा ( सिरवेंसाल )
·॥· मौजे विचूत
·॥· मौजे कारवें
·॥· मौजे कांसार सिबे ( सिरंबे )
·॥· मौजे पाडली
·॥· मौजे कोरटी
·॥· मौजे कडेगांव नजीक वांई
·॥· मौजे हिंगजोळे
·॥· मौजे करवडी
·॥· मौजे कवीठे
·॥· मौजे गोलेश्वर
·॥· मौजे बेलवडे
·ा· मौजे नाडोली
०~ मौजे वराडे
१ मौजे वोंड
०~ मौजे विरलें ( विरोले )

२१

खोत जकाती रोजिना तेल मिठा बद्ल खुर्दा रुके ०३ येकूण इनाम चावर जिराती तीन चावर वसि बिघे व धर्मादाव गांवगना सालिना होन पाा पंचेतालीस व खोत जकातीवरी रोजिना रुके तीन रास अदूलशाहांचे कारकीर्दीस चालत होतें अलीकडे हा देश राा कैलासवासि स्वामिस हस्तगत जालिया दिवसापासून भोगवटा हा काल पावेतों चालत नाही विस्वनाथभट रामार्पण जाले सांप्रत त्यांचे पुत्र रुस्णभट वर्तमान आहेत त्यांचा योगक्षम चालावयास काही उपजीवका नाहीं तरी याच्या बापाचा इनाम व धर्मादाव सदृरहूप्रमाणें यांसि चालवावया आज्ञा केली

असोन स्नानसंध्यादिक श्रौतस्मार्त कर्मानुस्ठान आचरोन श्रौत पुनराधान करून स्वामीस व स्वामिच्या राज्यास कल्याणाभिवृधी चिंतून सुखरूप असतील म्हणोन विदीत केलें त्याजवरून कृश्णभट ब्राह्मण थोर. येसे जाणोन सदरहुप्रमाणें इनाम गांवगंना जिरात चावर ३८२० तीन चावर वीस बिघे व धर्मादाव गांवगंना सालिना होन पा। ४५ पंचेतालीस व खोत जकातीवरी तेल मिठाबदल दरोज ८३ येणेप्रमाणे दिल्हें असे तरी इनाम भूमी कुलबाब कुलकानु खेरीज हाकदार करून भूमी विसा पांडाच्या बिघियानें व धर्मादाव येसें पूर्वी अदलशाहाचे कारकीर्दीचा भोगवटा व फर्मान मनास आणून तेणेंप्रमाणें यांचे स्वाधीन करणें आणि यांसि व यांचे पुत्रपौत्रादि वंषपरंपरेने चालवणे प्रतिवर्षी नवीन पत्राचि अपेक्षा न करणें या पत्राची प्रति लिहून घेऊन मुख्यपत्र वेदमूर्तीस परतोन देणे निदे[१]शसमक्ष मोर्तब ( मर्या । देयंविरा । जते । तीन ओळी. )

रुजु

पे छ २३ सौवाल

तेरिख २ माहे साबान

साबान सु॥ सीत तिसैन

बार सुद खुर सुद बार

---

ले. २४४ श्री *शंकरवरद

श. १६१९ फाल्गुन शु० २

ता. २।२।१६९८ इ.

ता॥

अज सर सुभा राजेश्री भानजी गोपाल सरसुभेदार कारकून सुभा प्रान कऱ्हाड ता मोकदमानी देहाये प्रा॥ कऱ्हाड

प्रा॥ कराड———कसबा मारुल ता॥ मजकूर

१

वाहागाऊ कारवे कादील चिचेगाऊ

१ १ १ १

सुहुर सन समान तिसैन अलफ महाराज राजेश्री———छेत्रपती स्वामिचे आज्ञापत्र छ २६ रबिलाखर सनद रास पौ छ २२ रजब साल मजकूर तेथे आज्ञा केली जे वेदमूर्ती रा। नीलकंठ भट याचे पुत्र सिवभट गोत्र शंख आश्वलायेन सूत्र अग्निहोत्री वास्तव्ये स्थल कसबे कराड यानी चंदीचे मुकामी स्वामिसमीप

---

१ निदेशसमक्ष हीं अक्षरें वेगळे वळणाचीं असत. * अक्षर वेगळें.

येऊन श्रुत केले की आपणास आदलशहाचे कारकीर्दीस कराड प्राती गावगना इनाम होता जमीन चावर १॥७॥ दीड चावर साडे सात बिघे येणेप्रो चालत होता येसीयासी हा देस राजेश्री कैलासवासी स्वामीस हास्तगत हा देस जाहाला यावरी इनाम व धर्मादाऊ आमानत करून धान्याची मोईन करून दिली होती त्याप्रमाणे धान्ये चालत होते त्याउपरी देश उद्वस जाला याकरिता स्थल साडून पंढरपुरास गेले होते सांप्रत देशात धामधुम आहे याकरिता धान्येहि पावत नाही तरी पूर्वे प्रकारे इनाम देविलियाने स्थानसध्यादिक शत्कर्मे आचरोन आग्नीहोत्र करून श्री कृष्णातीरी कराड क्षेत्री स्वामीस व स्वामीच्या राजेयास व कुटुंबसहवर्तमान कलयाण चिंतून सुखरूप आसोन म्हणून विदित केले त्यावरून ब्राह्मण भले योग्ये सत्पात्र जाणोन धान्ये पूर्वील याज्योची मोईन आसेल ते दूर करून हाली नूतन इनाम प्रात मजकूर पौ गावगना सदरहू प्रमाणे देविली आसे बिा

·॥· मौजे म्हागाऊ

·॥· मौजे कारवे

·।· मौजे कादिल

·।· मौजे मारुल

८७॥· मौजे चचेगाऊ

१॥७॥·

येकून जमीन दीड चावर साडे सात बिघे रास करार करून दिला आसे वेदमूर्तीचे दुमाला करणे म्हणून आज्ञा: आज्ञेप्रमाणे सदरहू दीड चावर साडे सात बिघे रास जमीन पडपौ देविली आसे मौजे मजकूरी सालाबाद ठिकाणे इनामतीची आसतील त्यापौ सदरहू जमीन नेमून दुमाला करणे कीर्द करून उपभोग करितील इनाम यास व याचे पुत्रादिक वौशपरपरेने चालवीत जाणे प्रतिवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणे आसल पत्राची तालिक लेहोन घेऊन मुख्ये पत्र वेदमूर्तीजवल भोगवटीयास परतून देणे जाणिजे छ ३० रजब मोर्तब सुद

---

ले. २४५

श. १६२१ श्रावण वद्य २

ता. २ आगष्ट १६९९ स.

( फारसी शिक्का बदामी )

( फारसी आठ ओळी मजकूर )

आमिलानि देसमुखानि व देसपाडियानी हाल व इस्तकबाल पा कराडाबाद सरकार रायेबाग सुभे दारुलजफर विजापूर सुा सन हजार ११११ मालुम बाजद

आकी कृष्णभट वलद विश्वनाथभट आग्नोत्री जुनारदार सो का मजकूर हुजूर येउन जाहीर केले की पा मजकुरी आपला इनाम व धर्मादाव वगैरे पुस्त दरपुस्त चालत आहे इदलशाही फर्मान व सीवाजी भोसले व मोकासी वगैरे याच्या सनद असनाद कुली जाहीर केल्या त्यावरून मेहरबान होऊन बदस्तूर साबिक देविले आहे बिा

सो ८ जकाती रोजिना तेल मिठाबदल रुके ८३

येकून जिराा जमीन चावर तीन चावर वीस बिघे व धर्मादाव गावगना सालिना होन पा पचेचालीस व सो जकाती दररोजिना रुके ८३ येणेप्रमाणे सालाबाद चालत आले आहे दरम्याने मुलक वैराग्य पडिला होता हाली साहेब मेहरबान होऊन दुवागीर आग्नोत्री मजकुरासी सदरहुप्रा दुमाले केले आहे याचे दुमाले कीजे हरदरसाला ताजा सुर्द खताचे उजूर न कीजे तालिक लेहून घेऊन आसल परतोन दीजे मोर्तब

तेरीख १५ माहे सफर

---

ले. २४६ श्री श. १६५० भाद्र. शु. ३
स. १७२८ आगष्ट २६

श्री आंई आदी पु। रुष श्री राजा शाहुछ। त्रपति स्वामी कृपानीधी।
तस्य श्री नीवास परशु। राम प्रतिनीधी। (पांच ओळींचा शिक्का.)

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री श्रीनिवास परशुराम पंडीत प्रतिनिधी तां मोकदमानी देहाय प्रांत कराड सुहूरसन तिसा अशरिन मया अलफ वेदमूर्ती रा कृष्णभट बिन विश्वनाथभट आग्नहोत्री वा कसबे कराड यानी हुजूर किले सातारियाचे मुकामी येउन विनंती केली कीं आपण कराटक क्षेत्रीचे पुरातन आग्नहोत्री त्यास आग्नहोत्रचे संस्थे बदल गावगना इनाम भूमी व नक्त धर्मादाउ मोईन करून दिल्ही तेणेप्रमाणे चालत आले होते त्याउपरी चंदीचे मुकामी महाराज राजश्री राजारामसाहेब याकडे जाऊन सदरहूप्रमाणे करीना विदीत करून वृतिपत्रें आणिली आहेत त्याप्रमाणे करार करून इनाम भूमी व नक्त मोइन आहे त्याप्रमाणे चालविलीया श्रीकृष्णातिरी स्नानसंध्यादिक शटकर्मे आचरोन आग्नहोत्र संभाळून राजश्री——स्वामीस व राज्यास कल्याण चिंतून राहों म्हणून विनती केली त्यावरून मनास आणितां ब्राह्मण बहुत थोर भले विद्वांन सुसील आणि याचा धर्मादायाचा भोगवटा पुरातन आहे

---

मोर्तब व तेरीख हीं अक्षरें वेगळे वळणाचीं असत.

दुसरी गोष्ट चंदीचे मुक्कामीची पत्रें होती तीही निवेदन केली त्यावरून मनास आणितां ब्राह्मणाचे आग्नहोत्राची संस्था जालिया राज्याभिवृधी आहे यैसे जाणून यावरी कृपाळू होऊन पेशजीचा धर्मादाऊ बितपशील

नक होन ५० पनास

( ह्यापुढें ले. २४३ प्रमाणें ४५ होनांची बेरीज गांवांसह दिली आहे. अधिक ५ होन पुढील प्रमाणें आहेत. )

| | |
|---|---|
| १ मौजे सुपने | |
| १ मौजे चिखली | २ देशमुखाचे हकापैकी |
| १ मौजे सवादे | २ |
| ३ | |

होन ५० पनास

इनाम भूमी चावर ४॥२७॥

| का॥ | का॥ |
|---|---|
| ०।० मौजे पाली | ०।० मौजे कासार सिर्वे |
| ०।० मौजे येराले | ०।० मौजे रेटरे खुर्द |
| ०।० मौजे करवड | ०।० मौजे सौदापूर |
| ०।० मौजे यैतवडे | ८२० मौजे निगडी |
| ०।० मौजे गोवारे | ०।० मौजे खराडे |
| ०।० मौजे विंग | ०।० मौजे दुसेरे |
| ०।० मौजे काले | ०।० मौजे कापील |
| ०॥० मौजे वाघगाउ | ८७॥ मौजे चचेगाउ |
| ०॥० मौजे कारवे | ०।० तपे मारुलपैकी |
| ०।० मौजे सिवडे | १॥२७॥ |
| ३ | |

जमीन ४॥२७॥

जकात पैकी मिठास दररोज तीन रुके ८३

येकूण पनास होन नक व पावणेपाच चावर साडेसत्तावीस बिघे जमीन व जकात पैकी तीन रुके येणे प्रमाणे वर्षासन पुरातन चालत आहे त्याप्रमाणे हाली करार केले असे तरी तुम्ही सदरहू मोइनप्रमाणे नक व इनाम जमीन नेमून देऊन भट गोसावी याचे स्वाधीन करून पुत्रपौत्रादी वंशपरंपरेने प्रतिवर्षी भट गोसावी यास पावीत जाणे भट गोसावी उपभोग करून राज्यास कल्याण चिंतन सुखरूप राहातील

या पत्राची प्रती लेहून घेऊन थलपत्र भोगवटियास परतून देणे प्रतिवर्सी नवीन पत्राचा आक्षेप न करणे छ १ सफर निदेशसमक्ष मोर्तब ( राजते। लेखना। वधि। )

( बदामी शिक्का )

---

ले. २४१ श्री श. १६५० श्रावण व. ३०

इ. स. १७२८ आगष्ट २४

राजश्री देशमूख व देशपांडे पा। कराड गोसावी यांसि

छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो। श्रीनिवास परशराम प्रतिनिधी आशीर्वाद व नमस्कार सुहूरसन तिसा अशरिन मया व अलफ वेदमूर्ती कृष्णभट बिन विस्वनाथभट अग्नहोत्री वा। कसबा कराड थानी हुजूर साताराचे मुकामी येऊन विनंती केली कीं आपण कराटक क्षेत्रीचे पुरातन अग्नहोत्री त्यास अग्नहोत्राचे स्वहस्तेबदल ( स्वास्थ्य ) गावगना इनाम भूमी व नख्त धर्मादाव मोईन करून दिल्ही तेणेप्रमाणे चालत आहे त्याउपरी चंदीचे मुकामी महाराज राजश्री राजारामसाहेब याकडे जाऊन सदरहूप्रमाणे करिना विदीत करून वृतिपत्रे आणिली आहेत त्याप्रमाणे करार करून इनामभूमी व नक्त मोईन आहे त्याप्रमाणे चालविल्या श्री कृष्णातीरी स्नानसंध्यादि शटकर्मे आचरोन आग्नहोत्र संपादून राजश्री स्वामीस व राज्यास कल्याण चिंतोन राहोन म्हणोन विदित केले कीं त्यावरून मनास आणिता ब्राह्मण बहुत थोर भले विद्वान सुशील आणि याच्या धर्मादायाचा भोगवटा पुरातन आहे दुसरी गोष्टी चंदीचे मुकामीची पत्रें होती तीहि निवेदन केली त्यावरून मनास आणून अग्नहोत्राची संवस्था जालिया राज्याभिवृधी आहे असे जाणोन यावरी कृपाळू होऊन पेसजीचा धर्मादाउ बिा।

नख्त होन ५० पनास ( पुढें ले. २४६ प्रों गावांचीं नांवें ) येकूण पंनास होन व भूमी पावणेपाच चावर साडेसत्तावीस बिघे जमीन व जकात पैकी तीन रुके येणे प्रमाणे वर्षासन पुरातन चालत आहे त्याप्रमाणे हली करार केले असे तरी तुम्ही सदरहू मोईनप्रमाणे नक्त व इनाम जमीन नेमून देऊन भट गोसावी याचे स्वाधीन करून पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने प्रतिवर्शी भट गोसावी यासी पाववीत जाणे भट गोसावी उभभोग करून राज्यास कल्याण चिंतून सुखरूप राहतील या पत्राची प्रति लेहून घेऊन असल पत्र भोगवटियास फिराऊन देणे प्रतिवर्षी नवीन पत्राचा अक्षेप न करणे जाणिजे छ २९ मोहरम निदेश समक्ष मोर्तब ( राजते । लेखना । वधि )

( श्रीनिवास प्रतिनिधी यांचा शिक्का. )

---

१ " निदेश समक्ष " हीं अक्षरें वेगळें वळणाचीं असत.

ले. २४८ श्री श. १६५० भाद्रपद शु. ४
स. १७२८ आगष्ट २७

राजश्री देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी प्रांत कराड गोसावि यांस छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य सेवक श्रीनिवास परशराम प्रतिनिधी नमस्कार सूर सन तिसा अशरिन मया अलफ वेदमूर्ती राा कृष्णभट बिन विश्वनाथभट अग्निहोत्री वास्तव्य कसबे मजकूर यानी हुजूर किले सातारियाचे मुकामी येऊन विनंती केली जे पूर्वी प्रांत मजकुरी आपले अग्नीहोत्राचे बेगमीबद्दल गावगना इनामभूमी व नक्त दरगावास होन प्रताप यैसे नेमून देउन चालविले काही दिवस धामधुमेच्या प्रसंगाकरिता पावत नव्हते त्याउपरी आपण चंदीचे मुकामी महाराज राजश्री राजाराम कैलासवासी याचे कारकीर्दीस जाऊन अवघे वृत निवेदून करून तेथून धर्मादायाची पत्रें आणिली त्याप्रमाणे चालत होते आलाकडे तांबाची धामधूम जाली कराडी ठाणें मोगलाचे आले याजमुळे धर्मादाउ चालत नव्हता अशास आपण ब्राह्मण अनुसन अग्नहोत्र चालिले पाहिजे याजकरितां स्वामींनी कृपाळू होऊन पेशजीप्रमाणे धर्मादायाची वृत करार करून देविलियां श्रीकृष्णातिरी स्नानसंध्यादि षटकर्मे आचारोन राज्यास कल्याण चिंतून राहों म्हणून विनती केली त्यावरून मनास आणिता हे ब्राह्मण बहुत थोर अग्नहोत्री आणि याची धर्मादायाची वृत पुरातन चालत आली आहे चंदीचे मुकामीची पत्रें होती तीहि आणून निवेदन केली त्यावरून कृपाळू होऊन याची वृत पेशजीप्रमाणे करार केली असे तिा धर्मादाउ होन गांवगना ५० ( गावांची नावें व इनामजमीनींचे गावाची नावे ) येकूण पंनास होन व पावणेपाच चावर साडेसत्तावीस बिघे जमीन जकात पैकी यैन ती रुका येणेप्रमाणे वर्षासन आहे त्याप्रमाणें करार करून आज्ञापत्र सादर केले तरी तुम्ही गावगना ताकीद करून सदरहूप्रमाणे वर्षासन नक्त व इनाम भूमी नेमून देउन भट गोसावी याचे पुत्रपौत्रादि वशपरंपरेने चालवीत जाणे प्रतिवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणे या पत्राची प्रती लेहून घेऊन असल पत्र भोगवटियास परतून देणे छ २ सफर निदेर्शे[1] समक्ष मोर्तब ( राजते । लेखना । वधि । ).

( श्रीनिवास परशुराम प्रतिनिधी यांचा शिक्का. )

---

ले. २४९ १४ पानवाहाळ- कोंढाळकर श. १५४० फाा शु. ९
ता. १२।२।१६१९ इ.

अजरख्तखाने खुदायेवंद मलिक शर्क मलिक अंबर खुली दौलत हू बजानेब कारकुनानी तपे रोहिडा मिदानंद सुाा तिसा आसर आलफ हेजीब कान्होजी जेथे

1 " निदेश समक्ष " हीं वेगळ्या वळणाचीं अक्षरें असत.

देशमूख याणे मालूम केले जे पोसजी फरजद आर्जोजी कोढलकर हा आमचे उपयोगी फार लढाइचे प्रसगी आला व मौजे पानवाहाल तर्फ भोर यथील पाटील याजकडे इनाम मो आर्जा पा व राघो पाटील वगैर याजकडे रकम टके दोन चालत आहे त्यापा पोसजीकडे टका ·॥· इनामापा व गावदेवटका ·॥· पासोडी पो हिसा व मानपान लग्नटका व पाटदाम व वणम्हैस व घरपाल व जकातपाल –घटवात[1] व दिवाळीचा बइल व होळीस पोळी व मानाची सवासीण व *शेसन चा निवद व फळकुटे—येणेप्रमाणे चालत आले सालगुदस्त सन समान साली कारकुनी इस्कील केली साहेबी हाक मऱ्हामती फर्माऊन खुर्दखत मरहामती होये म्हणून मालूम केले जे सालाबाद गहदम भोगवटा तसुरफाती कारकीर्दी दर कारकीर्दी तनखा सन समान चालिले आले आसेल तेणेप्रमाणे चालवणे तनखा देऊन आसल भोगवटियास पोसजी फरजद आर्जोजी व राघोजी कोढाळकर पा मौजे मजकूर याजपासी फिराऊन दीजे ज्याचे फरजदाचे फरजद कोने रीती सन समान चालविले आले आशेल तेप्रमाणे चालवणे मोर्तब सुद मोर्तब आसे

रुजु सुरू
निवीस

तारीख ७ रबिलावल माहे रबिलावल
सुरु सुद

---

## १५ गुंजणमावळ- सिलिंबकर देशमूख

ले. २५० श्री श. १५५० चैत्र वद्य २
ता. १० एप्रील १६२८

नकल

पारसी लिहिले आसे
पारसी सिके दोन

छ कौलनामे आज दिवाण मामले बेदर पे मुा मुस्तफाबाद ताहीर यात्फ बो हैबतराव व बालाजी देसाई तपे गुजणमावल सुा समान ईसरीन आलफ कारणे दिल्हा कौलनामा येसा जे तुमचे बाबे मोकदम इमसाल सुज्याआत आपबा प्रतापराव रायाराव मालुम केले तमाम आहावल मालूम जाहाले तरी तुम्ही आपले घोडे राउत व हासम घेऊन हुजूर येईजे हुजूर आलेवरी तुमचे सरफराजी आसे व तुमचे रोजमाराचेहि फितुर ! ( फिकीर ) बरवे करु तुम्ही खातिर सुद जमा करुनु येई जे कोण्हे बाबे आदेसा न कीजे कौल आसे मोर्तब तेरीख छ १५ माहे साबान शके १५

---

१ हा मजकूर पोसजोकडे ह्या ओळीखालीं मध्येंच लिहिला आहे. अक्षरास ओळ नाहीं. * सिंहासन. २ श. १५३९

लें. २५१

श. १५५३ श्रावण शु॥ ६
ता. २४।७।१६३१ इ.

छ इजतमाब ह बा जि हैबतराऊ व फर्जंद बाबाजी हैबतराऊ व बालाजी नाईक देसमूख ता॥ गुजनमावल पा॥ मुरंब(देऊ) अजी फतेखान सलाम सु॥ इसने सलासैन अलफ अर्दास छ + सफर रा॥ छ ४ जिल्हेज तेथे मजमु कमीना नजीक जमीन आहे किले कोढणा खाले राहोनु गनिमासी लडाई ( करावया लो-) काचे हकाची सरजामी केली पाहिजे म्हणौनु बयाजवार (लि)हिलें तरी तु दौलत-ख्वाह आहेस आपला खातीरजमा करून जमियेतीसी किले मा॥ खाले राहोनु हवालदाराचे इत पा + + + ती सरजाम कीजे तुमचा मुदा म सरजामीचा हवालदारास मालूम करणे जे + + + ती तेणेप्रमाणे फ + सरफरा॥जि + डल दौलतख्वाहिस तकसी(र न) कीजे मोर्तब

रा॥ छ ४ मोहरम

( फारसी शिक्का अष्ट कोनी )

---

ले. २५२

श. १५९० वैशाख शु० ४
ता. ५।४।१६६८ इ.

॥छ मसुरल अनाम राजमान्य राजेश्री हैबतराऊ व + नाईक सिलिंबकर देसमूख तपे गुजणमावल गो(सावी प्र)ती रुस्तमजी भास्कर सुभेदार व कारकून माहालानिहाये तर्फ मावले सु॥ समान सीतैन अलफ तु(म्ही) कागद पाठविला तो पावोन समाधान जालें कितेक + (घ)रोबियाचें वर्तमान लिहिलें त्यावरून [१]के कलों आलें तरी आम्हास तुम्ही अवशकच आहा तुमच्या कार्यास आम्हापासून सहसा अंतर पडणार नाहीं तरी (तुम्ही) मुतालिक पाठऊन देऊन म्हणोन लिहिले तरी ये (गो)ष्टीचा विचार तों बहुतच बरा आहे तुम्ही कोण्हे (गो)ष्टीचा अनमान न करितां मुतालिक पाठऊन दे(णे) तुमचें जें संन [२]सबौकार्णे चालिले आहे तेणे-प्रमाणें चालऊन त्यास अंतर पडणार नाही तुम्ही कोण्हे गोष्टीचा अनमान न करितां मुतालिक पाठऊन देणें पुढें तुमचे विशई राजेश्री साहेबी विनती करून कौल देऊन तोंपरियेंत मुतालिक येतां बरी गोष्टी आहे ये गोष्टीनें परस्परे निस्टुर-पण तुटोन समाधानें समाधान होईल + धें तुम्ही शाहाणे आहा तुम्ही मुतालिक पाठवणे तो वैशामधें पाठवणें कीं अजी कीर्दीचा हंगाम आहे आणि कीर्दीचा हंगाम निघोन गेला + ती तुम्ही जरी ( तयारी + + आ ने ) ये (मा) + + त्या मावलास जाणे तेणेकरून तुमच्या माथा + लित स्थापतें तरी जो रयेतीचे

---

१ क दोनदां पडला आहे. २ श. १५४८-४९.

कीर्दीचे दिव(स) आहेत तों तुमचे मुतालिक येतां हरयेक गोष्टीचे समाधान राहातें मग समाधानाचा वि(चार) घडोन येत नाही याकरितां कोण्हे गोष्टीची जमान न करितां मुतालिक सत्वर पाठऊ देणें + जमान न करणे छ. ३ जिल्‍हाद् मोर्तब सुद मोर्त । बसु । द । ( तीन ओळी )

श्री । चर । णीतत्पर कि । कर कृष्णा । जिभास्कर ।

( असा पांच ओळींचा शिक्का. )

---

ले. २५३ श्री श. १५९३
इ. १६७१

( प्रतिपच्चंद्र हा शिवाजीचा शिक्का. )

कौलनामा अजरख्तखाने राजश्री शिवाजी राजे साहेब दामदौलतहु ता॥ मशहुरल अनाम हैबतराऊ सीलंबकर देसमूख ता॥ गुजनमावल शुहुर सन इसने सबैन अलफ दादे कौलनामा यैसा जे तुम्ही पेश अर्जी साहेबासी रुजूवातीने

श्रीशिवन इमाने चाकरी करीत होतेस साहेबांची मेहरबानी तुम्हावरी
रपति हर्ष होती यैसियासि पदाजी यशवंतराऊ सिवतरकर याणे
निदान महा कितीयेक बेसंगपणाची वर्तणूक केली याबदल साहेबी
देव प्रतिम त्यावरी निकर करून डोले काढून गडावरी अदबखाना
त प्रधान घातले दादाजीचे लेक तुमच्या घरास गेले म्हणून बहिरा

सिवदेव याणें नादानगी करून तुमच्या घरास दाहा वीस प्यादे पाठविले त्यावरून तुम्ही शक धरून बाहीर गेलेसी ते आजीवरी बाहीर आहा यैसीयासी हाली तुमचे भाऊ संभाजी येउनु मालुम केले की हैबतराव यास साहेबी कौल मरहमत केलिया साहेबांचे पायांपासी हाजीर होईल म्हणून बराये मालुमाती खातीरेस आणून तुम्हांस कौल मरहमत केला आसे आजीतागायेत जो काये गुन्हा तुम्हांपासूनु जाहाला असेली तो तमाम माफ केला असे तुम्ही कोण्हे बाबे शक व अंदेशा न करितां खातिर जमा करून बेशक होउनु येणें साहेबांची भेटी घेणें तुमच्या जिवास खता होणार नाही ये बाबे श्री—ची व मातुश्री साहेबांची आण असे व श्री—वरील बेल व श्री—खंडाची भाक व रोटी व माल यैसे पाठविलें असे ते घेणें व तुम्ही येथें आलियावरी तुमची देसमुखी पहिलेपासून वडिलपण चालत आलें आहे तेणेप्रमाणे व हमसाई दाहा देसमुखाचे वतनाचे तह देउनु तेणेप्रमाणें तुमचाहि तह करून तुमचे चालउनु ये बाबे कौल असे मर्या । देयंविरा । जते ।

सुरु सुद । ( तीन ओळीचा शिक्का. )

---

दा व बा ह्यांत स्पष्ट व ठळक भेद दिसत येतो. सबब वर 'दादे', 'दादाजी' असेंच कायम केलें आहे.

ले. २५४ श. १५९४ फा शु. १४

ता. २०।२।१६७३ इ.

बजानेब कारकुनानी ता। गुजनमावल चिद्‌नद सलास सबैन आलफ मा।
श्रीशिवन हैबतराऊ सिलांबकर देसमुख ता। मजकूर हे सन समा-
रपति हर्ष (नाम)धे शक धरुनु बाहीर पडिले होते ते कौल घेउनु
निदान महा हुजूर साहेबांस भेटले साहेब यांवरी मेहरवान होउनु या-
देव मतिम ( चे दे ) समुखांचे वतन याचे दुमाला केले आसे तरी
त प्रधान यांचा देसमुखीचा कारबार यांच्या हाते घेणे व देसमुखास
द्यावयाची मोईन ता। मजकूर ता। सालगु। चालत आली आहे त्यापैकी मा। ची
तकसीम मा।इलेचे दुमाले करणे खेरीज मा।इलेस साहेब मेहेरवान मौजे बो(पे)
देह १ यक कुलबाब कुलकानु सारा गाव साल दर साल द्यावयाचा तह केला
आहे तरी पेस्तर साल सन अर्बा सबैनापासुनु मौजे बोपे ता। मजकूर देह १ येक
साल दर साल दुमाला करीत जाणे या गावावरी + ( भाऊबंद ) मा।इलेचे त्यांसी
समध नाही हे गाऊ मा।इलेसच दिल्हे आसे दुमाले करणे तालिक लेहोन घेउनु
असल सनद मा।इलेपासी देणे पा। हुजूर पा। राजश्री-पंत* पेशवे छ १२ जिलकाद
मोर्तब*सुद मर्या । देयंविग । जते । ( तीन ओळी )

बार सु।

सुरु सुद

---

ले. २५५ श. १५९४ फाल्गुन शु. १४

ता. २०।२।१६७३ इ.

बजानेब कारकुनानी ता। गुजनमावल चिद्‌नद सु। सलास सबैन आलफ
श्रीशिवन मा। हैबतराऊ सिलांबकर देसमुख ता। मजकूर हे शक धरुनु सन
रपतिहर्ष समानामधे बाहिर पडले होते ते कौल घेउनु हुजूर येउनु साहेबांस
निदान महा भेटले यावरी साहेब मेहेरवान होउनु बदल बकसीस दर सालास
देव मतिम सुर्दा टके १०००८ येक हजार टके द्यावयाची मोईन केली
त प्रधान आहे तरी मा।इले जोवरी हयात असतील तोवरी ता। मजकूर
पैकीं पेस्तर साल सन अर्बा सबैनापासून दर सालास टके १०००८ येक हजार
टके रास आदा करीत जाणे सदरहू बेरीज साल दरसाल अदा करीत जाणे

---

* अक्षर वेगळें. १ श. १५९५.

तालीक लेहोनु घेउनु असल सनद माा इलेपासी देणे पाा हुजूर राा पंत * पेशवं छ १२ जिलकाद *मोर्तब सुद मर्या । देयंविरा । जते । ( तीन ओळी )

सुरु सुद

---

ले. २५६ श. १५९४ फाल्गुन शु. १४

ता २०।२।१६७३ इ.

बजानेब कारकुनानीं ताा गुजनमावल ।बिद्रानद सुाा सलास सबैन अलफ

श्रीशिवन माा हैबतराऊ (सिलांब)कर देसमूख ताा माा + + + +

रपतिहर्ष + + + हे बाहीर पडिले होते ते कौल + + + घेउनु भेटले

निद्रान महा यासि गला खावयास पाहिजे तरी साल मजकुराकारणे +

देव मतिम मजकूरपैकी गला खडी दाहा पधरा खडी पावेतो माा इलेस

तप्रधान देणे + + स यक हजार टके द्यावयाची मोईन केली आहे

त्यामधें साल मजकुरी जो गला पावेल त्याचे नख्त माहालीच्या सिरस्तियाप्रमाणें हजारां टकियांत वजा करुनु + (कु)ली बेरीज पेस्तर साली आदा करणे अणी गला सदरहू प्रमाणे याच्या किबलियासि देणे छ ( १२ ) जिलकाद मोर्तब* सुद

मर्या । देयंविरा । जते ।

( तीन ओळींचा मोर्तब. )

पैवस्ती छ १७ मिनहू

सुरु सुद

---

ले. २५७ शके १६२५ पौष शुद्ध २

ता. २८ डिसेंबर १७०३ इ.

राजमान्य राजश्री हैबतराऊ देशमुख ताा गुजणमावळ यासि

॥श्री अखंडित लक्ष्मी अलंकृत + श्नेहांकित हिरोजी अताजीराऊ + + सुहूर सन अर्बा + + आलफ तुम्ही पत्र पाठविलेन तेथे लिहिलेत की आम्हास राहावयासि व लोकाचे कबिले ठेवावयासि कोठे जागा दिसत नाही याकरिता बहुतच कस्ट पडिले आहे याकरिता आज्ञा जर होईल तर सिवतरात राहून कबिले ठेऊन ये गोस्टीच काये आज्ञा मणोन लिहिल तर पातशाही फौजा चालिल्या आसेत आणि तुम्हास आम्ही हरकोठे राहावयासि आज्ञा करावी तर हे विहित नव्हे तर तुम्ही खानसाहेबास अर्जदास्त लिहिणे व यक आपला भला माणूस

---

+ अक्षर वेगळें.

पाठवणे त्यास आधी राजपुरीस रवाना करून मग जो काये हुकूम होईल त्यासारिखे तुम्हास कलो येईल कलले पाहिजे व गुणाजी राऊ खोपड्याचे वर्तमान लिहिले तर त्यास आम्ही जेव्हां वरत दिल्हे होते आणि सागितले की तुम्ही कबिला ठेऊन येणे मग जे ठिकाणास खानसाहेब राहावयासि सागतील तेथे राहाणे त्याची सर्फराजीच होती त्यास त्याही तर बेइमानपण करून आले नाही तर आता आम्हास लिहिणे सरकार नेसते बेइमानच (!) आहेत त्याचे मनमाने तिकडे जाऊत यानतर राणा इमानी हे कोठे असेन त्याचे वतनाचे कागद आम्हाजवल असेत तर पाठवावे येसे आहे तर कोण जागा पाठवावे ते लिहिणे म्हणोन लिहिलेत तर ती आम्हाजवलच असेत त्याचा मामला ( मोठा ) जाला याकरिता तुम्ही मामले सकतसीरीने त्याजवळून कागद तुम्ही घेतलेत असा तर तो कागद आम्हाजवल पाठवणे आम्ही त्यास देऊन कलले पाहिजे बहुत काये लिहिणे • रा छ ३० साबान हे विनती सन ४७

फारसी सिका व मोर्तब

---

ले. २५८ श्री श. १६२६ मार्गशीर्ष शु. १५
ता. २१।११।१७५४ इ.

•॥ छ॰ मा॥ अनाम दौलतराव व कृष्णराव बिन शंकरराव व सुभानराव बिन श्री चंद्रराव सिलिमकर देशमुख ता॥ गुंजणमावळ यासि चिमणाजी शंकराजी नारायेण सचीव सु॥ खमस खमसेन मया आलफ तुमचा व भगनारायण वंतराव बिन महिपतराव सिलिमकर यांचा कजिया देशमुखीच्या वतनाचा वाटियाचा जाला याजबदल हर दोजण भाडत हुजुर कसबे भोरच्या मुकामास येऊन आपापलें वर्तमान विदित केले त्यावरून तुमचा हर दोजणाचा करिना मनास आणिता तुमचे पणजे हैबतराव यांस श्रीमंत माहाराज राजश्री संभाजी राजे छत्रपती स्वामी यांणि रायेगडी आसतां हुजूर बोलाविले सबब कीं तास्रास मिळाले त्यांची हगोली कबूल करून त्यांस रायेगडास आणावे येसे वर्तमान आहे त्याची तहकिकात कैसी म्हणून विचारिलें त्यास हैबतराव सिलिमकर याणी महाराजापासी क्रियाशफथ केली त्यावरून महाराज छेत्रपती स्वामीनी हैबतरायांसी आज्ञा केली जे येक वडील पुत्र तुमच्या पुत्रांत असेल तो वोलेस ठेवणे येसी आज्ञा केली यावरी आज्ञा मान्य करून बा॥ हुजरे घेऊन घरास आले महिपतराव व भगवंतराव सिलिमकर याचे बाप त्यांस वोलेस रायगडास पाठवीत होते अतिशये दोन च्यार वेळला केला परंतु कबूल करिनात मग तुमचे आजे चंद्रराव सिलिमकर यास पाठविले ते रायेगडास गेले आपण पळोन मोगलाईत चालिले तेव्हां चंद्रराव याची मातुश्री जिजावा हैबतराव यास बोलिली कीं माझा लेक चांदोबा रायेगडास

पाठविला आणि तुम्हीं मोगलाईंत जातां तरी आपण तुम्हाबा। येत नाही आपल्या पुत्राकडे जाते म्हणून अतिशय केला तेव्हां हैवतराव सिलिमकर म्हणाले कीं चांदो-बास आणावयास माणूस पाठविले आहे तरी परभारे रायेगडाहून वारंगी सिंडीस आणविले आहे तूं अतिशये न करणे येसी समजावीश करून वोपियाहून निघोन वारंगी सिंडीस आले चंद्रराव आले नाहींत तेव्हां जिजावानें घोडेयावरून उडी टाकून जीभ वोढू लागली तेव्हां गलबल जाली ते समई हैवतराव याणी जिजावास माफ दिल्ही कीं चांदोबा भोसल्याच्या दाढेस दिल्हा तेथून बांचून आला तरी त्याने निमे वतन खावें येसी बोली करून जिजावास घेऊन मोगलाईत गेले हें वर्तमान हुजूर महाराज छत्रपतीस्वामीस विदीत जाले तेव्हां चंद्रराव यांची बेडी तोडून भांडियाच्या तोंडी द्यावयाचा हुकूम केला तेथें सुभानायेक होते त्याणी अर्ज केला की आठा दहा वर्षाचे मूल भांडियाच्या तोंडी दिल्हियाने हैवतराव सिलिमकर मोगलाईत गेला तो येत नाही मुलाचा काही अपराध नाही येसा अर्ज करून मागती बेडी घालून ठेविले येसे हाल आपदा तुमच्या वडिलानी सोसिले याजबद्दल तुमचे आजे चंद्रराव व भगवंतराव याचे बाप माहिपतराव सलिमकर उभयेता बंधू वृती निमेनिमप्रमाणे खात होते त्याउपरी तुमचा बाप शंकरराव व भगवंतराव सिलिमकर हेहि निमेनिम खात होते त्या अलीकडे च्यार वर्षे भगवंतराव व तुम्हीहि तहप्रमाणे खात असता भगवंतराव सिलिमकर हुजूर फियाद जाले मागील दाखले मनास आणिता तुमच्या आजाने वृतीकरितां श्रम भोगिले व दोन पुरुष निमेनिमप्रमाणे खात आले त्याप्रमाणे हाली निमे तुमचे स्वाधीन आठरा गांवपैकी नव गाव व इनामती सेते रकम खंडी २१ येकवीस पैकी साडे दहा खंडी पूर्वीपासून खात आला त्याप्रमाणे तुम्ही निमे उत्पन्न हक लाजिमा कुलबाब जे उत्पन्न देसील भोगवटा खाऊन वतनाची सेवा करून सुखरूप राहणे ये बाबे तुमच्या माथा जीवन माफीक सेरणी दुतर्फा स्वराज्य मोगलाई कुलबाब व कुलकानू करार रुपये ३०० तीनसे केले असत तरी सदरहू तीनसे रुपये पावले असेत जाणिजे छ १४ सफर पा। हुजूर मोर्तब पत्रा । वधिरयं । भाति । ( तीन ओळींचा मो. )

बार सुरु सुद बार

---

ले. २५९ **१६ जितीकर- भोसले** श. १५५२ मार्गशीर्ष शु० ७
ता. ३०।११।१६३० इ.

( द्वादशदली फा. शि. )

( फा. अ. शि. )

( दोन ओळी फारशी मजकूर. तो मराठी लिपींत असा- )

कारकुनान व देसमुखान परगणे कडेवलीत चिदानंद के सुा। सन ——
३१-१९

बजारत माव खेलोजी भोसले आन् मुकद्मी देहे स्याहार व मोजब कबूल अर्जी मुकर्रर कर्दाअन्द्

छ कारकुनानी व देसमुखानि परगणे कडेवलीत बिदानद सुाा इहिदे सला-सीन अलफ वाामाव खेलोजी भोसले याची मोकद्मी देहाये ४ परगणे मजकुरुची बयाज कसबे जिती व मौजे भाबेरे व मौजे पाथर व मौजे कुलधरण सदरहू देहाची पेसजीप्रमाणे हाली माइलेसी करार केली असे दुमाले कीजे व देहाये मजकुरी मोकद्मीचे काम घेत जाणे देहाये मजकुरी हकलाजिमा सालाबाद असेली तेणेप्रमाणे दुमाले कीजे ( फा. मो. )

तेरीख ५ जमादिलावल

---

ले. २६० श. १५६८ कार्तीक शु. २
ता. ३०।१०।१६४६ इ.

( प्रतिपच्चंद्र हा शिवाजीचा अष्टकोनी शिक्का )

अज रख्तखाने राजेश्री सिवाजि राजे दाम दौलतहू ब जानेब कारकुनानी हाल व इस्तकबाल पाा इदापूर बिदानद सुाा सबा अर्बैन अलफ दरवजे बदल इनाम बाो संभाजि भोसले देसमूख पाा मजकूर अजराह मऱ्हामती मुकासा मौजे बोरी पाा मजकूर देहे १ येक देखील नख्तयाती ताा ठाणे माार देहाये व बाजे पटिया व महसूल व तूप व सेल बैल बाजे बाबा व वेठी बेगारी फर्मासी कुलबाब कुलकानु दिधले असे दुमाले कीजे औलाद अफलाद चालवीजे दर हरसाल ताजे खुर्द खताचा उजूर न कीजे तालीक घेउनु असली फिराउनु दीजे मोर्तब सुद 'मर्या देयंविरा जते' ( असा तीन ओळींचा शिक्का. )

तेरीख १ माहे सौवाल

सौवाल सुरु सुद

---

ले. २६१ श. १६११ मार्गशीर्ष
स. १६८९ डिसं.

( मुरीद बादशहा अलमगीरचा फा. वा. शि. )

( व फारसी मजकूर १० उभ्या आणि ६ आडव्या ओळी )

गुमास्ते जागीरदार हाल व इस्तकबाल व चौगले व सेटे व माहाजन व रयानि कसबे जिती पाा चांभारगोदे साा अहमदानगर सुाा सन १०९९ बिदानद की बहादुरजी वलद उमाजी भोसले यानि हुजरून अमदतुलमुल्क—याचे मोहर-नसी हसबल हुकूम कदीमल आयाम आपले आबा व अजदाद आहे दरम्यान माहादाजी निबालकर तावीने मुतसरीफ होतो तरी माइले मोकदमी तहकीक

कदीलयाम असली तरी याचे दुमाले करणे कीं रयेती आणून कदीम व जदीद प्रजा अबादानी करील म्हणोन हुकूम सादर जाला यावरी + + + तहकीक केले की मोकदमी याची होये तरी बहादुरजी वलद उमाजी भोसले मोकदम कसबे मार याचे हाते मोकदमीचे कामकाज घेणे व कसबे मार वेराण आहे यास कदीम जदीद कुले आणून लावणी करवणे मोकदम मजकुराचा हकलाजिमा व इनाम शुदामद चालत आला आहे तेणेप्रमाणे चालविणे

सफर

---

ले. २६२

श. १६६१ पौष शु. ११

ता. १२।१२।१६८९ इ.

( फारसी मजकूर ९ ओळी व शिका गोल )

( मोहर ए नायब अबुत्तराब काजी खादिमे शर अ )

आर्जदास्त आन बदगी बदे कमीन कमतरीन बदेगानी बदे देशमुखानी व देशपांडिये व समस्त रया कसबे जिती पा चाभारगोंदे सरकार आहमदनगर सुबे खुजस्ते बुनियाद सुा १०९९ जमी पोश आर्दास

हर्मा ताा छ ९ माहे रबिलौवल साहेबाचे नेक नजरे करून बखैर सलाहित आसे

हर्मा साहेब सलामत बहादुरजी वलद उमाजी भोसले यानी हुजरून हुकूम बनाम शफअत पन्हा नियाज खोजे हुकूम आणिला जे मााइलेची मोकदमी कसबे मजकूरची कदीम आहे खातिरेसी आणून मााइलेचे दुमाले करणे म्हणोउनु हुकूम आणिला त्यावरून शफअत पन्हा न्याज खोजे येही आपणासी हुजूर बोलाऊनू पुरसीस केली जे हे कदीम मोकदम होयेती म्हणौउनु पुसिले त्यावरून आपण जाहीर केले मालजी भोसले याचें फर्जद शाहाजी संभाजी याचे फर्जद उमाजी याचे बहादुरजी हे मिरासदार मोकदम होयेती येसी हकिकती हे कदीम होयेती बदगीस रोशन होये

समस्त रयाया काा मार
१ दाा रामचद्र बयाजी
देशमुख पाा मजकूर
१ दाा महिपाजी लिगरस
व हसराज गिरमाजी व
राघोजी मल्हारजी देश-
पांडे पाा मार
( १ ह्या ओळी आडव्या आहेत. )

---

ले. २६३ श. १६२५ श्रावण व. ७

ता. २२।८।१७०३ इ.

महजर श्री सके १६२५ सुभाननाव सवतसरे श्रावण वदी ७ सप्तमी वार रविवार ते दिवसी मातुश्री मकूबाई भोसले मोकदम का जिती वगैरे यासि म्हलोजी पा मो निमे व समस्त दाही जन मौजे पिंपलगी पिसा पा पारनेर सा जुनर सुा सन हजार १११३ कारणे लेहोन दिधले येसे जे मौजे मजकुरीची निमे मोकदमी बाळाजी कोनेर माहाराजांचा चाकर करीत होते व निमे मोकदमी अपली आहे येसियासिं बाळाजी कोनेर वरसे चाळीस गेले ते पुन्ह दुसरियाने गा गावावरी आले नाहींत येसीयासिं गनिमाची धमधूम फार व कितेक कसाले पाढरीचे काम व अपला हाल व गावाचा हाल कांहीं राहिला नाहीं जैसे तैसें करून अपण आजी-तागाईत वतण राखिलें व वतण राखिले तें काही बाळाजी कोनेरचे वतन म्हणऊन राखिले नाही बाळाजी कोनेरचे माहाराजांचा चाकर त्याचे वतन तें माहाराजाचें वतन याबद्दल अपणामधें काही ताकती राहिली नाही अनीक कोन्हास वतण लेहोन देऊन अपनास भाऊ करून वतण चालवावें तरी वतन माहाराजाचें याकरितां माहाराजाचें वतण माहाराजाच्या हवाला केले असें तुम्ही निमे मोकदमी व मानपाण हकलाजिमे बाळाजी कोनेर यासीं दिधला आहे तेणेप्रमाणें खाऊन वतन माहाराजे लेकराचे लेकरी खात गेले पाहिजे कालकळा बाळाजी कोनेरीचा लेक अगर भाऊबंद अगर अंसीचावंसाचा कोन्ही वतनाबद्दल उभा राहिला तरी त्यास वतनासी समध नाहीं खुद निमे वतन माहाराजांचें आहे बाळाजी कोनेर याणे जे घरवाडा बाधळा होता तेथें घरवाडा बांधोन लेकराचे लेकरी वतन खाऊन सुखी नांदणे समस्त दाही जन व बारा बलुते व समाकुळ पांढरी व हणमंत साक्ष करुण तुम्हास लेहोन दिधले आसे यासिं अपण नवदिगर होऊन अगर अपले असीवंसीचा भाऊबंद नवदिगर करील तरी अपनास आपल्या कुलस्वामीची व पूर्वजाची अनेगा असे व गोहत्या व ब्रह्महत्या पातक केलियाची अनेगा असे सदरहू हकलाजिमे काळी व पाढरी कदीम व जदीद माहराजे खाऊन सुखे वतण खाणे यासि कोन्ही हिलाहरकत करील तो दिवाणीचा गुन्हेगार व गोताचा आन्याई पत्री बोळी सुमार ४५ पचेताळीस बमहजर सही तेरीख छ १९ माहे रबिलाखर

निा नागर

बाा मैराल रघुनाथ
जोसी व कुलकर्नी
मौजे मजकूर

बाा गणेश गोपाल
जोसी व कुलकर्नी
मौजे म्हार

---

१ 'गा' आधिक पडला आहे.

गोही

गंगाजी नरसिंह
देशपांडे पा। वागी
सा। परडां

महिपाजी लिंगरस
देशपाडे पा। चाभार-
गोदे पाडे पेडगाऊ
व कडेवालित

गोही मौजे मा।र

रायाजी बिन पदाजी
जसताप मौजे मा।र
येमाजी बिन येल्होजी
भुसाल मौजे मा।र
रसम मालु बिन कान
मालू दरवडे मौजे मा।र

सुभानजी बिन
नाइकजी गीलहिले
मौजे मा।र
राजोजी बिन वाना-
जी विथापे मौजे मा।र

---

ले. २६४ श. १६३३ अ. भाद्र० व. ११
ता. २८।८।१७११ इ.

( " फा. वा. शि. मजकूर " दुउदखान फिद्वी । बादशहा
अलमगीर गाजी । सन अहद । " )

तां देसमुखानी व देशपांडियान व मोकदमानी व रयानी का। रासीन सरकार अहमदनगर सुबे बिदानद चुं दरी(वि)ऊा अबदुल महमन खान किले बाहदरगड याने मकुबाई पटेलीण मौजे जिंतीकर ई चौबी सात बकरी सुमार १०२६१ व मवेसी सुमार २०२ याखरीज तमचेरिया व पछोडी व कंबल लुटून नेली याबदल दोन च्यार मोर्तबेह फिरून ताकीद पाठविली व मुर्जेद चोपदार लालमण हजरून पाठविला होता किलेदार मजकूरची निशा केली नाही मूटमर्दी केली अजीसब(ब) मौजे रासीन जबत केली आहे तरी का। मजकूरचा महसूल तमाम दूर करून राऊ-राजे रभाजी निंबांळकर याचे मार्फतीने बि का। व मेवसी वगैरे तमाम दामदाम पोहोचांवीजे किलेदार मजकुरास येक दामदीरम पोहोचलिया तुमचे खुद नसबत करणे लागेल छ २४ माहे रजब सन ११२१ फसली

---

ले. २६५ श्री श. १६४० मार्ग० व. ६
ता. २।१२।१७१८ इ.

"श्री० । राजाशाहून । रपतीहर्षनीधा । न बाळाजी वीश्वनाथ । मुख्य । प्रधान ।"
( असा सहा ओळींचा शिक्का. )

छ० मसुरुल अनाम व देसमुख व देसपांडिये पा। चाभारगोदे यासी बालाजी विश्वनाथ प्रधान सुा। सन तिसा असर मया अलफ कसबे जिती पा। मजकूर

भूमीचे चतुरसीमाचे विवर येसे जे पूर्व दिसे नातोसीचे सीमेचे मेर १ पश्चीम दिसे व्हालाचे पाणी याचे मेर १ उतर दिसे थोरले खडक जाईतेचे उचवलेचे मेर आहे ते खडकाची मेर १ दक्षिण दिसे + टेहावरी आडा बैसउनु मेर करून दिले ते मेर १ या चतुरसीमामधील भूमी तुमासी कटबाध करून दिले असे सदरहू जमिनीमधे नारगील झाडी वा हरजिनसी लाउनु कीर्दी माहामुरी करून सुखे कमाविस भोगवटा कीजे सद्रहू + + वरसे तीस भोगले + सालिना होनु १८ सदरहू देत जाणे येक + + जती पुरागत घालुसी कारण नाही इस्तवाचे मुदती भोगले + मत येकतिसावेया वरु + देखील बाबहाये सद्रहू + मस्ता होनु ३॥० साडे तीन होनु हर साला देत जाणे त्यासी + वा पुरागत क तकसी वा अथवा गला सर्तीसी झाडासी + + लुसी निसबती नाही वा ते वग मधे मुडकारी नफर १५ + + दुकान वकाल यासी पाणदाम पत्र + बेगार वा देसक वा बाजे + + मान आसे याखेरीज जे काही मुडकारी राहातील तेयासी दर नफर + + दामराह येक तुकरा देणे वा ते जमिनी + + वली पाही यास व्हाल अ + + यासी बाध बाधोनु आपुले माडा + नेई जे येणेप्रमाणे तुम + चे जाले जातेने भोगावे + + आ + वा अ जाले जातेन पालावे + + र्सा जो कोण चुकेल वा पट विकीला + + + + + + + + वा हे लि + सी आहेत + + लिहिणे पटा सही तेरीख छ २ माहे रमजान मुबारख

मुबारख
लिहिले प्रमाणे गो
वादी अत प्रवि
चिट

उपश्री रवलनाथ
उ———
नाराण प्रभु देसाई
( षट्कोनी फारसी
शिक्का )
दामाजी नाडकर्णी
( सही कानडींत )

खिा काल सावंत
देसाई ( अष्टकोनी शिका फारसी )

विठल प्रभु नायेकवाडी
( श्री । विठल )

बेटा विठल + देसाई
+

पलपावेती !
नाडकर्णी
( सही कानडी )

ले. ३३० श. १६०५ माघ शु. ७
ता. १४।१।१६८४ इ.

( कागद काही फाटला असून नंतर ६॥ ओळी फारसी मजकूर. )

सलीयात महफन

॥७॥ कौलनामा हुमायुन साला फतम व फज हजरत सलतनत पन्ह वा अदालत दस्तगाह शाहा अलि जे वा आलपंन्ह अबुल मुजाफर आदिलशाहा सुलतान खुलीद वा अयाम सलतनत हु बो भानजी देसाई पा। कुडाल दिले कौलनामा येसे जे तुझेविसी हजरत शा + पनाह इ निकावत दस्तगाही खान अलि + + मुर्तजाखान गुदराणिले तेवरून कौल ( नामा ) हुमायुन तुज सादीर फरमाविले असे तरी तुवा हे कौलनामाहुमायुन वरून अपुले खातीर करार करून असणे वा मोकासाइयाचे हक मोकासाई यासि वा रेयाताचे हक रेयेताशी पाववणे वा हालालखोरी करून वेलायेती पा। मजकूर मामूर वा आबादन करून वा कोणे बाबे काही अदेसा न कर + बा। कौलनामा हुमायुन खंद

तेरीख ६ माहे सफर सन
अरबा समानीन

पा। बा इलाम हजरत मा
जाम मलीक इसलाम + त
सेत दुलवई + + + + पा।
बाबा व हुदेदारान

---

ले. ३३१

तमनभट कपुर मौजे सोनोरा बुद्रुक परगणा कुडाल यास सय्यद शमसुद्दीन मोकासाई मौजे मजकूर याने जाहीर केले कीं नमसी देह मजकूर सालाबाद फर्मान बरहुकूम चौकशी करून हुकूम दिला

---

ले. ३३२

भाड्याची रकम वसुलाखेरीज पाहिजे असा करार केला आहे दिगर अध्य आणखी एक हजार होन देण्याचा इकरार माजी सरकार हवालदार याचे बाबत आणि रकम ३७१ होन जे दिले ती जमा केली आहे बाकीची रकम वसूल झाली नाहीं पटीशिवाय या वेळेस हवालदार मिर्जा मशारूनइले दूर झाला महालाचे कारभारी यानीं याप्रमाणें गैर वसूल जाला याबद्दल विचार करून सर्वांत सांगितलें मुदत २५ वर्षे केली पाहिजे याप्रमाणें विचार केला गेला परंतु अमलांत आणिला गेला नाहीं या वेळेस बाबाजी देसाईवर त्याचदलचा संशय घेऊन त्यास किल्यांत अटक करून ठेविले होतें व पटी वसूल केली व बाबाजी देसायाची काहीं पटी वसूल झाली व बाकीची काहीं वसूल होणें आहे

ले. ३३३ श. १५४४

इ. १६२२

विठ शेणवी नाडकर्णी परगणे कुडाळ सुा सन सलास इशरनि अलफ जाणावे की तुमच्या विनंतीवरून देसाई भानजी गणेश प्रभु व याये प्रभु यांस मुकरर केलें आहे वसुलातीचा तालूक यांच्याशीं आहे

---

ले. ३३४

हुद्देदार व कामगार मौजे दिंडोर परगणे कुडाल जाणावे की भानजी देसाई यानें अस जाहीर केले की दर मौजे पैकि जिराइत कमी आहे धान्य कहूं देत नाही सालाबादाप्रमाणें कतबा लिहून घेतला आहे.

---

ले. ३३५

( फारसी शिका व मजकूर ३१ ओळी )

छ. देसाईयानी व देसकुलकर्णी परगणे कुडाल के हुजूरून बराबरी फर्जंदी नुरचश्मी माहलासी पाठविलें चिदानंद के दरी वख्त अज बाजे मोहिमाती के दर माहाल बाद विलेती दौलतखोही जाहीर जाहले नाही व अनसारिखे समाचार पावतो पहिले मर्दुमानानी के हवालदार माजी बंदेखाने नु ठेवले होते तुम्ही कोणे रीतीने जाउनु व फर्जंदी अर्ज केले जे याचे गुन्ह नाही व सलास करविले काईब येसे होते जे सिलक बंदेखाना येथे आमाजवली पाठवगे गुन्हा हर कसवे सबब बंदेखाने मध्ये ठेविले होते व कोण नफर किती दिवस होते त्याचेची नावखाली लिहिणे होणे ता हुजूर मनास अणून निघा फर्मावितो अणीक मिसली तुमचे तालुकाती के हवालदार माजी अमानत केले होते त्याचे माहसूल दिवाणातु जमा केले होते व जे केले नव्हते अपण मुतस + + + या दुसरे सि मोकरर केले होते व देहाये के + + लिहिताना नजद फर्जंदी नुरचश्मी दुवाले मिसली घेतले हे काये दौलतखोही व नफराई केली ती जे आम्हासी जाहीर होउनु हवालदार माजी जे घेतले ते तुम्हासी परतून देवणे काये खायेसे होते जे जेणेप्रमाणे हुजूर लाफ दौलतखोही व नफराही मारीत होते सी माहालासी जाउनु तैसेची दौलतखोही करावे होतेनी व आम्हास कलते त्यावरून तुम्ही जे काही मनी धरीत होतेती त्याहून अधिक तुम्हासी सरफराज फर्मावितो आतां तमाम मिसली यासिके फर्जंदी घेतले असाल हुजूर पाठवीजे त्यावरून हकीकत हालानी मनास आणून जे काही दौलतखोहीस घडेल तैसे अनल करून वा आणीक जमायेत देसाईयानी के कुडालामध्ये हवालदार माजी जवली होते मोहीमाती विलायेती चालवीत होते त्यां मधुनु कोण फर्जंदीचे मुलाकतीस आला व कोण नाही आला याचे सबब काये

व कोठे गेला व त्याचे तालुकाती काये असे तुम्ही हे गुप्त मनास हकीकत चेहरा आणित असाल जे याजे चिजे गेयतीस सुरत देउनु मध्ये आपुले काम करून घेउनु या मागाल जे आपुले सफराई व दोस्ती हवालदार माजीस ज्याहीर होणे हे ख्याल गलत या अंदेसा यानिल असे के मनास आणिले ती आमचे दोस्ती तुम्हास कामास येईल व आमचे दुसमानी दुसरेचे दुसमानी सारिखे नव्हे आम्ही तैसे नव्हो जे आम्हास दगा दिल्हे जाईल के आपुले तल्बे कारणे दुसरेचे सारिखे ना दौलतखोही करीत असो तू आमचे मतलब दौलतखोही व हलाल खोरी हजरती——असे व मागतो जे आमचे हवालदारीमध्ये विलायेती मामूर व आबादान होते आगर तुसे सरफ + + आसाल हे अमल तर्फ करून दौलत खोही के बमोजिब हुजूर + + + + ती तैसे करीत जाईजे इला अमल के न कुनंद ४ थे दिसी. आम्हास जाहीर होत आसेल काये कामास येईल यैसे मिसली के आम्ही हवालदार आसो अमचे सिकेसवे असावे जाणिजे आमल के दगाबाजी वा ना दौलतखोही यैसे जाणत असाल त्याचे वाटे न जाईजे वा हुजूर पैके कतबा देउनु कबूल केले असा त्याचे फिकीरी तु असीजे हुजूर कार गुजारी दिले त्याचे निधेवरी असीजे तुम्ही यदे-खानाचे लोक खलास केलेती गैर महासूल करणे ते केले ते नाही गैर महासूल साद-णूक पैयगरी होनु ५००० पाच हजारचे निघा कैसे होईल कुडाला होउनु लिहिले आले जे लोक के बंदखानी होते हर कोणी मबलग गैर माहासूल कबूल करीत होते जे खलास होणे हवालदार माजी कबूल न करून जाजती मागत होता तुम्ही कैसे खलास + + ले + + + + + दिवाणीचे माल जा + करविले ती बाजे + + ते विलाय-तीचे अल खबर धरीत न्हवते जे हक अहे नाहक कोण अहे तुम्ही जैसे फर्जंदीस मालम केलेती तेणेप्रमाणे फर्जंदी मोकरर केले जमी हे तकसीर तुमचे आहे त्याचे यैवज दाजिश्रा तूर्न की जे पुढे यैसे दगाबाजी न करणे के बरवे नव्हे जामीन कुलकर्णी व के दर बदखाना होते तुम्ही हुजुरु जाहाले होते आम्ही मोकरर केले जे माहाली त्याचे तालकातो खातिरेसी आणून निघा करुनु आता कैसे याबे तालकाती खातिरेसी आणिले निवा सोडिलेती तुमचे जामीन कतबा कैसे आम्हाजवली पाठविले ता मालम होईल जाणिजे मोर्तब छ १ साबानु

---

## २२ कारी-मुळवे

ले. ३३६ श. १५४० मार्ग. व. ४

+हु इ. १६१८ नोव्हें. २५

अज रस्तखाने खु॥ मा॥ सर्क मा॥ अंबर खु॥ दौलत हू बजानेबु कारकुनानी तपा रोहिडा चिदानद सु॥ तिसा असर अलफ हेजीब कान्होजी नाईक जेधे देसमुख ता॥ बोर ता॥ मजकूर याणी मालुम केले जे मौजे कारी हा गाऊ इसाफत रकम टके ४० चयालीस

टके १कमेचा आम्हाकडे द्रोबस्त पेशजीपासून चालत आहे तो गाऊ अम्ही व अमचे वडिलानी हासम लोक अमचे तर्फेचे अमचे वडिलाचे व आमचे उपयोगी पडुनु ता। मजकुरीची देसमुखी मेळउनु दिल्ही त्याबदल हसम लोकासी इमानप्रमाण श्रीरायरेश्वर देवाजवळ क्रिया हिंदुधर्माची होउनु ता। मजकूरचे गाऊगनाप्रो देसमुखी वतनाबा। निमे हक तुम्हास देऊ असा करार जाला करारप्रो देसमुखीचे वतन दिवाणानून मिळाले वचनाप्रो हसम लोकास गावगनाप्रो निमे वतन द्यावे तरी वतनाचा बखेडा होतो याकरिता सारे हसम लोक अमचे तर्फेचे जमा करुनु त्याची समजूत काढली ती असी जे सारे लोकास सद्रहू मौजे कारी हा गाव अमचे अमचे इसाफतीचा देतो यात सारे लोकानी समजावे याजवरुनु सारे हसम लोक प्रभु सबनीस फडणीस सु॥ राजी होउनु कारी गाव हवाला करुनु घेतला ते वेळी अमचे वडिलानी व हली अम्ही ठराविले जे अम्ही अपले येक घर बादुनु मौजे मजकुरी राहू याचे कारण आमचे जिऊ हसम लोकानी पेसजी वाचविले तसे पुढेहि वाचिले पाहिजेत याजकरिता येक घर बांदून राहू अमची चाकरी हासम लोकानी सिरस्तेप्रो तरवारेची करुनु अम्हास साधालावे मौजे मजकुरी सेते तळवस बा व टा वा गाऊरानात व डोंगराचे माथा पटारास व असामदाराचे मिरासी सेतात वगैरे जागा अम्ही व अमचे वंसी सेते करणार नाहींत सेते करू तरी अम्हास व अमचे वसास सेफत श्री नागोबाची असे तुमची तुम्ही सेते करावी व सारे हासम लोक याणी कुलबाब कुलकानु अवलाद् अफलादीचे फरजंदाचे फरजंदची करुनु वतन खावे अवलाद् अफलादीस फरजंद् नसलियास त्या असामदाराचे असामीवर दुसरा जदीद् असामदार कायम करण्यास वा बेहडा कायम राखणे हो मालकी हासम लोकाची अम्हाकडे मालकी चाकरी घेण्याची याप्रो व अमचे देसमुखीचा हकलाजिमा येकंदर यक कारी मजकुरचा इसाफती अमलासुद्धा दिल्हा असे व नरस प्रभु फरजंद् दाद् प्रभु देसकुलकर्णी व गाऊकुलकर्णी तुर्फ किले मजकूर यास पेसजी अमचे वडिलासो व हाली अम्ही बलालजी प्रभु देसकुलकर्णी व गाऊकुलकर्णी हे लढाईचे प्रसंगात ठार जाले ते वेळचे देणे व हाली तेच टके ५॥ चालत अहेत त्याप्रो पाच टकियाची हाद् मौजे मजकूर व मौजे अगसोळेची सीव अबेवाहाळ कारीप्रो व पळसवणी वाहाळ अंगसोळप्रो या दोही सिमाचे मधील लाहान दांड त्या दांडाचे पाणलोटाने सिव ती हाद् व खाली अंबेवाहालेतील खडकाचे पाणी त्या पाण्याचे खालून सीव वोढ्यापलिकडे बुडकुंबा गढधु वरुनु तो हिरडस मावलची सरहाद् नागघोंड डोंगराचे दांडाने पाट(ण)लोट आ ( हे ) त्या सिवेचे री स कोंढाळकर व पेटकर याचे मिरासीचा बांदापासोन सारा बलालजी प्रभु हे मारनल्हेचे वडील याचा दांड मोहाचे दांडास यकंदर पुरवणीचे रानसु॥ टके पाच याची हाद् व नीवनु टका ॥ अर्धा यकूण साडेपाच टके बक्षीस मौजे मजकुरप्रो दिल्हा ते व त्याचे हकलाजिमा वगैरे कुलबाब कुलकानु कायदे

त्याचे ते मालकीने अनुभवितील व बाबाजी फरजद येसाजी नाईक जेधे यावरी व इनामदार व यकद्र हसम लोक मिळोन टके २४॥ खेरीज बाजे वतनदार टके ७॥ जमाबंदी मा दिवाणची बाब वगैरे हाषम लोक याणी देउनु अपला येहडा कायम राखुन वतन कुल मोकद्मीच व लोकाची हवाला केले असे तेचप्रो यकंद्र मानपान घरटका आण म्हैस व लमटका पाटहाम व जकात वगैरे सुा लोकास पाळा(वे) याप्रो अमचे तर्फेनी द्रोबस्त सद्रहू गाऊ हषम लोकाकडे चालत आहे म्हणोनु मालुम केले तरी सालाबाद् गहदुम बोगवटा तसरुफाती कार-कीर्दी दरकारकीर्दी तनखा सन समान चालिले असे हो(ते) सालगुा सन समान या साली कारकुनी इस्कील केली आहे साहेबी हक मन्हामती फर्माउनु त्याचे दुमाले करुनु खुर्दखत मन्हामती होये म्हणोनु मालुन केले तरी देसमुखत-फैने मौजे मजकूर येथील सद्रहूप्रो यकंद्र इताफती अमल व देसमुखीचा हक-लाजिमा हषम लोक यास सांजक द्रोबस्त आहे खेरीज देसकुलकर्णी व गाऊ-कुलकर्णी प्रभु याचे इनाम व हकलाजिमा वगैरे बाबी व बाजे वतनदार याचे बा(बी) व बाबाजी फरजंद यसाजी जेधे याचे टके व दिवाणचा दस्त हिसेबु असेल ते यकद्र खेरिज करुनु सद्रहू हषम लोक वगैरे याजकडे स ख + क

वगैरे गहदुम सालाबाद् भोगवटा तसरुफाती कारकीर्दी दरकारकीर्दी सन समान जे रीती चालिले असे असेल तेणेप्रमाणे चालवणे तनखा चालगा! तुम्हास

हषम लोकास फिराउनु

दीजे मोर्तब सुद फारसी मोर्तब

रुजसु
रुनिविस

छ १७ माहे जिल्हेज
जि हेज

बार सुरु बार

---

ले. ३३७ श्री श. १५४० पौष शु. २
इ. स. १६१८ डिसेंबर ९

अज रख्नखाने राजश्री काम्होजी नाईक जेधे देशमुख तर्फ बोर तपे रोहिडा, पाा माा दौलतहू बजानेबु समस्त हाशम मुळवे लोक मौजे कारी ताा मजकूर सुहुर सन निसा अशर अलफ तुम्हास वतखीवतन(?) देण्याचा करार पेशजी आमचे वडीलानीं व हाली आम्ही श्रीराइरेश्वर देवाजवली दुधाभाताची बेलभडाराची क्रिया केली जे तुम्हा लोकानी आम्हावर मेहेरबानी करुनु आमचे जिऊ वाचउनु आम्हास तरे मज-

---

१ हा लेखांक (इ १९२८ आगष्ट) वि. ज्ञा. विस्तारांत आला असून त्यातील लेखकांस कांही शब्द बरोबर न लागल्यामुळें चुका झाल्या आहेत त्या येथें दुरुस्त केल्या आहेत.

कूरचे देशमुखीचे वतन मेलऊन द्यावे आणि निमी देशमुखी गाऊगना हकलाजिम्या-सुधा द्यावी त्याप्रो तुम्ही वतन मेलऊन दिल्हे गाऊगनापैकी वतन निमे बचमाप्रो तुम्हास द्यावे परंतु तुम्हा सर्वांपासी मागणें मागीतले कीं तुम्ही सारे वतनात निमे हीसे घेतल्यास वतनाचा बखेडा होईल याजकरिता मौजे मजकूर हा गाऊ रकम टके ४० च्याळीस टके रकमेचा कुलबाब तुम्हा सारे लोकांस आम्ही आपले इसाफती अमलाचा आमचे देशमुखीचे हकलाजिम्या व ईसाफती अमलासुधा व कुल मो बदल इनाम पासोडी व गाऊ देवाची घटावात होलीस पोली व मानाच्या सवासीण व शांसनचा[1] निवेय व दर जत्रेस + फुल तुमचे वंसी व विडा टिळा याप्रो व लम-टका व पाटदाम व वणम्हेस व जकातपाळ व दर माडवांतील मांडवखंडणी वगेरे कुल मो संमधे आम्हाकडे इसाफती अमलासुधा आम्हाकडे चालत आले तितक्या बाबी म्हासुली व बाजे बाब नफर निम वगेरे देशमुखीचा हाकलाजिमासुधा येक कारी हा गाऊ तुमचे हवाली एकंदर जमीन तळवट व गाऊरान व डोंगर रान + मुह्याचे माथ्याची जमीन तुमचे हवाली करून तुम्हास सर्पन कारी करून दिल्हा असे त्या जमीनीत आम्ही व आमचे वंसीचे भाऊबिरादर सुधा सेते एकंदर करणार नाहींत तुमची तुम्ही सेते करावी आमचे जिऊ तुम्ही वाचविले त्याप्रो पुढेहि बाचले पाहिजेत याजकरिता फक्त आम्ही आपले एक घर बांधून राहूं गावावर आमचा हुकूम नाही यात अंतर आम्ही व आमचे वौसी करील त्यास श्री नागो-बाची श्री राइरेश्वराची शेफत असे तुमची तुम्ही सेते करून दिवाणाची बाब व नरस प्रभु फरजंद दादू प्रभु देश कुलकर्णी व गाऊ कुलकर्णी सबनीस फडनीस याचा हाकलजिमा सेरीज करून तुमचे फरजंदाचे फरजंद आवलाद अफलाद वतन साणे आवलाद अफलादीस फरजंद नसल्यास जदींद क (?) असामदार त्या आसमदाराचे असामी वारसा कायम करणे. ही मालकी बेहडा कायम रासणे ही तुमची तुम्हा लोकांची आम्हाकडे मालकी चाकरी घेण्याची तुम्ही आमचे वतनभाऊ तरवार धरणार धारकरी ज्याहामर्द मुले तुम्ही आम्ही दिवाणाचे चाकर वतनदार जमेदार त्या जमेदारीबाा तुम्हा लोकांचा सेते करण्याचा तंटा पडू नये सा ते बाबे तुम्हास जमीन वाटून कुलप्रो बलुतेसुधा वाटून दिल्ही ती येणेप्रो .

२ माहालाजी फरजद धारराऊ घोलप
प्रधान याणी देशमुखी वतनाचा
गाऊ गनाचा व मौजे मजकुरचे
कारभार कुल मो चा करून सारे
हाश (म) लोकांची वगैरे हुकूम करून
मानपान घटवात होलीस पोली

६॥। नरस प्रभू फरजद दादू प्रभू
देशकुलकर्णी व गाऊकुलकर्णी
तपे मजकूर व सबनीस फडनीस

·।· स्थल कारसिंड्या
॥६ थल गावजाई

---

[1] सिंहासनाबद्दलचा.

सान्याची गाऊ व खेडा होईल याजकरितां समाईकीचे मालकी देऊन गाव देणे-पो दोन तीन टके जमीन बक्षिसात खावी त्या खेरीज
सान्याचे वाटणी बराबरीची जमीन येणेप्रो व आमचे पंकीचे ताट खावया बरोबर + + सदर्हू
घटवान होलीस पोली
१ थल जोगोबालावाची टकेवाटणी ·॥·
·॥· थल आड म्हसोबा
८८॥· थल सोइरजाया
·॥६ थल रानकण्या

२

सदर्हू सर्वा + +
+ + + +
ते अमल दिल्हा त्याची मालकी तुम्हास मो दिल्ही असे
१॥ लखुजी फरजद तान्हाजी सोन-जी पेटकर
·॥· थल सोइरजाया
·॥· थल म्हसोबा कडकी
·॥· थल रानकण्या

१॥

३ अर्जोजी व राघोजी कोढालकर
·१३ स्थल म्हसोबा आड
·१६ स्थल गावजाई
·१॥ थल म्हसोबा आड
·।·॥ थल सोइर जाया
·१३ थल मावलक
१॥६ स्थल रानकण्या

३

।६ थल म्हसोबा आड

देशकुलकर्णी
८७॥ थल सोइरजाई
२॥३ थल म्हसोबा कडकी अहद आयेवाहाल
२॥१॥ थल रानकण्या देश सेतबदल

२॥७॥

६॥

तपसील
·॥· देशकुलकर्णी
·॥· गावकुलकर्णी
·१५॥ बाबाजी सापाऊजी सिद्दा बला-लजी प्रभु साबु वेगे
सुधा बक्षी

६॥

१॥ कोंडजी धारोजी याडवाकर
·१६ थल वडाचा म्हसोबा
८६ थल गावजाई
८३ थल सोइरजाया
॥१ स्थल रानकण्या

१॥

१॥ नागोजी डवले चा भाजी सोचऱ्या बदल
॥ थलकारी मु॥ ·१६ थल आड म्हसोबा
·।· थल गावजाई ·।·॥ आडम्हसोबा
८१॥ थल सोइर ·।·स्थलरानकण्या

·॥१॥ ·॥१·॥

१॥ राजजी सणस अंतोजी लोह-कन्याबद्दल
·।· थल म्हसोबा आड

२। देक माहाला तावरा बोवले सुधा
०।।० थल जोगोबा
०।१।। थल अड म्हसोबा
८३ थल सोईरजाया
०।।० थल बाह्मणजाई
०।।१।। थल रानकण्या
२।

२ हाशम लोकांत
०।० हजामपणा बाप (व ?)
२।

१।। चागोंजी गोडावळा
८३ थल कारसिंड्या
८९ थल म्हसोबा
१ थल गावजाई
८१।। थल म्हसोबा आड
( ०।।० अथ बाह्मणजाया )
८१।। थल रानकण्या
१।।

३ राभजी व अनाजी जेधे वेलंगकर
१।। अनसोजी
८६ थल अडाचा म्हसोबा
८१।। थल सोईर जाया
०।।० थल बाह्मण जाया
०।।४।। थल रानकण्या
१।।

१।। सेकाजी लाव्या
०।।० थल म्हसोबा आड
०।।० थल गांवजाई
८१।। थल आड
०।।०।। थल रानकण्या
१।।

३

१ थल बाह्मणजाई ८३ थल सोईर
१।० ८९ रानकण्या
०।०

१।। कुस्नाजी सुवानजी फरजंद रामाजी पिलजी तुपे परसोजी सोहकरा बा।
०।।० थल महाल्या १ थल रानकण्या

१।। सुलतानजी चुडाना
१८६ थल आडाचा म्हसोबा
०।६ थल रानकण्या
१।।

१।। वणजोजी ढेकाणा
०।३ थल कारसिंड्या ८३ थल गांवजाई
३ थल म्हसोबा आड ०।० बाह्मणजाया
०।।० थल मावल्या ०।३ थल रानकण्या
०।।६ ०।।६

२। इद्रोजी फरजद येसाजी जेधे
०।० थल कारसिंड्या ०।० थल आडाचा म्हसोबा
८३ थल गावजाई १।।९ थल मावल्या
०।३ ।।।९

०।० जोसी रुद्रभट विसाभट म्हसवडे थल ३ व थल बाह्मणजाई व रानकण्या
१ सुतार थल मावल्या वगैरे
८६ थल जंगम थल नागोबा
०।० गुरव स्थल मावल्या
८६ सोन ठाकुर थल अडाचा म्हसोबा
८६ लोहार स्थल मावल्या

२ सोनजी कारकरी मो याजबदल
इनाम तुमचे हावाली केला असे
१॥ थल गावजाई
॰॥॰ थल रानकण्या
—
२
२ किता आसामदाराबदल तुमचे
हवाली केले ते
८१॥ थल सोईरजाया
१॥। थल बाम्हणजाई
८१॰॥ थल रानकण्या
—
२
—
१७।
—
रास ४० टके

८६ लाधी थळ मावल्या
॰।. घडसी गाऊ देणे व कुभार व
सोनार
८३ थल आड म्हसोबा ८९ थल
बाम्हण जाया
—
कमाण्यासुधा
॰।॰ चांभार थल गावजाई
॰।॰ धारवरचा परीट थल वड व आड
॰।।॰ गांवठाण व पासोडी व कासार
वगैरे सुधा + + + +
८३ थल आड म्हसोबा व महाराचा
म्हसोबा
.।९ थल रानकण्या व तन्यासु
—
॰॥॰
१॥ येसनाक व धाकला चागनाक
व बचनाक महार
८७ थल अड म्हसोबा १ थल सोइर-
जाई
८९ कडकी म्हसोबा ८७॥ थल रा-
नकण्या
—
॰।४॥ १८७॥
२२॥। हाडकी हाडवळासुधा थल
आड थल मालचा म्हसोबा
वगैरे + + + +

येणे प्रो जमिनीचा अनुभव मौजे मजकूरचा आमचे ईसाफतीचा + व हक लाजिमा वगैरे बाबी सुधा खेरीज दिवाणची बाब व देशकुलकर्णी व गाव कुलकर्णी करून तुमचे फरजदाचे फरजद वतन अनुभवणे सदरहू वतन चालण्याबदल दिवाणचे खुर्दखत तुम्हास दिल्हे असे ह्याप्रो चालणे छ १ मोहरम

मोर्तब

सुद

—

ले. ३३८ श. १६८६ मार्ग० शु. १

इ. स. १७६४ नोवें. २४

यादी वंशावळ न्हावी यांची देशमूख जेधे ता। भोर ता। रोहिडखोरे सुा। खमस सितैन मया व अलफ शके १६८६ तारणनाम संवछरे मार्गशीर्ष शुा प्रतिपदा मूळ पुरुष आपाजी नाईक जेधे देशमूख याजपासी सेवेसी सोन माहाला तावरे न्हावी बेदरी पातशहा होते ते समई हे तेथे गेले होते सबब जे पेशजी देशमुखी ता। माची दगडे याची होती त्यांचे हे कारभारी होते नंतर कितेक दिवसानी दगड्यांचे निर्मू-लन झाले तेव्हा आपाजी नाचा लेक बाजी ना। हा मागे घरी होता असे वर्तमान होताच कान्होजी राऊत व भाननाक माहार यांना खबर द्यावयास बेदरास पाठविले मग हे बादशहापासी जाऊन सेवाचाकरी केली पातशहा कृपाळू होऊन आपाजी नायकास तर्फ मारचे देशमुखीचे वतन देऊन ताम्रपत्रे दिली ते वेळी सोन माहाला आपाजी नायकास कामास आला आपाजी नायकानी कृपाळू होऊन आपला कारभार देशमुखीचा तिसरा वाटा देशमुखीचे उत्पन्न होईल ते द्यावे अंतर करू नये याप्रो बेदरी उभयताचा करार जाला इनाम जाले मग तेथून उभयतास पातशहानी वस्त्रे देऊन रवाना केले मग हे चवघे जण व भाना महार असे असता कान्होजी राउतास देशमुखानी जेधे यांची प्रधानकी दिली असा करार करून वाटेने मजल दर मजल येत होते शिरवळचे मुकामी आले काजीचे घरी ताम्रपत्रे वाचली ती खबर खोपडे यास कळली तेव्हां खोपडे पाळती राखून वाटा धरून बसले मग हे दुसरे दिवसी गाडे खिंडींत आले तेव्हा त्यानी या चौघास जिवे मारिले आणि ताम्रपत्रे घेऊन निरा नदी विंगचे डोहात दगड बांधून बुडवली ही खबर घरी बाजी नाईक व राम महाला यास उत्रोलीस कळली तेव्हा घरी मोठा कहर बायकामुलांचा जाहला बाजी नाइकानी ये गोस्टीची चौकसी केली तों खोपडियानी पाळती घालून मारले व ताम्रपत्रे नेऊन बुडविली असे कळले मग बाजी नाईक व राम माहाला बिन सोन माहाला हे बायकामुले घेऊन देशास आले मग हे वर्तमान बेदरी बादशहास कळले बादशहानी बाजी नाइकास व राम माहालियास पत्रे पाठवून बेदरी घेऊन गेले याजवर कृपाळू होऊन फिरोन पत्रे देशमुखीची करून दिल्ही व उभयतास वस्त्रे देऊन देशी रवाना केले ते समयी यानी पातशहास अर्ज केला की आम्ही आपला दावा उगवून घेऊ असा करार करून घेऊन मग आपले देशी आले पर मुलखात धावडी बेदरी येथे जाऊन थारा धरून राहिले ते मुकामी बाजी नाइकास पुत्र खेळोजी नाईक झाले राम माहालियास दोघे पुत्र तान माहाला व जाव माहाला असे जाले मग पुढे येक पुत्र जाव माहाला आपले वतनाकडे राहिला तान माहाला देशमुखापाशी राहिला बाजी नाइकानी त्यास खेळोजी जवळ नेमोन दिल्हा मग बाजी नाईक तेथोन शेवादाव करून जबरदस्तीने इकडील वतनाचा लाजिमा

घेत गेले असे कितेक दिवस जाहाले मग खेळोजी नायकाचे पोटी बहिरजी नाईक जाहाले व तान माहाल्याचे पोटी गोंद माहाला जाहाला तो बहिरजी नाइकाचे सेवेस खेळोजी नाइकानी दिला इकडे जान माहाल्याचे पोटी म्हक(स) माहाला जाला तो इकडे वतन अनभवून म्हाकोशीचे मुकामी होता तो फार खबरदार होता तेव्हा इकडे धन्यास व कारभान्यास विकल्प पडला बहिरजी नाइकाचे पोटी भानजी नाईक जाले तेथे बारा पाईक [ मुळचे ] जमा करून सर जाले मग म्हाकोशीस म्हाक माहाल्याचे घरी धारा धरून खोपडे करनवडे मुकामी निचळाचे घरी लग्न होते तेथे वऱ्हाड मारिले असे वर्तमान जाले मग त्यांचे पोटी कान्होजी नाईक जाला व म्हक माहाल्याचे पोटी लख माहाला जाला कान्होजी नाइकाचे पोटी नाइकजी नाइक जाले व लख माहाल्याचे पोटी देव माहाला जाला तेव्हा सोनजी व भिवजी नाइकानी नाइकजी नाइकाचा मारा केला तेव्हा नाइकजी नाइकाची स्त्री आणसावा अडिचा महिनियाची गरोदर होती तेव्हा आणसावाने बारा पाईक व कारभारी आणि कारकून मिळवून विचार केला की आता आमचा पोरवडा वाढविता की नाही लोकानी जाबसाल केला की तुमचा जीव आहे तोंवर पोरवडा वाढवितो मग ही मसलत करून रोहिडा गड येथे आली किलेदारास भेटली सारा वृतांत मागील पुढील सांगितला तेव्हा किलेदार बोलिले की बाई तू भिऊ नको तुम्ही आपले देशमुखीचे वतन खाणे व शिक्का करवीत जाणे निरोप देते समई आणसावा बोलिले कीं माझे पोटी आडचा महिनियाचा गर्भ आहे तेव्हा किलेदाराने जामदारखान्यात माणसे पाठवून वस्त्रे आणविली ता येक कद व एक शालू असे आले तीच आणसावास देऊन किलेदार बोलिले की तुजला पुत्र होईल चिंता न करणे वस्त्रे घेऊन गावास कारीस आली मागती लोक व कारभारी जमा करून बोलली की मी प्रसूत होईपर्यंत कारभार करणे देशमुखी करणे सर्व जण बोलिले की आम्ही निपोटी चाकरी काय करावी तेव्हा तिणे बरोबर सोन्याच्या कांबी आणल्या होत्या त्या कोयत्यानी तोडून लोकास व कारभारियास दिल्या मग त्यानी देशमुखीचा कारभार केला नऊ महिने जाले पोटी पुत्र कान्होजी नाईक जाहले त्यास अडीच महिने जाले तों सोनजी व भिवजी नाईक यानी आणसावास मारेकरी घालून मारिली दाई पाळण्यापाशी खाली निजली होती तिने ही गडबड होताच हे मूल खोलीतून घेऊन देव माहाला याचे घरास गेली त्याचे हवाला केले त्याने नेऊन मांडरदेवास आजोळास पावते केले तेव्हा मांडरे बोलले कीं आम्हास मुलाचा सांभाळ होत नाही मग तेथून मूल काढून मोसे खोरियात तव येथे सूर्याजी बाजीराव पाशिलकर याच्या हवाली सोनजी बिन लखमाजी माहालियाचे लेकाने केले त्यानी सात वरसे मुलाची जतन केली आपली कन्या सावित्रीबाई देऊन मुलाचें लग्न केले मग इकडे कारीस देशमुखीवर आपला जमाव देऊन पाठविले मग हे देशमुखी करावयास लागले नंतर यानी आपले भावा-

बंद्रास व देव माहाल्यास हाती घेऊन पाळत करून सोनजी व भिवजी नाइक यास मारिले यावर कितेका दिवसानी कान्होजी नाइकाचे पोटी बाजी सर्जाराव जाहाले तेव्हा भाऊ सिवजी वगैरे यानी वाद देशमुखीचा चालविला तेव्हा रायगडास सर्जाराव व सिवजी नाईक हे शिवाजी माहाराज याजपासी जाऊन व्यवहार सागो लागले तेव्हा माहाराजानी देशमुखी अमानत केली कितेक दिवसानी माहाराजास देवाज्ञा जाली तेव्हा त्यांचे लेक राजाराम राजे हे चंदीस होते सत्रा वर्षे देशमुखी अमानात पडली मग चंदीस सर्जाराव आणि बापूजी बिन देवजी माहाला हे गेले आणि शिवजी नाईक हे रायेगडीच मृत्यु पावले तेव्हा रामराजापाशी चंदीस कर्नाटक प्रांतीचा सुभा करून येसाजी गोपिनाथ लोहोकरे होते त्याजपासी सर्जाराव यानी सविस्तर वर्तमान सागितले त्यानी महाराजास अर्ज करून देशमुखी आपली सोडविली व बारा माहालचे देशमुखीची इनामे अनामत कितेक दिवस पडिली होती ती हि अर्ज करून येसाजी पंती सोडविली माहाराजास नजर सातसे होन चंदीचे मुकामी दिले आणि कागद सनदापत्रे करून घेऊन सर्जारायापाशी आले त्यानी सनदा पाहून खुष होऊन कृपाळू जाहाले मग आपले देशमुखीचा कारभार व नाटंबीचे कुलकर्ण दिले आणि येसाजी गोपिनाथास दरोबस्त खासनिशी वतन आपले देऊन बोलिले कीं येसाजी पंतो आपली खासनिशी तुम्हे वंशपरंपरेनें करावी आणि आमचे वंशपरंपरेने तुम्हे कुलकर्ण व खासनिशीचे वतन चालवणे असे इनाम श्री नागनाथाचा बेल व गोवर जोंधळे करून चंदीचे मुकामी बापूजी माहाला याचे गुजारतीनें इमान प्रमाण करून दिले असे तेव्हां येसाजी गोपिनाथ बोलिले की हे प्रमाण कशावरून तेव्हां करार केला की आपले वंशपरंपरेने कोणी या वतनास हिला हरकत करील त्यास काशीमधे मात्रागमनाची शफत असे असा करार करून दिला तेव्हा बापूजी माहाला याने देशमुखास अर्ज केला की माहाराज मजला भाकर जन्माची द्यावी तेव्हा मौजे आंबवडे तर्फ मजकूर येथील शेरींपैकी इनाम दरोबस्त रकम टके दोन शेत दिले येसाजी गोपीनाथ याचे गुजारतीने दिले असे अशी वाटणी करून सनदापत्रे घेऊन आपल्या घरास आले मग त्यांचे पोटी नागोजी माहाले जाले ते येसाजीचे बंधू शिवजी गोपिनाथ असे कारभार करीत होते असे कितेक दिवस चालत होते मग सर्जाराव मेले नंतर मताजी नाइकाचे पोटी नागोजी नाईक जाहाले येणेप्रमाणे करिणा जाहाला असे

---

## २२ गोळवलीकर- पाध्ये

ले. ३३९ श्री. श. १२८५

श्री । + । श्री साम्रा । ज्यधुरीणस्य व । + + की कळात्म । सामराजस्य मुद्रे । यं भानिधर्माभि । वर्धिनी । ( आठ ओळींचा गडूच्या आकाराचा शिक्का. )

स्वस्ति श्रीशालिवाहननृपतिशके पंचाशीत्यधिकद्वादशशत १२८५ प्रमिते वर्तमाने शोभकृत् संवत्सरे चैत्र शुद्ध प्रतिपदि श्री यदुकुलावतंसीभूतस्य श्रीतोल्लाया

धुरंधरस्य प्रकाशिताखिलधर्मस्य निखिलमहीमंडलमंडनीभूतानवद्यविद्या महापीठ समाश्रिताभ्यर्हित साम्राज्यलक्ष्मसिंहासन छत्राधीश्वरस्य श्रीरामराजस्य निजवश-वर्तितसह्याचलप्रत्यकूपरिसरवर्ति तळकोंकणाभिद्जनपदांतस्य लवणसिंधु संगत-नदीकूलस्थितक्षारपत्तनप्रमुखसार्धसप्तशतग्रामाधिकृतस्य वेंकटापाभिधस्य तथा श्रीमातुलिंगोपाभिद्रंगनायक देशमुख्यस्य तथा तत्तद्ग्रामाधिकृतानां लेखकानां तथानेकशिल्पोपजीवि-मुख्यानां श्रेणीनां चेदमप्रतिहत शासनपत्रं वरीवर्ति। यथा चिरंतन संगमेश्वर ग्रामनिवासि गोळवल्लीकरोपाभिद् राघोपाध्यायपुत्रो भास्करो-पाध्याय नामार्थी राजधान्यां धर्माधिकरणं प्राप्याहमाधर्षितोस्मीत्युक्तवान् । ततश्च प्राड्-विवाकाभिः कस्मिन् विषये कथं केन धर्षितोसीत्यादिपृष्टे भाषामुक्तवानित्थं । पूर्वं मत्तः पितृपितामहप्रपितामहादिपरंपरागणनया एकपंचाशत्तमाय अस्मत् पूर्वजाय काश्य-पान्वयाय भास्करोपाध्यायाय श्री विक्रमार्कान्वयेन सत्येश्वराभिधराजेन आदेवमंदिरा-द्देवमंदिरं सह्यभूद्वरात् द्विपंच्याशन्नदीया वज्राशिवाचिग्राममंडलमिति सीमोपलक्षित पंचाशीत्युत्तरशत संख्यानां ग्राम खेट खर्वटानां धर्माध्यक्ष ज्योतिष रूपाधिकारो जलधारापूर्वकं चिरंतनजीवनाय दत्तः। स च एतावत् कालपर्यंतं मद्बाधिकैर्भास्करो-पाध्याय वंशीयैरप्रतिरवं [हतं] प्रायशो बोभुज्ये। अथ मदीये पितरि रघुनाथोपाध्याय शर्माणि धर्माध्यक्ष जोतिषवृत्तिं भुंजाने एक त्रिंशाधिकद्वादशमिते शालिवाहनशके सौम्यशरदि वर्तमानायां तलघोसालप्रांतवासि गणेश ज्योतिषि कांगजो नारायण ज्योतिर्वित् स्वकुटुंबजीविकाकार्श्यमसहमानो ग्रामंग्राममटन् संगमेश्वरग्रामे मत्पि-तृसविधमेत्य स्वीय सुजनतामाविष्कुर्वन् निजवृत्तिरुशतादिसर्वं वृत्तमावेदयति स्मा ततश्च मत्पिता नारायण ज्योतिर्विदुक्ताखिलवृत्तांतमाकर्ण्य तत्प्रदर्शितस्वसुजनतां स्ववृत्त्यु-पयुक्त तदभिज्ञतां चाकलय्य भोजनादिना सत्कृत्य तं स्वीयमिव मन्यमानोऽनुदिन-स्नेहर्धिमावहन् निजधर्माधिकरण ज्योतिषाधिकार प्रकारं क्वचित् क्वचित् नारायणेनैव कारयामास । नारायणोपि मत्पितुराज्ञामनुपालयन् अनुक्षणमधिकं स्नेहमावहन्न-स्मत्पितृसंनिधावस्ति स्मा एवंच वर्षद्वयमिते कालेतिक्रांते नारायणज्योतिर्विन् मत्पितरं रघुनाथं पृच्छतिस्म भवदनुज्ञया स्वकुटुंबं परामृश्य मासद्वयेनागमिष्यामीति । ततश्च मम पिता मासद्वयादर्वागेव स्वकुटुंबेन सह त्वया आगंतव्यामिति नारायणमादिष्टवान् । ततः नारायण ज्योतिर्वित् पत्निपुत्रत्रय समेतोऽस्मत्पितृसमीपमागत्यतदाज्ञया पूर्ववदा-स्तेस्म । ततोन्यतरस्मिन् वर्षे नारायणानुजः कूर्मज्योतिर्वित् पत्नीसुतद्वययुतो जीवनवृत्तिहेतुना संगमेश्वरग्राममागत्य स्वबंधुनारायणानुमत्या क्वस्थातव्यं कुटुंब-भरणादि कथं कर्तव्यमित्यादिविषयं मत्पितरं पृष्टवान् । ततो मज्जनकेन रघुनाथेन गणेशनायको देशमुख्यः प्रार्थितो । अयं ब्राह्मणोनुपपन्नः कुटुंबी भवतामाश्रयं कांक्षमाणो भवद्भिः स्थापनपोषणादिनोपकर्तव्य इति । अथ देशमुख्य गणेश नायकेन तदवधार्य श्रीलक्ष्मी केशव पुष्पवाटिकैकदेशे स्थापिते कूर्मज्योतिर्विदि

कतिपयेष्वहस्स्वतिक्रांतेषु च नारायणेन मत्पिता रघुनाथः पृष्टः मयास्वस्य बंधोश्च कुटंबं कथं भर्तव्यामिति । अनंतरं मत्पित्राप्याादिष्ट संगमेश्वरग्रामस्थ ब्राह्मणेतर जातिगृहे विवाहादिषु यावद्रूत्पद्येत तद्दस्मत्तः कुटुंबभरणाय त्वया गृहीतव्यमिति एवं प्रकारेण तदाज्ञावर्तित्वेन स्थितयोस्तयोरन्यो बंधुः कृष्णज्योतिषकाख्यः स्वकुटुंब-पुत्रत्रयसमेतः समागतः। सोपि पूर्ववत् गणेश देशमुख्याय आवेदितः। तेनापि कूर्म-ज्योतिषिकवत् स्थापनादिनोपकृतः। एवंच सप्त वर्षेष्वतिक्रांतेषु रघुनाथो मम पिता पुत्राद्यभावेनातिनिर्विद्य श्रीवाराणसीं जिगमिषन् स्वपूर्वज-वृत्तिं तत् स्त्रस्तरे दाया-देष्वेव भुंजानेषु स्वानुभूयग्रामाणांमध्ये कांश्चित् ग्रामान् कृष्णाभिद् दायादे निक्षिप्य संगमेश महाबल शिवन कौसुंब धर्मपुर संज्ञक पंचग्रामान् नारायण प्रार्थनयात स्नेह-यंत्रिततया च महाजनसमक्षं नारायण ज्योतिर्विदि न्यासरूपान्निक्षिप्य पंचग्रामोत्पन्न धनार्धं अनुवर्षं अस्मन्निमित्तं त्वया वाराणसीं प्रेषितव्यमिति नारायणेन सह समयं-कृत्वा पुनश्चाहं वाराणसीतो दिष्टतः समागतश्चेत पंचग्रामांस्त्वतो ग्रहीष्यामि यदि पुनर्मय्यनागते तर्हि संगमेश प्रभृति पंचग्रामाः कृष्णदायादाधीनाः कर्तव्या इत्यपि संविदं कृत्वा पत्नी द्वितीयो वाराणसीं प्राप्य यात्राविधिं समाप्य महाक्षेत्रे वसतिस्म ततोन्यस्मिन्वर्षे नारायण ज्योतिर्विदपि वाराणसीं जिगमिषुर्मत्पित्रायत्तीकृत संगमे-शादि पंच ग्रामान् स्वबंधुद्वयायत्तीकृत्य स्वयं महाक्षेत्रं प्राप्य यात्राविधिं कृत्वा मत्पितृसन्निधानेन मासदशकं स्थित्वा पंचग्राम-संबाधि समयोक्तं धनं मत्पित्रे समर्प्य पुनरप्येवं यथा कालं प्रापयिष्यामीति मत्पितरं उक्त्वा संगमेशग्रामं येत्य कदाचिन्मत्पित्रे सामायिकं धनं प्रापयन्नपि राघोपाध्यायेन पंचग्रामाः कृष्णार्पणबुध्या वाराणस्यां मह्यं दत्ता इति कांश्चिन्मदीय दायादान् प्रतार्य कांश्चित् क्रयं दत्वा गृहीता इति वदन् । स्वयं बंधुद्वययुतःकूटसाक्षी मतेन पंचग्रामान् वर्षनवकं भुंजानो निधनं गतोऽनुवच्छरं कुर्मज्योतिषिकः ततः कृष्ण ज्योतिषिकोपिच । मत्पित्रा तु वाराणस्यां विवाहांतरेनुष्ठिते ततः सप्तवर्षांते मय्युत्पन्ने अनंतरं वर्षचतुष्टयेन पंचताप्रापि । अथानुगतायां मन्मातर्यहं स्वमातामह गृहे वर्धितस्संस्कारितोप्या पितश्च तत्रैव पंच त्रिंशद्वर्षाण्यतिक्रांतः संप्रति मातुलोपदिष्ट निज सर्व वृत्ति वृत्तांतः स्वपूर्वजार्जित भूमिमागत्य पुनः स्वदायादेभ्योन्येभ्यःस्थविरेभ्यश्च चिरंतन वृत्तिविषयक पत्रादिभ्यश्च विदित निजपूर्वजार्जित धर्माध्यक्ष ज्योतिषाधिकारोदंतः संगमेशप्रभृति पंच ग्रामवृत्तिं नारायण कूर्म कृष्ण ज्योतिर्वित् पुत्रान्भुंजानानालोक्य सर्वजनसमक्षं तान्न्यषेधमिति। मत्पूर्वजार्पित ग्रामाः भवद्भिरतः परं न भोक्तव्या इति वारंवारं निषिद्धया अपि मया ते स्वार्जवभावेन सर्वजनान् वशीकृत्य केषांचित्कूट-वादिनामनुमतेन नैतेधुना तव ग्रामाः त्वत्पित्रा रघुनाथेन मत्पित्रे नारायण ज्योतिर्विदे वाराणस्यां स्वत्वनिवृत्तिपूर्वकं दत्ता इति प्रविवदंति स्म बहुशः। एवं चाहमपि वर्षद्वयं तैर्वावदूकतयामामगणयाद्भिः सहविवदमानोपि पंचग्रामानलभमानोतः-

परं स्वपितृवृत्तिं धर्मत उपलब्धुमीहमानो धर्माधिकरणं प्राप्तोधुना श्रीमहाराजै राजपुरुषैश्च लिखितादिप्रमाणतो मदीयां वृत्तिं भावयित्वा मह्यं दापनीया ॥ अथैतद्भास्करस्य प्रतिज्ञारूपभाषितं सभ्यैराकर्ण्य पत्रे लेखयित्वानन्तरं मुद्रया पुरुषैश्च नारायण ज्योतिर्विदादि बंधुत्रयस्य षट् पुत्रेषु गणेशराम नृसिंह हरिकेशव वासुदेवाभिधेषु धर्माधिकरण मानितेषु व्यवहारः प्रवर्तितः । तत्र प्रथमं भास्करोक्त प्रतिज्ञां तन्मुखेनैव प्रत्यर्थिनो नारायणादि बंधुत्रय पुत्रान् गणेशादीन् श्रावयित्वा पुनः पत्रे निवेश्यानंतरं गणेशादयः षट् बंधवोप्याज्ञप्ताः भवद्भिर्मनः कूटतां वाक् छलादिकं च विहाय यथावृत्तमेवावेद्यः स्वामियोगः परिहर्तव्यः इति । ततस्ते प्रातर्वदिष्याम इति प्रतिज्ञाय निष्क्रांताः । अपरेद्युस्तेषु चतुर्ष्वेव नारायण कूर्म पुत्रेषु गणेश राम नृसिंह हरिषु धर्माधिरणमागतेषु सभ्यैर्वक्तव्यं स्ववृत्तमित्युक्ते तैः प्रत्युक्तं यथा । तलघोसालप्रांतवासिगणेशज्योतिषिकांगजो नारायणेत्यारभ्य पंचग्रामान् न्यासरूपान्नारायणे ज्योतिर्विदि निक्षिप्येत्यादि मत्पितृसंन्निधानेन मासदशकं स्थित्वेत्यंतं भास्करोक्त वृत्तांतं सर्वं सत्यमित्येव संप्रतिपत्यानन्तरं विषयान्तरमेव प्रत्यवस्कंदान्तमासरूपमूचुर्यथा भास्करोपाध्याय पिता रघुनाथो वाराणसीमधिवसन् अस्मत्पितृ नारायणस्यातिपरिचर्यया परितुष्टः तत्प्रीतियंत्रितश्च पंचापि ग्रामान् श्रीकृष्णार्पणबुध्या स्वत्वनिवृत्तिपूर्वकमस्मत्पित्रे नारायणाय ददाविति । अत्र प्रमाणं किमिति मध्यन एव पृष्टे साक्षिणः संतीति प्रत्यूचुः तच्च वृत्तं तत्क्षणमेव सभ्ये पत्रे समालेखि । अनंतरं कृष्ण ज्योतिर्वित्पुत्रौ केशव वासुदेवौ पृथगानीय पूर्वानुसार्य सभ्यैः प्रकृत व्यवहार विषयो वक्तव्य इत्यादिष्टावूचतुस्तदपि-यथा तलघोसालप्रांतवासि गणेश ज्योतिषिकांगजो नारायणेत्यारभ्य पंचग्रामान् नारायणज्योतिर्विदि निक्षिप्येत्यादिमात्पितृसन्निधानेन मास दशकं स्थित्वेत्यंतं भास्करोक्तोदंतं सत्यमित्येवांगीकृत्यानंतरं स्वबंधूक्तं वैपरित्येन वृत्तमुक्तवंतौ तदपिचैवं भास्कर पिता रघुनाथो वाराणसीं वसन् अस्मत्पितव्येण नारायणेन प्रार्थित एवं भवतांवह्वी वृत्ति भवदाश्रयेण बहवो जीवंति वयमप्येतावत्कालं भवदाश्रयेण जीवामोतः परमपि जिजीविषामश्चात उपरिष्टादस्मदधीनाः पंचग्रामाः संति तेस्माकं सत्वनिवृत्तिपूर्वकं भवद्भिर्दातव्या इति । अनंतरं रघुनाथेन एवं न घटत इति वारंवारं उक्ते नारायणेन पुनरुक्तं पंचग्रामाणां मूल्यं गृहीत्वास्माकं देया इति तदानीं रघुनाथेनांगीकृत्ये मूल्यं दत्वास्मत्पितृव्येण नारायणेन पंचग्रामा गृहीताः किमत्र प्रमाणमिति सभ्यैरुक्ते रघुनाथहस्तात्पत्रं गृहीतमित्युक्ते पुनः कियन्मूल्यं दत्तमिति पृष्टे वासुदेवेनोक्तं न जानीम इति । केशवेनोक्तं पत्रे लिखितमस्तीति एवं पूर्वबंधुभिरुक्तं विप्रकर्तिनीतवंतौ ॥ सभ्यैरेतदप्याकर्ण्य पत्रे निवेश्योभयेषामर्थि प्रत्यर्थिनां प्रतिभुवौ गृहीत्वा अन्यतरेद्युरुभयेषां साधनेषु विचारितेषु भास्करेणाभ्यधायि यथा । अहं वृत्तीमद सत्येश्वर नृपदत्त ताम्रपत्राणि तदर्वाग्भूत तत्तत्सत्तापुरुषपत्राणि च धारयामि भोगश्चापि संततो प्रतिरवश्च मत्पूर्वजानामेव मदीय जनक रघुनाथस्य श्रीवाराणसी प्रस्थानकालमारभ्य मज्जन-

कस्य न्यासभूता एव एभिः प्रत्यर्थिभिः पंचग्रामा भुज्यंते मदुक्तविषयेवृत्ती सीमांस्वत-देशवर्तिनः तत्परिसरदेशवर्तिनश्च विद्वांसो देशमुख-प्रभृतयस्तत्तज्जातिग्रामण्या-दयो बहवः साक्षिणः संति । अनंतरं गणेशादि षड्भिः पुनः पूर्वोक्तस्य विपरीतमेवोक्तं यथा उक्तविषये पत्रं तु वयं न धारयामः भोगस्त्वेतावत्कालिकोस्त्वेव साक्षिणोपि द्रष्टव्या इति ततश्च सभ्यैर्मुद्रा-पुरुषैश्च भास्करनिर्दिष्टान् विद्वत्प्रभृति ग्रामण्यंतान् रंगनायक देशमुख प्रहित स्वप्रतिनिधि यादवनायकं प्रसंगांतरेण राजधानीमागतं देवलग्राम तत्परिसग्राम ज्योतिषवृत्त्यधिकारिण मोघोपनामानं महादेव ज्योतिषिकं च धर्माधिकरणमानीय उभयेषामर्थप्रत्यर्थिनां विवादविषयः श्रावितः अथ पुनः सभ्यैः प्रथमं भास्कर-प्रदर्शित ताम्रपत्रादीन्यालोक्य वारंवारं वारं परस्परमूहापोहपूर्वकं सम्यग्विभावनया अर्थि भास्करस्य शुद्धागमे निश्चिते पश्चादगमकालमारभ्य भास्कर-जनक रघुनाथावधिक पंचविध लक्षण लक्षित भुक्तोन्वसर्वानुमतेन निश्चितायां पुनश्च भास्कर-निर्दिष्ट साक्षिण आमंत्र्य ये च पापकृतां लोका इत्यादि धर्मवचनं श्रावयित्वा अर्थिनो भास्करस्य गणेशादिषण्णां प्रत्यर्थिनां च संगमेश्वराद्युक पंचग्रामसंबंधिधर्मा-ध्यक्ष ज्योतिष-वृत्तिविषये विवदमानानामुक्तवृत्तिविषयकवृत्तं भवतां विदितमस्ति चेत्सत्यं ब्रूते त्याज्ञप्ताः साक्षिण ऊचुरेवं । उक्तनकारकसीमांतरवर्तिग्रामाणां धर्माधि-करण ज्योतिषरूपवृत्तिः श्रीसत्येश्वरराजेन इदानींतनभास्कराभिधपूर्वजाय भास्करो-पाध्याय पुरं दत्ता सा च दानकालमारभ्य भास्करोपाध्याय वंशजैरिदानींतनभास्कराव-धिकैः सततमप्रतिरवं भुज्यते इति पूर्वजेभ्यः श्रुतवंतो वयं च स्वजन्मारभ्य दृष्टवंतोपि च किं च संगमेशप्रभृति पंचग्रामास्तु इदानींतन भास्कर पित्रा रघुनाथेन वाराणसी-यात्रा प्रस्थानावसरे आप्ततमत्वेन लक्षिते नारायणज्योतिर्विदि स्वाज्ञानुवर्तिनीति न्यास-रूपाः प्रक्षिप्ताः इत्यपि जानीमः अन्यच्च तदानीमेव रघुनाथेनोक्तं यद्यहं वाराणस्याः प्रत्ये-षामि तर्हि त्वत्तः स्वीय पंचग्रामान्संगमेशप्रभृतीन् गृहीष्यामि यद्यहं नागतस्तदात्वया पंचग्रामाः मदीयदायाद कृष्ण संज्ञः काधीनाः कर्तव्या इति रघुनाथेन नारायण ज्योतिर्विदमुक्तं तदपि विद्मः । अथ राघोपाध्याये दिवंगते नारायणज्योतिर्विदादि बंधुत्रयं पुत्रैर्गणेशादिभिः पंचग्रामा भुज्यंते यत् तदपि रघुनाथदायादानां बहु कार्यां-तराकुलत्वेन उपेक्षया तदन्येषां ब्राह्मणत्वेनोपेक्षयेत्यपि विद्म इति सत्यं । अथ सभ्यैः साक्षिवचनान्येतानि श्रुत्वातिषां सारासार-भावविवेके न सत्यत्वे प्रतीयमाने भास्करेणापि स्वपत्रभाषोक्तमर्थमंगिकारितेषु गणेश ज्योतिर्विदादि षड्बंधुषु पुनश्च सभ्यैः साक्षिविषये बहुशः पृष्टास्ते गणेशादयः किंचिदपि नोचुः । अथ केशव वासुदेवौ प्रतिज्ञात पत्रविषये पृष्टौ अनंतरं नास्तिपत्रमित्युत्तरतः तेषां प्रत्यर्थिनां सर्वथा पत्राभावे चावगते रघुनाथ-निदेशेन कृतभोगस्यापि स्वत्वे प्रमाणाभावेवगते पुनः प्रतिज्ञातार्थ विषयक साक्षि विषये पृष्टा गणेशादयः साक्षिणोप्युपस्थापयितुं शन्कुवंतः चूर्णीभावमेवांगीचक्रुः ॥ एवंच भास्करस्य लिखितादि शुद्ध प्रमाणत्रयो-

पलब्ध्या सत्यव्यवहार इति निष्कर्षः सर्वसंमतः गणेश ज्योतिर्विदादिनां तु प्रमाण-त्रयानुपलब्ध्या मिथ्या व्यवहार इति सर्व संमत्या निश्चयः समजनि । अथ भास्करस्य जयपत्र-लेखे गणेश ज्योतिर्विदादीनां दंड प्राप्तावपि दंड्यास्युर्ब्राह्मणादृत इति सामान्यशास्त्रतो दंडाभावे समादिष्टे प्रतिभुवोर्मुक्तो चाज्ञप्तायां गणेश ज्योतिर्विदादि षट्बंधुभिः निर्वेदादिव देशमुखप्रतिनिधियादवनायकः संगमेश निवासि तत्तज्जाति ग्रामण्यादयश्च स्वजीविका विषये प्रणयपूर्वकमुक्ता एवं। एतावत्कालं पंचग्रामान् भुंजा-नैरस्माभिः स्वकुटुंबभरणं कृतं अधुना निरस्तजीविका कथं जीविष्यामः । सर्वसन्यस्य ग-मिष्यामः प्राणान्वा त्यक्ष्यामः इत्यादिना तैर्यदिव प्रभृतिभिस्तदाकर्ण्य प्राड्विवाकाद्यनुमत्या भास्करोपाध्यायमाहूयोक्तमित्थं गणेश ज्योतिर्विदादयो युष्मत्पूर्वजाश्रितः भवंतोपि सर्वशो महांतो तये ते भवद्भिरनुपालनीया एवेत्यादिना यथायथं सांत्वपूर्वमुक्त्वा नंतरं संगमेश्वराख्य ग्रामस्य धर्माध्यक्ष ज्योतिष सत्ता गणेशादिभ्यो देयेत्युक्तं भास्करेणैतदाकर्ण्योक्तं गणेशादिभ्यः सकाशात्संगमेश प्रभृति पंचापिग्रामानिष्काशिताः अतः परं भवतां कृते संगमेश्वरं विनाग्राम चतुष्ट्यान्यतम एकोग्रामः गणेशादिभ्यो दीयेतेत्यंगीकृते पुनश्च सर्वैः संगमेशाख्य एव एको गामोदेय इति भास्करेण प्रस-ह्यांगीकारितुमारब्धे सर्वेषां संकोचानुल्लंघ्य तामालक्ष्योक्तवान् भास्करः । भवन्नि-मित्तं देशमुखग्रहमंतरेण संगमेशग्रामसंबंधि ज्योतिष मात्र वृतिः गणेशज्योतिर्विदादि बंधुभ्यो दत्ता किं च संगमेशग्रामसंबंधि धर्माधिकरण वृत्तिः देशमुख्य ग्रहसंबंधि ज्योतिषवृतिश्च न दत्ता । एवं चिरंतन लिखित भुक्ति साक्षिभिः प्राड्विवाकायनु-मत्या निर्णीय लिखितमिदं जयपत्रं । अतः परं भास्करेण स्वपूर्वज परंपरागता पूर्वोक्त सीमांतर्वर्ति ग्रामाणं धर्माध्यक्ष ज्योतिषरूपावृतिः संगमेशग्रामसंबंधो धर्माध्यक्ष वृतिः देशमुख्यह्ग्रसंबंधी धर्माध्यक्ष ज्योतिषवृत्तिश्च स्वपुत्रादिवंशपरापरयोपभोक्तव्या गणेश ज्योतिर्विदादिभिः संगमेशग्रामसंबंधि ज्योतिशमात्रं देशमुखग्रहमंतरेणोपभोक्तव्यं नान्यत्रेषांसंबंधः । एवं कृतनियमानतिक्रमेण स्वस्ववृर्ति भुंजाना यथैते परस्परं न विवदिष्यति तथा वर्तितव्याः नियममतिक्रामंतो यथायथं दंडनीयाश्चेति ।

'शोभ । त लेखम । र्यादा'। ( ३ ओळींचा मोर्तब )

---

**ले. ३४०** शके १५२२
इ. स. १६००

छ श्री तीर्थसमदरुशन वेदशास्त्रसपन्न राजश्री दामोदर पाध्ये व राघो पाध्ये व पनो पाध्ये उपनाम गोळवलीकर साकीन कसबे सगमेस्वर गोसावी यासी कानोजी राजे प्रभाणवलीकर दंडवत सुहूर सन ईहीदे आलफ लिहावया कारण तुम्ही शृंगारपूर राजधानसि येऊनु आम्हापासी विदीत केले जे, आपले वतन कदीम जोतीष व धर्माधिकरण व देशोपाध्यपण आस्टाधिकार आज मौजे देवघर तपे

तुजारपूर मामले मुजाफुराबाद ऊर्फ प्रभोल व किले खिलणा तह्द मौजे देवघर मामले हमजाबाद आमल बंदर मेमून मुस्तफाबाद ऊर्फ दाभोल व मौजे सिरबाव नदी सह्याद्रिघाट बुडाखोले पिढी दर पिढी मिरास मात कदम चालिले व हल्लीं चालते यामध्ये कसबा सगमेश्वर येथील जोतीष व ग्रामोपाध्येपण सरदेशमुखाचे घर खेरीज करून जोसी कसबे मजकूर यांचे चालत आसे यामध्ये राघो पाध्ये यांचा वंत* बाव नदीपासून सोनवी नदीपावेतो व पनो पाध्ये याचा वंत गड-नदीपासून गिमवी देवघर पावेतो व दामोदर पाध्ये यांचा वंत सोनवी नदीपासून गडनदीपावेतो एकून गाव पुरातन १८५ एकसे पंच्यासी वृत्तीचे गांव बहूत चाल-वायास पुरुष थोडे राघो पाध्ये व पनो पाध्ये आशक्त वृत्तीत शुद्र गाव फार उभयेतांचे पुत्र कांहीं गावी वृत चालवायास जातात कितेक गावी मुतालीक ठेऊनु चालवितात त्यास कितेक मुकासी नूतन भट टेऊऊन कार्यप्रयोजन करावितात यामुले वृतीचा (मराठी अस्पष्ट शिक्का) अपाहार होतो व दामोदर पाध्ये आपण आपला वंतवृत चाल-वीत आलो आपण महायात्रेस पुत्र अतो पाध्ये घेऊनू गेलो ते नवा वर्षी स्वदेशास आलो मागे लोकी वृतीचा उपमर्द केला जे साप्रत वेदमूर्ती विस्वनाथभट व हरीभट व वासुदेवभट राजपुरोहित यानी शृंगार-पुरी सरकारी कारकून व चाकरमाने आहेत व ता। संगमेश्वर येथे कारकून चाकर-माने आहेत यांचेथे आमचे उपाध्यपणाचे मानाविसी जोरावारीने कलह आरंभिला आहे आमचे चालो देत नाही व मौजे कोलथे व आबोवु बु।। व वाडा वानेरी व मजरे चादीवणे ता। मजकूर या गांवी देवरुखे लोक राहातात त्यांचेथे जोतीष व धर्माधिकरण व उपाध्येपण आमचे आम्ही चालवीत आलो सांप्रत देवरुखे आम्हास म्हणतात की आमचे घरीं भोजन कराल तरी आमचेथे उपाध्यपणादिक सर्व कर्मे तुम्ही चालवा भोजन न करा तरी आमचे घरी येऊ नका व मौजे फणसवणे ता। मजकूर या गांवी ज्योतिष व धर्माधिकरण आमचे आम्ही चालवितो श्रीजोखमाता देव कोंड मोजे मजकूर येथे कसबा संगमेश्वर येथील कोणी विरला लोक येवुनु राहिले तरी कसबा मजकूरचे जोसी येवुनु उपाध्यपणाकरितां कज्ज्या करितात अशास आपण राजे धर्मपरायेण असतां वृतीलोप होतो हा धर्म नव्हे आमचे पुरातन वृत मनास आणून काये आज्ञा ते केली पाहिजे त्यावरून राजश्री केशव नायेक व सांम नायेक सर देसाई व महा-दाजी विष्णू सरदेशकुलकर्णी मामले मजकूर या हुजूर भले लोक व शिस्ट ब्राह्मण व गांवगंन्ना खोतू मरूतसर यांस आणिले बि।।

रघुनाथ जोसी प्रभाणवलीकर , विस्वनाथभट सप्रे

केशवभट आठल्ये उपाध्ये व विस्वनाथभट व हरिभट व

---

१ प्रथम ' चालवाया ' असे होते ते गिरवून ' चालवीत ' असें केलें आहे. * वत=वाटणी

| | |
|---|---|
| धर्माधिकरणी तपे देवले | वासुदेव भट पुरोहित |
| वामन जोतिषी व आनंत जोतिषी | रामेश्वरभट पुरोहित सोनवडे |
| कसबा संगमेस्वर | नरसीभट गर्दे नादलज |
| रवलो कृष्ण सरसबनिवीस सरकार | केशवभट गर्दे किरडुवे |
| विठल राम चिटनिवीस सरकार | तिमाजी गणेश पानवलकर |
| केसो त्रिमल सेखदार कुलकर्णी | मौजे केवले |
| मौजे किरडुवे व वाईगणे व ना-दलज आह्मेडुबा। कोलदेव | केसो त्रिमल खाडेकर मोका-सी वाडा सोनगिरा मौजे कोल्हे |
| वाडा वानेरी व मजरे चादिवणे | तानाजी हरिद्रा व तावेडी मासरग |
| फतेखान मोकासी कोडिवरे | पुरखोवा आवेकर मौजे धामणी |
| धर्म सावत तिवरेकर | सोमाजी घोसालकर मोकासी |
| हरसेट सेटिया का। संगमेस्वर | कोड मौजे कडवई |
| हुसनजी नाखवा मोकादम | भान प्रभु डिगणकर खोत |
| का। संगमेस्वर | गोविद केशव मुल्या उचगांव |
| बहिरोजी सुर्वे मोकासी मौजे | रामोजी आदटराव मोकासी |
| कुंभारखणी बु॥ | मुरडूव |
| लखमोजी सुर्वे मोकासी मौजे | विठल प्रभु मुल्या व गोविद |
| कुमारखणी बु॥ | प्रभु मुल्या मौजे आंबडू बु॥ |
| दामाजी हरी व जानोबा दा-मोदर काळा आवारी मौजे कोलबे | कान प्रभु डाग्या वाडा वानेरी |
| विटोवा मोना मौजे कोलंबे | |

यांपासी हकीकत मनास आणितां व तुम्हा जवलील कागदपत्र पाहातां पुरातन सदरहू वतन तुमचे पूर्वी राजा सत्येस्वर याचे कारकीर्दीचे ताम्रपटे व विद्यानगरचे राम राजाचे पत्र व हाली विजापूरचे फर्मान व आमचे वडील राजश्री राजे गोसावी याची पत्रे व खुर्दखते भोगवटियाची पाहातां आजपर्यंत वतन तुमचे चालत आले आहे व मारनुले सरदेसाई व सरदेशकुलकर्णी व गांवगनाचे खोत व मिरासदार मरूतसर याही सागितले जे सदरहू वतन किदीम गोललीकर उपाध्ये याचे पिढी दर-पिढी भोगवटा चालत आला आहे यांपासी कोणी कजिया करावा ऐसे नाही या उपरी त्रिवर्ग पुरोहित यांस पुसिलेवर ते बोलिले जे आम्ही राजपुरोहीत याकरितां सर-कारी कारकून व चाकरमाने यांचे उपाध्यपण आमचे त्यावरून कारकून व चाकर-माने यांसी हकीकत विचारितां त्यांणी सांगितले जे आज पांच सात वर्षे पुरोहित

कजिया करितात गोलवलीकरहि येतात भांडण होते परंतु आमानत ठेऊनू कार्य करितो त्यावरी देवरुखे यांसी हकीकत विचारिली जे उपाध्ये यांचे वतन आजपर्यंत चालत आले आसतां नवा भोजनाचा आग्रह करून वतनास व्याक्षप काये म्हणुन करितां त्यावर ते बोलिले जे वतना करितां व्याक्षप आम्ही करीत नाही आमच्या घरी आनुष्ठान करून आन्यत्र भोजनास जातात घरीं श्वयेपाकहि करून भोजन करीत नाही याकरितां आम्ही खेदी होऊनू नेणतपणे बोलितो परंतु ते प्रमाण नाही वतन गोलवलकर उपाध्ये याचे खरे चालत आले आहे याउपरी कोड फणसवणे येथील मिरासदार व गुरव यास आणून हकीकत वामन जोशी व आनंत जोशी यासमक्ष पुसिले त्याणी सागितले जे कोड मजकुरी कसबा संगमेस्वर येथील लोक विरळा येऊनू राहातात म्हणोन जोशी त्यांकडे येऊनू उपाध्यपण चालऊ म्हणतात परंतु गोलवलकर यांचे सर्व गांवात आजिपर्येत चालत आले आहे पुरातन वतनदार गोलवलीकर आहेत त्यावर जोसी यांस हकीकत विचारितां बोलिले जे कसबे याचा देव त्या गांवी याकरितां देवानजीक कसबेयातील राहून कार्यप्रयोजन करितील तेथे आम्हास मान काही आसावा म्हणोन तरी सर्वांच्या मते वृती पुरातन गोलवलीकराची असतां दुसऱ्या गांवीचा येऊनू मान घेईल तेव्हा वतनदाराचा लोप होतो व येका गावीची ग्रामदेवतां दुसऱ्या गांवी आसते बहुतां गांवास येक देवता आसत्ये परंतु देवाची निसबत लाऊनू उपाध्यपण घ्यावे हे पांचाचे मते इनसाफीं नव्हे ज्या गांवीचा जो वृतीवंत त्याणेच घ्यावे कसबेयातील जोशी यांस तेथे यावयास संमध नाही जोसी यांस ताकीद करून तुमची वृत निर्विवाद चाले ऐसे केले आहे तेथील मानपान घेणे तो तुम्हीच घेत जाणे जोसी यानी याप्रमाणे कबूल केले आहे त्याचप्रमाणे पुरोहित सरकारी कारकून व चाकरमाने यांच्या घरीं कज्या करितात त्यास सर्वांच्या मते निश्चये जाहाला की चाकरमाने लोक यांची निसबत सरकारची लाऊनू उपाध्यपण घेऊ म्हणतात परंतु वतनदाराचे वृतीचा लोप होतो याकरितां पुरोहित याणी कज्या न करावा तेथील मान घेणे तो तुम्ही घ्या यैसे सर्वांच्या मते जाहाले त्याप्रमाणे त्यास सांगितले आसे त्याणीहि याप्रमाणे मान्य केले आसे व देवरुखे यांच्या घरी कार्यप्रयोजनाविसी गोलवलीकर उपाध्ये यांपासी काडिमात्र आनसारिखी वर्तणूक न करणे यैसी ताकीद केली आहे व मुकासी लोक भलत्याचे हाते कार्य प्रयोजन करितील तरी त्यांसहि ताकीद केली आहे यांउपर सदरहू वतन जोतीष व धर्माधिकरण व देशोपाध्येपण आस्टाधिकार तुमचे वतनविशई मान बितपसील

आचार बेव्हार प्रायेश्चित संकल्प
निबंध पूजा आद्य गोदान
ब्रह्मदंड आंत्य गोदान

लग्न मुहूर्त गणेश पूजन स्तंभ प्रतिष्टा
घटिकायेत्र कलश ग्रहदान ग्रहजप
पत्रिका ब्रह्मत्व पराण नामकर्ण

माह्वान देवप्रतिष्ठा कुंड मडप
कलशारोपण रुद्रानुस्टान आ-
[ब] ! स्तथाध्यापन वापी कूप-
तडाग आराम अनुस्टान सा-
द्स्य व्रत उद्यापन श्रौत स्मार्ता-
नुस्टान शांतीक पोस्टीक
लक्ष होम कोटी होम आचार्ये-
त्वाग्रपूजन मातृकापूजन

संस्कार आत्यक्रिया गोदान
वृषोत्सर्ग वर्षश्राध या-
खेरीज उपाध्यपणाचे मान
बा भोगोवटा

येणेप्रमाणे पुरातन तुमचे चालिले आसे त्याप्रमाणे आपले पुत्रपौत्रादि वंशपरंपरा उपभोग करून सुखे आसिजे यास जो कोणी इरेइस्कील करील तो देवब्राह्मण द्रोही पंच महापातकी याखेरीज हमजाबाद व तुजारपूर तर्फेत तुमचे वतनाचे गाव आहेत तेथे काही मुकासियाणी वगैरा लोकी नवेच ब्राह्मण बलाउनू कार्यप्रयोजने करितात त्यासहि आणून त्यांचा इनसाफ सिग्रच केला जाईल या-विसी तुम्ही आपले मन समाधान आसो देणे (जाणिजे शके १५२२ शार्वरी संवत्सरे छ १० माहे रबिलाखर 'मोर्तब' ।* )

---

ले. ३४१ श. १५५८ भाद्र शु. ११
इ. स. १६३६ सप्. १

( मूळ फारशींत सुमारें २८ फारशी शिक्के आहेत )

[ हे फारशी शिक्के ज्यांचे, त्यांचीं नांवें त्यांच्या शिक्याजवळ एकाच लेखकानें फारसींत लिहून ठेविलीं आहेत, नंतर त्याखालीं मोडींत त्या त्या अधिकाऱ्यांनीं आपल्या सह्या केल्या आहेत. कारण सहींचें अक्षर वेगवेगळें आहे. सह्यांच्या जवळ

---

१ कोंकणांत शके १४५० च्या सुमारास देवरुखे आणि कऱ्हाडे–चित्तपावन यांत एका क्षुल्लक कारणावरून तेढ उत्पन्न होऊन ग्रामण्य माजलें. या बाबतींत कित्येक वेळां वाद उपस्थित होऊन त्यांत देवरुख्यांकडे भोजनादि व्यवहार करण्यास मुळींच हरकत नाहीं असा निर्णय झाला. व त्याचप्रमाणें हल्लीं सर्वत्र व्यवहार सुरूहि आहे. याचा ऊहापोह रा. पिंपुटकर यांनीं आपल्या 'चितळे भट्ट प्रकर्ण' नांवाच्या छोट्या पुस्तकांत केलेला आहे; तो वाचकांनीं अवश्य पहावा. पेशवाईंत हि या वादानें एकदां उचल खाल्ली होती. तेथेंहि अखेर देवरुखे ब्राह्मणांतर्फेंच निकाल झालेला आहे ( पुरंदरे द. १ ले. १४६ पहा ). त्यामुळें आतां सदर उल्लेखास मुळींच महत्त्व राहात नाहीं [ रु. वा. पुरंदरे ]. * जोडावर याचेच शिक्के केले आहेत.

बारीक अक्षरांत बिन रेघेनें कोणी सह्या कराव्या ह्याबद्दलचे नुसते हुद्दे दिले आहेत.]
महाजर ब तारीख छ ११ माहे रबिलाखर मामले मुजाफराबाद व किल्ले खिळणे सुहूरु सन सब्या सलासीन वा अलफ बि हुजूर हाजीर मजालसी

| | |
|---|---|
| इजत वा रफ्त आत दस्तगाहा मील माह्यमद् कासीम हवालदार मामले मजकूर वा किल्ले मजकूर | शरयत पन्ना काजी अह्ली हकीम शरा मामले मजकूर |

| मामले मजकूर | | किल्ले मजकूर | |
|---|---|---|---|
| हसवरस अनंत पंडित मजमदार | मसुरुल अनाम विठ्ठल नायेक सरदेसाई | गोविंद रुद्राजी मजमदार | रामाजी लिंबाजी थानीब हेजीब |
| आपाजी लखमस बिरादर हेजीब | नरसो एकेथा निबरायेराऊसर सरदेसाई वा सर सरकुलकर्णी | केसो महादेऊ निधावान | केशव नायक सरदेसाई |
| रामाजी पंडित था निंब नाडिगौडा | विष्णो तिमाजी देसकुलकर्णी | गणो हरी सब- निवीस | गोविंद केशव निवीसी ब पोता |
| अंतो खंडेराव् सब- निवीस | केसो देऊजी चिटनीस | बाबाजी कुलकर्णी | मीर आह्यमद् सरगुरो |
| निविसीदा पोता | अबदुल कादीर दबीर | मीर सुकला सरगुन्हो | अदटराऊ नायकवाडी |
| सुलतान अह्ली दबीर | अंतो नरसिह सराफ | भुजबलराऊ नायेकवाडी | गागोजी ह्रिरोजी नायेकवाडी |
| मिरा मोहिद्दीन सर गुन्हो | खानजी मोकादम | यसवंतराऊ नायेकवाडी | अंकुसराऊ नायेकवाडी |
| येसवंतराऊ नायक- वाडी | आलेरावु नायेक- वाडी | बालोजी नायेकवाडी | |
| सुरेराऊ नायेकवाडी | अदटराऊ नायेकवाडी | | |
| बिंब राऊ नायेकवाडी | भुजबलराऊ नायेकवाडी | | |
| कदम राऊ नायेकवाडी | यमाजी जावजी नायेकवाडी | | |

× × × अह्योरा

या हुजूर जाहाला महाजर येसा जे दरिविला अंतो पाध्ये बीन दामोदर पाध्ये वा नारो पाध्ये बीन अनंत पाध्ये गोलवलीकर धर्माधिकरणी वा जोसी अज मौजे देवघर मामले हमजाबाद मुजाफती बंदर मैमून मुस्तफाबाद ताहाद मौजे देवघर तपे तुजारपूर मुजाफती किल्ले मजकूर मालूम केले जे सदरहू बंदप्रमाणे धर्माधिकरण वा जोसीगिरी आपले × डीया ओवून पिढीदरपिढी मिरासी वृति मांत कदम चालिले असे वा हली चालते येसे असतां कृष्ण जोसी कसबे संगमेश्वर हुजूर जाऊन गैरवाका मालूम करून आपले मिरासीस खलेल करून फर्मान हुमायुनू सादीर जाहले तरी आपण कदीम मिरासदार दरिबाब हि हिंदू राजे याचे वेलेचे ताम्रपट्टे हुजनी घरीतासे वा भोगवटा असे खातिरेसी आणून आपणासी माहाजर करून देणे म्हणोन त्यावरी उपाध्ये मजकुराचे मिरासीचे ताम्रपटे कारकीर्दी हिंदू वानी राजे तागायत साल मजकूर १४५२ साले जाहाली असत धर्माधिकरण वा जोसीगिरी याचे मिरास बेसद्दी असे वा याणेप्रमाणे पिढी दरपिढी भोगवटा चालत असे बमोजिब ताम्रपटे उपाध्ये मजकुरासी निसबत असे वा चालत असे कृष्ण जोसी मजकुरासी निसबत नाहीं हा महाजर सही देखील देवघर किल्ले मजकूर (फा. शि.[1])

---

ले. ३४२ श्री श. १५८१
इ. स. १६५९

असल पत्राप्रो रुजू तालिक
राजश्री तुलाजी आगरे सरखेल
( ' श्री शाहु ' तुळाजी आगऱ्याचा अस्पष्ट शिक्का. )

छ श्रीमत् सकलतीर्थसमदरुशनवे वेदशास्त्रसंपन्न राजश्री नारो पाध्ये बीन आतो पाध्ये व केसो पाध्ये बीन नारो पाध्ये धर्माधिकरणी व जोतिषी व अष्टाधिकारी गुणवलीकर मोकाम कसबा संगमेस्वर यांसी सूर्याजी राजे प्रभाणवलीकर दंडवत तुम्ही येऊन विनंती केली की आपली मिरास कदीम धर्माधिकरण व जोसीगिरी व आष्टाधिकार देहाये ता। संगमेस्वर व ता। कोंढिवरे व तपे तुजा(र)पूर तहद मौजे देवघर मामले हमजाबाद आमल बंदर मैमून मुस्तफाबाद वडिलापासून पिढी दर पिढी वर्षे १४७५ चालिले असे वं भोगवटा चालत असे व ताम्रपटे असेत व वृतीचे कागद वडिल राजश्री राजे गासावी याचे होते ते साप्रत मौजे शिवनियामधे ठेविले होते तेथे जलले आपणास दस्तुर पाहिजे म्हणून हुजूर जाऊन वृतीचा फर्मान करून

---

१ जोडावरून दोन निरनिराळे फारशी शिक्के आहेत. एके ठिकाणीं मध्येंच कागदास बरेंच मोठें भोक होतें तें कागद लाऊन बंद केलें अशा जोडावरहि शिक्के दोन केले आहेत.

आणिलात तो तुम्ही आंमासी दाखिविला त्याप्रमाणे आपले पत्र करून देणे म्हणून बोलिलेती आतःकार्णासी आणून बरहुकूम फर्मान हुमायुन व मिसाली ठाणा सनद करून दिल्हे असे तुमचे धर्माधिकरण व जोसीगिरी व आष्टाधिकार व वडीलकी व साधकबाधक व निपुत्रिक देसील दायाद गोलवलीकर मुकरार करून दिले असे उपभोग करून सुखे असिजे आमुचे वडिलानी तुमचे वडिलास सूर्यग्रहणी दत आगर देसील पर्डे व सेत कुलबाव कुलकानूनादी वेठ बेगार फर्मास दर सवाद मौजे गोलवली दिल्हे असे व भोगवटा चालत असे बरहुकूम तुम्हास मोकरार केले असे उपभोग कर्णे तुम्हास पुत्रपौत्री हाच कौल दिल्हा असे पेस्तर कोणी इसकील करील ता पंचमा(हा)पातकी असे सके १५८१ 'लेखन[1] सिमा।' (दोन ओळींचा मो.)

---

ले. ३४३ श्री श. १५८१ आश्विन

इ. स. १६५९ सप्टं. आक्.

छ श्रीमतु सकलतीर्थसमदरुशन वेदशास्त्रसंपन राजश्री नारो पाध्ये बिन अंतो पाध्ये व केसो पाध्ये बिन नारो पाध्ये धर्माधिकरणी व जोतीषी व अष्टाधिकारी गुणवलीकर मो। का। संगमेस्वर गोसावीं यांसी केशव नायेक सरदेसाई मामले बंदर मेमुन मुस्तफाबाद व मामले मु।।वाद व देसाई ता।। संगमेस्वर नमस्कार उपरी तुम्ही येऊन विनंती केली कीं आपुली मिरास कदीम धर्माधिकरण व जोतीषगिरी व अष्टाधिकार देहाये ता।। संगमेस्वर व ता।। कोडीवरे व ता।। तुजारपूर तह्द मौजे देवघर मामले ह्मजाबाद अमाल बंदर मेमून मुस्तफाबाद वडिलांपासून पिडी दर पिडी वरुशे १४७५ चालिले असे व भोगोटा असे ताम्रपटे आहेती वृतीचे कागद वडील नायेक गोसावी यांचे होते ते सांप्रती मौजे सिवनियामध्ये ठेविले होते तेथे जलिले आपणासी दस्तूर पाहिजे म्हणऊनू हुजूर जाऊन वृतीचे फर्मान करून आणिलाती तो तुम्ही आमासी दाविला + + + आपुले पत्र करून देणे म्हणऊनू बोलिलेती अंतःकर्णासी आणऊनू बरहुकूम फर्मान हुमायून व मिसेली ठाणा सनद करून दिल्ले असे व तुमचे धर्माधिकरण व जोतीषगिरी व अष्टाधिकार व वडीलकी व सादक व बाधक व निपुत्रिक देसील दायाद गोलवलीकर मोकरर व मन्हामत केले असे उपभोग करून सुखे असीजे व आमचे वडील नायेक गोसावी यांही तुमचे वडिलास सूर्यग्रहणदत सेत व पाल व पालामधील आगर व कालवा आबा व कवलठा नजीक सेत काठी पालबा कुलबाव व कुलकानूनाती दिले दर सवाद मौजे अम्रुर्डे नजीक बाग तालुक खासा दिल्हे असे व भोगवटा चालत असे बरहुकूम सालाबाद तुमास मोकरर केले असे उपभोग करणे तुमासी पुत्रपौत्रादि का स हा ची कौलू

---

१ हा जोडावर शिक्का आहे.

(फा. शि.) दिला असे व पेस्तर कोणी हिंदू ईरेवे इस्कील करील तो पंच माहापातकी व मुसलमाम इरे इस्कील करील तरी डुकराचे वध व मुसफाचे सेगद असे शक १५८१ आस्वीन

---

ले. ३४४ शके १५८३ माघ वा १२
इ. स. १६६२ जाने. २१

मसुरु हजरत राजश्री पिलाजी निलकंठराऊ सुभेदार नामजाद मामले प्रभावली यांसी सिवाजी राजे दडवत सुहूर सन इसने सितैईन अलफ वेदमूर्ती नारो

श्री शिवन पाध्ये चिन अंतो पाध्ये व केसो पाध्ये बीन राघो पाध्ये व केसो पाध्ये
रपति हर्ष बीन विठल पाध्ये गोलवलीकर साकीन कसबे सगमेश्वर याणी श्रीगार-
निदान साम पुरीच्या मुकामी येऊन अर्ज केला जे आपले मिरास वतन कदीम
राज मतिम धर्माधिकरण व जोतीष व देशोपाध्यपण अष्टाधिकार अज मौजे
त प्रधान देवघर ता। तुजारपूर मामले मजकूर व ता। संगमेस्वर व ता। कोंडि-

वरा मामले मजकूर तहद मौजे देवघर मामले ह्मजाबाद मुजाफत बदर मेमुन मुस्तफाबाद ऊर्फ दाभोल व कसबे संगमेस्वरी धर्माधिकरण व देशमुखाचें घरी जोतीष पुरातन पिढी दर पिढी भोगोटा चालत आला आहे वतनाचे ताम्रपटे कारकीर्दा राजा सत्येस्वर व तुरकांचे कारकीर्दीची पत्रे असेत हाली माहाराजास तल कोंकण अर्जानी जाह्याले आपणासी ताजा सनद पाहिजे व सदरहूप्रमाणे पत्रे दाखविली ये थावे केसव नायेक सरदेसाई मामले मजकूर व आवजी नाखुवा मोकादम कसबे मजकूर व कुक सेट सेटीया कसबे मजकूर व गणोबा किबल व नारोबा करकरा व सोनबा नायवाड माह्मजन कसबा मजकूर याणी अर्ज केला जे सदरहूप्रमाणे वतन उपाध्ये मजकूर यांचे पुरातन चालिले आसे व ह्याली भागोटा असे पेस्तर चालिवणार साहेब धनी आहेत ह्या इलतिमास खातिरेसी आणून सदरहू प्रमाणे वतन उपाध्य मजकूर यासी मोकरर करून हे पत्र तुम्हासी सादर केले असे तरी सदरहूप्रमाणे वतन उपाध्ये यासी बिला कुसूर चालवणे कुसूर न कीजे पत्राची तालिक घेऊन असल पत्र भोगोटियास उपाध्ये मजकूर याजवल परतुन दीजे जाणिजे मोर्तब सुद

'मर्या[3] देयं विराजते' (तीन ओ. मे.)

तेरीख १० जमादिलाखर

---

१ पत्राचा वरील कांहीं भाग फाटला असल्यानें प्रथम श्रीकार वगैरे कांहीं होता की नव्हता हें समजण्यास मार्ग नाहीं. २ 'मोर्तब सुद' हा मजकूर निराळे वळणाचा आहे. ३ ह्या सनदेवर सा। मंत्री सु॥ सुद बार वगैरे मामुली ह्शेरे नाहींत.

ले. १४५ श्री शके १६३१ भाद्र. वा ११
इ. सन १७०९ सप. १८

स्वस्तिश्री राजाभिषेक शक ३६ विरोधी संवत्सरे भाद्रपद बहूल येकादसी

| | | |
|---|---|---|
| श्री शिवनरपति ह | श्री शंकर श्री | रविवासर क्षत्रियकुलावतंस श्री |
| र्षनीधान मोरे( श्वर ) | शाहु छत्रपती | राजा शाहू छत्रपती स्वामी यांणी |
| सुत भैरव मुख्य | रुपानिधी प्रल्हा | राजश्री गणोबा नाईक सरदेसाई |
| प्रधान | द सुत गदाधर | मामले प्रभावली व मामले दाभोल |
| | प्रतिनिधी | यांसि आज्ञा केली ऐसी जे वेदशास्त्र- |

संपन्न कासी पाध्ये बीन अंतो पाध्ये गुणवलीकर वास्तव्य कसबे संगमेश्वर हे सांप्रत किले वंदनचे मुक्कामी स्वामीचे दर्शनास आले आपले वृत पुर्वोतर विदीत केले की आपली वृति धर्माधिकरण व जोतीष व अष्टाधिकार तर्फ संगमेश्वर व तर्फ कोडीवरे व तर्फ देवरूख व तर्फ सावर्डे व तर्फ वेलंब पुरातन पिढी दर पिढी वर्षे १५२५ कारकीर्दी दर कारकीर्दी आपला भोगवटा चालत आला आहे त्याचें तांम्रपटे व पत्रें आहेत तेण्हेप्रमाणें पुढें वृत्ति अविछिन्न वैंशपरंपरेने चालोन सत्कर्मे आचरोन स्वामीस व स्वामीच्या राज्यास कल्याणाभिवृधी चिंतुन सुखरूप राहो त केलें पाहिजे म्हणोन विनती केली व भोगवटियाचीं पत्रें दाखविलीं त्यावरून हे आज्ञापत्र तुम्हास सादर केलें असे तरी कासी पाध्ये बिन अंतो पाध्ये यांची वृति धर्माधिकरण व जोतीष व अष्टाधिकार तर्फ संगमेश्वर व तर्फ कोढीवरे व तर्फ देवरूख व तर्फ सांवर्डे तर्फ वेलंब येथील पूर्वापर भोगवटा चालत आला आहे तेण्हेप्रमाणें सदरहू वृती यांस व याचे वैंशपरंपरेस अविछिन्न चालवणे व यांची सेते व आगरें ( मौजे ) डिंगणी व मौजे आसुर्डे व मौजे गोलवली येथे पूर्वापर चालत आलीं असतील तेण्हेप्रमाणें पुढें याची यांस चालवणे या पत्राची प्रती लेहून घेऊन मुख्य पत्र वेदमूर्तीपासी देणें [1]पूर्वीपासून भोग(व)टा ता साल गुदस्ता पावेतों चालत अला असेल तो मनास आणून त्याप्रमाणे पेस्तरहि चालवणे जाणिजे लेखनालंकार 'मर्या । देयंरा । जते ।' ( तीन ओळी मो. )

रुजू बार सुरु सुद बार

---

ले. १४६ श्री श. १६७५ कार्तिक शु. १
इ. स. १७२३ नोव्हें. १९

अमणेश्वर ३

श्री शके १६७५ शोभकृत संवछरे कार्तिक सुध प्रतिपदा त दिनी रुद्रभट व

---

१ या पढील मजकूर निराळ्या वळणाचा.

बे हुजूर अतो-
वा नायेक सर
देसाई मामले
प्रभावली व दाभोळ
( शिका )
गोविंदभट्ट
फाटक वाडा
देवपाट

बालंभट व मादेभट व विष्णुभट नामजोसी वस्ती मौजे बुरबाड यासि कासी पाध्ये बिन अंतो पाध्ये गोलवलीकर धर्माधिकरणी व जोतिषी व अष्टाधिकारी प्रांत सगमेश्वर याही लिहोन दिल्हे येसे जे मौजे मजकुरी जोतिषी व धर्माधिकरण अष्टाधिकार वृत्ति पुरातन आमची आमच्या वडिलापासून चालत आली आहे या वृतिमध्यें वडील राजश्री नाईक गोसावी यांही मौजे मजकुरी तुमचे आजे याची स्थापना केली ते काली तुम्हास जीविका करून दिली होती त्यानिमित्य तुम्हां आम्हांस विवाद लागला त्यावर तुम्हीं आम्हीं राजश्री आतोबा नाईक सरदेसाई मामले प्रभावली व दाभोल यांपासी येऊन आपलाले वृत निवेदन केले व वडील नाईक गोसावी यांची पत्रें दाखविली मग रा। नाईकी तुम्हा आम्हांस समजाऊन सांगोन सदरहू आमचे वृतीमध्यें आम्हाकरवी तुम्हांस येणेप्रमाणें देविले बितपसील

कृष्णभट्ट सपरें
वासुदेव भट
सर्व बे (?)

मौजे मजकुरी आपस्तंब व साडेकर ब्राह्मण यांचे घरी तुम्हांस अगदी समध नाही सर्व वृत्त आमची असे कलम

यास सेरीज करून जे आश्वलायेन ब्राह्मण आहेत त्याचे घरी पुण्याहावाचन मात्रुकापूजन नांदी-श्राध होईल तेथे येक कलश व मातृकापूजन आम्हांस देविले येक कलश व पूर्णपात्र तुम्हास देविले कलम १

श्री देवालयामध्यें पुराणानिमित्य उभयेतापासी वडील रा। नाईक यांची पत्रे आहेत व उभयेताचाहि भोगवटा आहे यांकरितां कलह होतो यास्तव रा। नाईकी देवालयामध्यें मात्र पुराण तुम्हांस दिले अस्वथासमीप पुस्तक कथा आम्ही वाचावें कलम १

लेंग

मौजे मजकुरी श्री देवलई श्रीसनिध पुजा सांगावयाची असने ४ च्यार आहेत त्यामध्ये मुख्य असन आम्हास देविले येक बाकी असने तीन तुम्हास देविली कलम

श्रीसनीध सरदेसाई व देसाई याच्या निसबतीने व परकी कोणी कारकून श्री पूजेस येतील त्यास पूजा सहस्रनाम आम्ही सांगावे ग्रामस्त व इतर लोक येतील त्यास पूजा सहस्त्रनाम तुम्हीं सागवे कलम १

अंत्यक्रियेमध्यें सपिंडीकरण संमधे पिंडी संयोजना उपरी पिंडाची दक्षणा तुम्हांस देविली वरकड सर्व आमचे आम्हांस देविले असे कलम १

आश्वलायेन ब्राह्मण यांचे घरोपाध्यें-पण चालत आले आहे त्याचे घरी ते तुम्हांस देविले ज्याचा उपाध्य नसेल त्याचे घरोपाध्येपण आम्हांस देविले

कलम १

वईतरणी गाये आम्हास देविली पाप-
क्षयार्थ गाये तुम्हांस देविली

कलम १

आपस्तंब व खाडेकर यांचे निसबती-
ने कुणबी व कुल्या कुणबी व किंज-
लकर कुणबी यांखेरीज जे सुद्र असतील
त्याचे घरी उपाध्यपण तुम्हांस दिले
असे कलम

१

येणेप्रमाणें तुम्हांस व आम्हांस समजाविले याउपरि सदरहू तुम्हांस देविले-
प्रमाणे घेणे याखेरीज मौजे मजकुरीं सर्व शुभकर्म व ज्योतिष व धर्माधिकरण व
शांतिक पौष्टिक व्रतोद्यापन सदरहू सर्व वृती आमची असे यांसी तुम्हांसी संमध
नाहीं लिहिल्याप्रमाणें तुम्ही आम्ही उतरोत्तर चालों सालमजकुरीं राजश्री अंतोबा
नाईक यापासोन पुराण व उपाध्यपणाचे पत्र नेलें असेल तें रा। नाईक गोसावी
याही रद् केले असे[1] लिहिले याप्रा। काशीपाध्ये मान्य[2]

साक्ष तरीख छ २९ माहे मोहरम सुा। आर्बा अशरीन मया अलफ

---

ले. ३४७ श्रीनरहरीवरद श. १६४६
इ. स. १७२४

राजश्री माहाजन कुलकर्णी मौजे बुर(बा)ड गोसावी यासि

सेवक अंतोबा नायेक सरदेसाई नमस्कार सुा। इसने आर्बैन मया व अलफ
मौजे मजकूरचे ज्योतीष व धर्माधिकरण व पुराण व ग्रामोपाध्येपण वेदशास्त्रसंपन्न
राजश्री कासी पाध्ये यांचे याचप्रा। संगमेश्वर प्रातीचे वतन उपाध्यांचें वृती चाल-
वावयास बहुत यांकरितां गावगना कोठे मुतालिक ठेऊन वतनाचे अधिकार चाल-
वावे त्यासी नामजोसी उमेदवार होऊन मौजे मजकूरचे उपाध्यांचे अधिकरणाचे

---

१ या पुढील मजकूर बालबोध असून काशी पाध्ये यांच्या हातचा आहे.
तसाच 'गोविंद् भट्ट फाटक' वगैरे तीन सह्या त्या त्या व्यक्तींच्या हातच्या असून
बालबोधींत आहेत. २ याच मितीचें व याच मजकुराचें पत्र नामजोशी यांनीं
पाध्ये यास दिलें आहे तेंहि अस्सल आहे यावर जे साक्षीदार आहेत तेच त्यावरहि
आहेत. 'लिहीलेप्रा। समस्त नामजोशी मान्य असो' हा नामजोसी यांनीं दिलेल्या
पत्रांतील शेवटील मजकूर बालबोधमध्यें आहे. ३ हा खाशाच्या हातचा मजकूर.

मुतालकी करून काही दिवस चालविली याउपरी सामत नामजोसी यांस आस्ता होऊन आपले कांहीं यांत वतन आहे म्हणोन नामजोसी वेव्हार सांगावयास लागले त्यावरी तीर्थरूप राजश्री नाईकी उपाध्यांस व नामजोसी यास अजणवेलीच्या मुकामी बोलाऊन आणून व ग्रामस्तास आणोन कारिना मनासी आणितां सद्रहू-प्रा वतन उपाध्यांचें नामजोसी यांसी समंध नाहीं नामजोसी यासी कांहीं दिवस चालविले ते उपाध्याची मुतालकी ऐसा निर्वाह जाहलाच त्यावरी नामजोसी बोलिले की उपाध्यांचे वतन थोर आहे आणि स्वामीचे भिडेने कांही आम्हांसी उपाध्यांचे वतन पैकी अधिकरणे देविली तरी त्यावरी आम्ही कालहरण करू त्यावरून तीर्थरूपीं उपाध्यांस बहुत भिडेस घालून त्यापासून कांहीं अधिकरणे मागोन घेऊन नामजोशी यास देऊन त्याप्रमाणें उपाध्यांचा कागद नामजोसी यास देविला कीं आपले अधिकरणापैकी अधिकरणे तुम्हास दिली व नामजोसी याचा कागद उपा-ध्यांस याचप्रो देविला आणि तीर्थरूपीं उपाध्यांचे समाधान करून नामजोसी यास उपाध्याचे हाती दिले आणि सद्रहूप्रो नामजोसी याणी वर्तावे येसें तीर्थरूपीं सांगितलें असतां नामजोसी यांस आणखी आस्ता होऊन देविली आधिकरणातून जाजती अधिकारास कटकट करू लागले त्यावरी उभयतांचा वेव्हार श्रीमंत राजश्री सरखेलापावेतो गेले तेथे अवघे वतनदार मेलऊन उभयतांचा न्याय मनास आणितां सद्रहू वतन उपाध्यांचे नामजोसी लटके जाहाले तेव्हा तीर्थरूपांचे मुा समजावसीचा निर्वाह करून दिल्हा होता तो सहजेच लटिका जाहाला उपाध्यांचे वतन सद्रहू प्रो खरे जाहाले नामजोसी यास समंध नाहीं याप्रो उपाध्यांस श्रीमंत राजश्री सर-खेलीं पत्रे निर्वाहरूप दिली दिवाणात सारे वतनदाराच्या विद्यमाने न्याये होऊन पत्रें जाहली ती पत्रें आम्हास प्रमाण असत तीर्थरूपांच्या मुा पेसजी समजाविसी करून परस्परे उभयेतास पत्रे देविली ती लटकी जाहालीं श्रीमंत राजश्री सरखेलांचे विजेदुर्गीचे मुा निर्वाह करून नामजोसी यांसीं वतनास संमध नाही येसा निर्वाह जाहाला त्याप्रो तुम्हीं उपाध्यांचें वतन चालवणें नामजोसी यासी उपाध्यांसीं कोणेकविसी कथला करावयांसी समंध नाही याप्रमाणे तीर्थरूप नाईकाचे पत्र नामजोसी यांसी असे त्यावरून कलेल हे पत्र पाहून उपाध्यांपासी परतोन देणे जाणिजे छ ६

शोवाल साक्ष

ले. ३४८ + श. १६४७ आश्विन शु. ९
इ. स. १७२५ आक्टो. ४

राजश्री खंडोजी धुमाळ नामजाद
किले जयगड गोसावी यासी

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो कान्होजी आंगरे सरखेल रामराम सुा सन्न सीत अशरिन मयां व अलफ वेदशास्त्रसंपन्न कासी पाध्ये बिन अंतो पाध्ये गोलवलीकर गोत्र कास्यप सूत्र आश्वलायन हे भले सिष्ट षटकर्मे अग्नि-सुश्रूषादि स्नानसंध्या करून राजश्री स्वामीच्या राज्याचे कल्याण इच्छितात यांचा योगक्षेम चालिला पाहिजे यानिमित्य मौजे गोलवली ताा संगमेश्वर सुभा प्रांत राजापूर हा गाव स्थलजलतरुपाषाणनिधिनिक्षेप खेरीज हक्कदार व इनामदार दानपत्र करून देऊन दान दिल्हा असे उपाध्ये आपले पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने उपभोग करितील प्रतिवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणे या पत्राची नालीक लहून घेऊन अस्सल पत्र भोगवटियास उपाध्याजवल फिरोन देणे जाणिजे छ ८ माहे सफर

---

ले. ३४९ श्रीनरहरीवरद

श. १६५८ श्रावण शु. १२
इ. स. १७३६ आगष्ट ७

वेदमूर्ती राजश्री रघुनाथ जोसी नामजोसी
व इतर नामजोसी वस्ती मौजे बुरबाड गोसावी यासि

सेवक दादोबा नायेक व प्रहराद नायेक सरदेसाई नमस्कार सुा सब्बा सलासीन मिया अलफ मौजे मजकुरीं ज्योतिष व धर्माधिकरण व ग्रामोपाध्यपण व श्री देवालयी पुराण हे पुरातन्न वृत्त वेदशास्त्रसपन राजश्री कासी उपाध्ये गोलवलीकर यांची चालत आली असतां पेशजी तुम्ही मौजे मजकुरीं श्री देवालयी पुराण व ग्रामोपाध्यपणाविसीं उपाध्ये यांपांसी कथला केलात त्यावर उभयता अजनवेलीचे मुकामीं येऊन आपलाले वर्तमान सांगितलेत त्यावर पांचाच्या मते उभयतांचीं पत्रें भोगवटा मनांस आणितां तुम्हांपासीं येकंदर पत्र नाहीं उपाध्ये यापांसील वडिलांचे पत्र पाहिलें त्यांत लिहिले आहे जे सदरहू वृत्त उपाध्ये यांची चालत आली मध्यें नारायेण जोसी उपनाम ना[म] जोसी तुमचे वडील यांनी उपाध्यांचे मुतालिकपणे मौजे मजकुरी सदरहू वृत्त कांहीं दिवस चालविली त्यावर उपाध्यें यांचे वडिली मुतालकी दूर करून आपली वृत्त आपण चालवितात तुम्हीं कथलाकरितां तो लटका येसे पांचाच्या विचारें जालें

---

+ वरचा भाग फाटला असल्यानें 'श्री' काराचा निर्णय होत नाहीं. श्री शिवाय अक्षर वेगळें.

भोगवटा जाला तो मुतालकीमुळें जाला येसे मनसुबदाराही निवडिलें तथापि आम्हीं तुमचें अगत्य धरून पांचांकरवी उपाध्यांस बलात्कारें सांगोन मौजे मजकुरीं खांडेकर व अ(प)स्तंभखेरीजकरून ग्रामोपाध्यपण संबंधें तेरा प्रकार उपाध्यापासून घेऊन तुम्हास दिले आणि पुढे तुम्ही कथला न करावा येसा नेम केला असता मागती तुम्ही तेरा प्रकारांखेरीज ज्याजती कथला करिता म्हणोन महाज[न] व कुलकर्णी मौजे मजकूर याणीं लिहिलें त्यावरून कळों आलें याऊपरी तुम्हांस ग्रामोपाध्यपण समधें तेरा प्रकार दिले होते ते हलीं दूर केले असेत उपाध्ये चालवितील तुम्हांस तेरा प्रकारास दाखल व्हावयास गरज नाही सदरहू[1] तेरा प्रकार मना केले असेत हली उपाध्यें याबरोबर कजिया करावयास तुम्हांस प्रयोजन नाहीं पेसजी अजनवलीचे मुकामी तुम्हांस व उपाध्ये यास परस्परें पत्रें करून दिली होती ती रद्द असेत जाणिजे छ १० रासर

---

ले. ३५० + श्रीनरहरीवरद

श्रीमंत् महाराज राजश्री राव
प्रतिनिधी श्वामीचे सेवेसी

विनंती सेवक अन्तोबा नायेक सरदेसाई मामले प्रभावली व दाभोल सा। नमस्कार सेवेसी विज्ञापना तागाईत छ २७ रविलावल पावेतो वर्तमान येथास्थित असे विशेष श्वामीचे आज्ञापत्र सादर केले तेथे आज्ञा जे संगमेश्वरी तुमचे घरी कसबेयात जोसी व उपाध्ये जोतीष घटकेविशी कलह लागला आहे येसियास पुरातन घटिका कोणाची कोणी घालावी हे वर्तमान सविस्तर लिहोन पाठवणें येसी आज्ञा केली तरी आमचे संगमेश्वरीचे घरीं उपाध्ये गोलवलकर यांचे घटिका पुरातन वडिलापासोन चालिली आहे राजश्री सोमाजी नाईक वडील होते त्यानी मामलेकर जोसी यांसी दुसरी घटिका दिली होती तेच घटिका संगमेश्वरकर जोसी यासी दिली येसे वडील वडील सागत आले येसे वर्तमान आहे उभयतांस आज्ञा करणार श्वाम खावंद आहेत सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना

---

ले. ३५१ श्रीगजानन श. १७३१
स. १८०९

अजस्वारी राजश्री चितो वामन सुभेदार तालुके रत्नागिरी ता। बच्याजी शंकर कमाविसदार मौजे गोलवली ता। संगमस्वर सु॥ आशर मयातैन व अलफ

---

१ यापुढील मजकूर निराळे वळणाचा आहे. + पत्र अस्सल असून सबंद अंतोबा नायेकाच्या हातचें असावें.

वेदशास्त्र संपन्न राजश्री देवो पाध्ये व रामचद्र पाध्ये गोलवलकर याचा जोसी सग-मेस्वरकर याचा तर्फ शगमेश्वर न कोडिवरे येथील धर्माधिकरण व जोतिष व ग्रामोपाध्यणाचे वतनाविसी खटला पडोन जोसी वतने चालऊ लागले यामुले गोलव-लकर उपाध्ये गाव सोडून परागंदा जाहाले होते ते हाली आपले वृत श्रीमतास निवेदन करून भाऊबंद सुधां गांवी येऊन घरें बांधोन राहिले आहेत त्यांचे वतन विषई कागद-पत्र व साधने पाहोन बरहक इनसाफ मनास आणा-वयाविसी राजश्री सदासिव माणकेश्वर यास व आम्हास सागोन गोलवलीकर उपाध्ये यांजकडे कार्य प्रयोजने होतील तेथील सगमेश्वरकर जोसी यांचा खटला होऊ देऊ नये म्हणौन समक्ष आज्ञा जाहली त्याजवरून हरदू वाद्याचा इनसाफ पुणे मुकामी होत आहे त्याचा निर्णय होय तोपर्यत गोलवलकर उपाध्ये याजकडे कार्य प्रयोजने होतील त्यास सगमेश्वरकर जोसी याणी खटला करू नये येसा ठराव करून हे ताकीद तुम्हास सादर केली असे तरी मौजे मजकुरी गोलवलकर उपाध्ये कार्य प्रयोजने करितील तेथे सगमेस्वरकर जोसी खटला करू लागल्यास निक्षूण ताकीद करून खटला करू न देणे छ ७ जिलकाद मोर्तब सुद

मोर्त
बसु
द

---

## २४ अथणी-शेट्टी

ले. ३५१

श. १५७७ आश्वि. शु. ५
इ. स. १६५५ सप० २४

माहामेरु राजश्री सिवपा बिन
लिंगपा मुचुडी मो। पेठ का। अथणी
गोसावी यासी

दा। बा। बसपा बिन बिसलणा तेली मो। पेठ का। मजकुरु सु॥ सीत खमसैन अलफ करणे लिहून दिल्हे कर्ज कतबा येसे जे आम्ही अपुले अत्मकर्यालागी स्वामी-पासी घेतले होन २॥ अडीच होन तीनी दुवल कळतर दरमाहे दर होने येकुसी होन ०।० प्रमाणे देऊ मु॥ सुगीसी सदरहु असल कळतर सहीत देऊ हा अमचे सुरु [ त ] सक्षी हा कतबा सही सदरहु होनासी दा। अधी करून होन घेतले असे

तेरीख ३ माहे जिल्हेज गोही
( कानडी अक्षरें )

---

ल. ३५३

श. १५७८ कार्तिक व. ६
इ. १६५६ आक्टोबर २९

अली हजरत केवान रफअत मुरतारी मंजलत मिरीसशौत खुरसेसत लात इजतवार + + + गाहा + + अ + फौजदार क्षेत्र कासी + + दाम इजतहु वा अफअतहु वा शौकतहु हमिशा कामरा बाशद

•॥७ अजी मरवलीस साद् कुल येसलास अबदुलअली हवाळदार का॥ अथणी मा॥ पुरनुर माहमदापूर सलाम मोहबत अजाम मोहवल मारूज उ की पेठ का॥ मज-कुरासी कलकेत जगम येऊन फेलता लिंगाईतमधे वा जैन लोकामधे कुसूर आले हरदो खुम सरदेसी आले सदरहु हुर लिंगाई[त] लोकासी वा जैन लोकासी कायेबद्‌ल कसूर आले काये बद्‌ल झगडत असे म्हणौन पुसता हरदो खुम बोलून क उतर लिहून दिल्हे बि॥

लिगायत लोक तकरीर करून क ट उत्तर लिहून दिल्हे असे ( की ) अपले कलकेत जंगमा देव ( रु ) खेलता जैन + + गुरुसी व जैनासी पूर्वीपासून निंदा ( ? ) करीत असे माहत कदम अपुले लिंगायेताचे मजबी चालिले असे वेदशास्त्रबरहुकूम वचन करून खेळत असता जैन लोक कुसूर करून किचाट करित आहे तरी वेदशास्त्रप्रमाणे कलकेत जंगम बोलत असे येसीयासी साहेबी हरदोपासी जमान घेऊन ब्रह्म सभा पंडित शास्त्रज्ञ जेथे असेल तेथे पाठून देणे वेदशास्त्र ब्रह्मसभा निंदा पूर्वी चालिले असे शास्त्रि निंदा करावे येसे सही करून देऊन सही करून सको तरी आपण हरिलो येसे कट उतर लेहून दिल्हे

जैन लोक तकरीर करून कट उतर लिहून दिल्हे जे कलकेत जगम खेलता अपु + + जैनाचे देव वा गुरु वा जैन लोकासी + + + सिवे देत असे ते करिता लिंगायेतामधे वा अपणामधे कूसर आले असे येसियासी साहेबी आपणापासी वा लिंगायेतापासी जमाव घेऊन ब्रह्म सभा पंडित शास्त्रज्ञ कोठे असेल तेथे पाठून देणे तेथे वेदशास्त्री कलकेत जंगम अपले जैन लोकासी वा देवासी वा गुरूसी निंदा करावी येसे लिंगायेत सही केलिया हरिला वेदशास्त्री जैसे सांगतील ते प्रमाणे असो येसे कट उतर लिहून दिल्हे

येसे हरदो खुमाचे कट उतर लिहून घेऊन कासी क्षेत्र थोर ते चारी वेद शठ्शास्त्र-परायेण शडदरुशण लोकाचे तर्कशास्त्र निर्नया + + + आहे वा राज्या राज्याचे पंडित आहे + ( शा ) स्त्रज्ञ अहे म्हणौन हरदो खुमाचे पा + दिले बिद तपसील

| | |
|---|---|
| लिंगायेत खुमाचे अंनदानी | जैन खुमचे सीलास उपाध्या |
| जंगम आराध्या वा दुकस | वा दोनी सेटी सागाल |
| कलकेत जंगम वा कोडी सेटी | वा चेनी सेटीकार |
| वा राचसेटी लिंगाईत | शाहापूर |

येसे पाठविले असे खुद्दाम थोरथोर पांडित शास्त्रज्ञ शडदरषणाचे लोकासी बोलाऊन हरदो खुमाचे सदरहू तकरीर सांगोन ब्रह्मसभासी पांडित वेदशास्त्रपरायेण जेसे वेदशास्त्री निर्नया करून सांगतील ते बरहुकूम जबाब लिहून पाठविले पाहिजे हरदो खुममधे याबदल शतत (!) वाढून बहुत कचाट लागिले असे बरहक निवाडून पाठवाव्या रजा होणे अमोहीब आदील दाना असे दराज लिहने न लगे मो रवाना छ २० माहे मोहरम दरसाल सन सबा खमसेन अलफ मो

---

ले. ३५४ श. १५८०
इ. १६५८

( वरचा भाग फाटला आहे. )

बिहुजूर

गिरमाजी येसवंतराऊ
( फा. वा. शि. )
अपाजी माहादेऊ हवा-
लदार व रमाजी
भिकाजी मजमदार
पा। जबखडी
( फा. वा. शि. )
गंगापा नाईक भंडी
सौदागर

शंकराजी राजे माहलदार
लिंगोजी जिवोद्दु हुदेदार मौजे साली
जाबसेटी सेटीकार व
माहंतसेटी चुटकी
व सिदवीरसेटी व
गंगसेटी व यलसेटी
अडकी सा। पेठ जोहरापूर
व पादशापूर

माहामेरु राजश्री पार्वती अवा देसाइणी वा गदिगीआपा सिदण नंदीराउ देसाई पा। जबखडी + + समस्त माहनाड व रैयानी पेठ अथणी सु॥ सन तिसा स ( मसेन अ ) लफ कारणे लिहून दिल्हे + + + साजे आम्ही तुमचे आल + + समस्त मिलऊन येक

[ पुढील भाग गहाळ ]

---

ले. ३५५ श. १५८० मार्ग व. ४
इ. १६५८ दिसें. १

बिहुजूर हाजीर मजालसीयानि दरजागा हणमतदेव देऊल पा। जबखडी

हवालदार व कारकून देसाई
आपाजी माहादेऊ रामाजी भिमाजी

कारकुनानी का। अथणी
मीर मिया वेकटार्दी
हुदेदार तीर्मल

हवालदार (फारशी वाटोळा शिक्का ) मजमदार रुजु मजदार

(फारशी बदामी आकाराचा शिक्का) निसीद रुजु निसीदा

शकराजी माहालदार माहल मोअजम (फारशी वाटोळा शिक्का )

पार्वती अवा गदिग अपा सिद्ण कारपा नंदीराऊ देसाई (फारशी शिक्का )

गंगपाना येक भर्डी सौदागार रुा

चेनगौड पाटेल मौजे कोटलगी (नांगराचें चित्र )

लिंगोजी जितो कुलकर्णी मौजे कोटलगी

तकरीर कर्दे बाो सिद्णा भूपति देसाई वा सिद्गौडा लिगौड देसाई ता रामाजी अपाजी देसकुलकर्णी व नागौड पाटेल व सिद्गौडा चौधरी वा लिगीसेट नावणा सेटी व नागपा माहजन व समस्त वा बार बलुतेयानी काा अथणी सुाा सन तिसा खमसेन अलफ कारणे लिहून दिल्हे तकरीर ऐसा जे पेठ काा मजकुरीचे माहनाड येउनु सद्रेसी वा आम्हासी मालूम केले जे निवाड बदल आपले लिगाइताचे जगम देवरु वा जैना खुमाचे लोक निवाडबद्ल कासीसी गेले होते अपले लिंगाईत खुमाचे जगम देवर कासी होऊनु जयापत्र घेऊन आले असे दिवाण देसक व समस्त लाहान थोर समोरा जाऊन बहुमान करून बोलाऊन आणावें म्हणून त्यावरी दिवाण लोक व आम्ही व गोताचे लाहान थोर समस्त जाउनु बहुमान करून बोलाऊन आाणिले ते वरुती जैन लोक काही इस्कील करून सद्र हुजूर येउनु बोलिले नाही यावरी पांच महिनेसी जैनाचे गुरु व जैन लोक आपण जयापत्र घेउनु आले अहे दिवाण व समस्त समोरा जाऊन बोलऊन आणावे म्हणुन सद्रेसी मालूम केले ते वरुती लिंगाईत खलक येउनु सद्र हुजूर बोलिले जे जैन लोक गलतपत्र अणिले असे त्यास बोलाऊन आणावियां निसबत नाही त्यासी बोलाऊन आाणिलियां आपण राजी नाई म्हणून दुराई बाधिले काा येनापूरचे पाटेल अमगौडा जैन अपले घोडे व हसम साघाते आले होते जैनाचे गुरु व जैन लोकने येनापुराचे पाटेला अमगौडे त्याचे घोडे राऊत व हसम सहीत बोलाऊन घेऊनु येउनु बाहीर बैसोन आम्हासी सागोन पाठविलेवरी अम्ही व दिवाण व समस्त जाऊन बोलाऊन आणिले हे तकरीर सही छ १७ माहे रबिलोवल

( अष्टकोनी शिक्का )

दाा रामाजी मठपति दाो
(नांगराचें चित्र )
(तराजूचें चित्र व कानडी सही )

ले. ३५६

श. १५८० पौष व. १
इ. १६५८ दिसें. ३०

माहजर बतेरीख १५ माहे रबिलाखर बिहुजूर हाजीर मजालसीयानी कारकुनानी वा देसकानी माहलदार वामरूतसर सेटियानि हुजुरात

शंकराजी माहळद्गार माहळ
मोअजम ( फा. वा. शि. )
लिंगोजी जितो हुदेदार
मौजे सो ली
गगीसेटी पेठ जोहरापूर
( कानडी अक्षरांची एक सही )
लिंगपा आकी
यालपा आडिकी

जावी सेटी सेटीकार
पेठ जोहरापूर
( कानडी अक्षरांची एक सही )
सिद्वीर सेटी बोनु
माहातसेटी चुनकी

कारकुनानी का। अथणी

पीरमिया हुदेदार
( फा. उभा बदामी ) देसकानी
पार्वती अवा गदिगी अपां
सिद्णा रवीराऊ देसाई
पा। जबखंडी
( फा. वा. शि. )
रामाजी आपाची देस-
कुलकर्णी का। मजकूर
बि॥

वेकटार्दी तीर्मल पडित
निर्साद
सिद्ण भुपनि देसाई
व सिद्गौडा लिंगौडा
देसाई वा पाटेल का।
अथणी ( फा. अष्ट. शि. )
सिद्गौडा चौधरी

सु॥ सन तिसा खमसैन अलफ कारणे जाहले माहजर येसा जे पेठ का। अथणीचे लिगाईत ( एक ओळ फाटली ) उनु लिंगाईत माहनाड पा। जबखंडीचे थलासी आले होते समजाविसी करून बोलावियां का। मजकुरीचे कारकून व देसाई व देसकुलकर्णी वा पाटेल व चौधरी व पटणसेटी वा माहजन सेटी वा समस्त कुणबी वा बार बलुतेयानी पा। मजकुरासी येउनु बोलाविलियां पा। मजकुरीचे थल विद्-माने पुसिले की जैन वा लिंगाईतमधे कायेबद्दल कुसुरु आले असे वा लिंगाईत माहनाडाचे गुरु आलियां कोण रवेसीने येत असे वा जैनाचे गुरु कैसे येत असे वा सालाबाद कलकेत जगम देवरु खेल्लता आसे कीं नाही सालाबाद कैसे चालिले असे सांगणे म्हणून पुसतां सिद्णा भूपती देसाई वा सिद्गौडा लिंगौडा देसाई वा रामाजी आपाजी देसकुलकर्णी वा नागोडा पाटेल व सिद्गोडा चौधरी व लिंगीसेटी पटणसेटी वा नागपा जैन माहजन व समस्त वा बारा बलुतेयानि का। मजकूर तकरीर

लिहून दिल्हे जे लिगाईत माहनाडाचे गुरु आलियां समस्त माहनाड व नाडीगीर समोरा जाऊन मिरवीत अणीत असे वा कलकेत जंगम सालाबाद खेल्लत असे वा जैनाचे गुरु आलियां मिरवीत आणीत नाही उगेची येउनु आपआपले बस्तमिधे राहताती म्हणून त्यावरी तकरीर वा अहवाल लिहून हुजूर पाठविलेवरी हुजरून तकरीर व अहवाल बरहुकूम फर्मान हुमायून वा हजरत——साहेबणीचे खुर्दखत मरहमत सादीर जाहले असे फर्मान वा खुर्दखत बरहुकूम न असता कोण हिला व हरकत करील तो गुन्हेगार असे सालाबाद बरहुकूम कलकेता जगम खेलावे वा लिंगाईता माहानाडाचे गुरु मिरवीत यावे वा जैनाचे गुरु मिरवीत येऊ नये हा माहजर सही ( फा. लंबवर्तुळ मो. )

( जोडगिरीवर १ वाटोळा माहालदाराचा १ उभा बदामी हुदेदाराचा व १ अष्टकोनी देसायाचा असे तीन फा. शि. आहेत. )

---

ले. ३५७ श. १५८१ मार्गशीर्ष शु. ५
इ. १६५९ दिसेंबर ९

( फारशी ७ ओळी मजकूर व दोन शिक्के )

बजानेब समस्त माहानाड पेंठ का। अथणी मामले माहमदपूर आंकी सु॥ सन सितेन व अलफ दरीविला तुम्ही छ १ माहे रबिलवल अरीजा लिहिले जे पेंठ का। मजकुरासी हुजरून नवा ठाणदार येत असे आलेया आपणासी तकवा होईना म्हणौन तरी हुजूर या गोष्टीचे रद्बदल काही काही नाही ते गोष्टीवरोन तुम्ही बेतकवा होवे काये माना आहे तुम्ही लिहिले गोष्ठी गलत असे अता तुम्ही कोणा बाबे कांहीं अंदेशा न करिता खातीरजमा करून उदीम वेव्हार खरीद फरोख्त करून हासलि जागीर करून अपुले दौलतखोही जाहीर करून सुखे असिजे ( फा. मो. )

तेरीख ४ माहे रबिलोवल

---

ले. ३५८ श. १५९१ फाल्गुन शु. १२
इ. १६७० फेब्रु. २१

कतबा

॥ कौलनामा सेख ... ... ...

ठाणदार वा कारकुनानी का। पेठ अथणी ता। समस्त माहानाड का। पेठ मजकूर ( फारसी वाटोळा शिक्का ) सु॥ सन सबैन अलफ दादे कौलनामा येसे जे पेठेमधे गस्तीयानी आलंग राखत नाही गाव वा पेठेमधे दरोडा पडतो म्हणौन बेदील जाहले होते तरी तुम्ही काही शक आंदेशा न करिता उदीम व्यापार करून

सुखे असिले पाहिजे गस्तीयानी वा दिवाणचे लोकानी गांवामधे आलंग नोबत करवाऊन तुम्ही सुखी असणे सकळविसी अम्ही धणी असो हा कौल सही पेठेमधे बेल वा गोणी जे काये जातील ते आम्ही निघा करून देऊ

( मोर्तब फारसी अक्षरें. )

तेरीख १० माहे शिवाल

---

ले. ३५९

श. १५९२ पौष शु. १३
इ. १६७० दिसें. १४

अलमपन्हा

बडे साहेबिणी

•॥छ ( फारशी वाटोळा शिक्का ) कौलनामा दादाजी वेंकटाद्री पडित हवालदार वा मेलगिरी वेंकटाद्री पडित मजमुदार वा सिद्गौडा फर्जद भूपति देसाई वा सिद्गौड लिंगौडा देसाई वा रामाजी अणाजी देसकुलकर्णी वा सिद्गौडा भूपति पटेल वा सिद्गौडा लिंगौडा पटेल वा सिद्गौडा चौधरी का। पेठ अथणी मामले माह्मदापूर सु॥ इहिदे सबैन अलफ कारणे ता। सेटी वा समस्त माहानाड पेठ का। मजकुरासी दादे कौलनामा येसे जे तुम्हासी वा जैनासी कळसाचे कुसूर येऊन पेसजी हरदोजणासी नेमस्त करून कासीसी जाऊन निर्गम करून घेऊन येवे मणून हरदोजणापासी जमान घेऊन हारजिताचे कातबा घेऊन दोघे जणासी कासीसी पाठविले होते तरी तेथून तुम्ही जितून आले की जैनासी कळस धरावयां समध नाही मणून त्याप्रमाणें तुम्हासी कासी होऊन जयेपत्र घेऊन आले होते त्याप्रमाणे पेठ का। मजकुरासी आलेती तुम्ही जितले मणून हाजरत साहेबाचे फर्मान वा हाजरत साहेबिणीचे खुर्दखत वा का। मजकुरीचे माहाजर होऊन निवडून गेले होते तरी हाली सिद्पा......जैन केला ( मेला ? ) होता त्यानी नवी जिकीर करून सात कळस बाधून इमान घेऊन गेले मग तुम्ही समस्तजण माहानाड मिलोन (स)दरेसी मालूम केले पहिले जैनासी वा आम्हासी निवाडा होऊन हारजीतपत्र होऊन त्याप्रमाणे कागदपत्र आसता हाली नवी जिकीर करून कलस बाधून जैनानी कैसे नेले मणून बोलिलेवरी अवघे जण जैनासी धरून आणून वाजपुसी कारिता त्यानी बोलिले की आपण नेणते नेलो आपण नेण्या समध नाही पुडे जैसे निवाडपत्र जाहाले असे त्याप्रमाणे असावे या बोलासी कोण चुकेल तो दिवाणीचे गुन्हेगार असे मणून जैनानी ( पुढे दोन तीन ओळी मजकूर गहाळ. )

तेरीख ११ माहे शाबान

( फारशी अष्टकोनी शिक्का. ) सु देसकुलकर्णी येल वा ...मुतालीक देसाई

---

ले. ३६०

श. १५९३ चैत्र शु. ३
इ. १६७१ मार्च ३

श्री

बिहुजूर

| | | |
|---|---|---|
| अलगौडा फर्जंद | सिद्‌गौडा लिगौडा | रामाजी अणाजी |
| भूपति देसाई वा | देसाई वा पटेल | देसकुलकर्णी |
| पटेल का। मा। | का। मजकूर | का। मजकूर |
| ( अष्टकोनी शिक्का ) | येलबेहो | |
| ( नांगराचें चित्र ) | नरस मु॥ देसाई | |
| सिद्‌गौडा चौधरी | का। मजकूर | |

क्रयेपत्र स्वस्तिश्री नृपशालिवान सके १५९३ वीरोद्‌नाम सौवछार चैत्र सुध त्रितीया शुक्रवार तदिने बो। सिवापा मुचुडी मोकाम पेठ का। अथणी मामले पुर-नुर माहामदापूर यासी लिहून दिल्हे बो। शेखभाई बिन सेद्‌भाई कोरबले का। मज-कुराने लिहून दिल्हे क्रयेपत्र येसे जे आम्ही आपुले घर आपुले अत्मसतोशीने तुम्हासी खडून दिल्हे आसे हेनु १०८ दाहासी आसपास जागा हंम चौवरस बि तपसील पूर्व भाग वा पचम भाग वा दक्षण भाग तीनीकडे सिवपाचे घर लागले असे उतर भागासा वाट नजीक घर तलवारानी बि॥

| | |
|---|---|
| आर्ज गज सु॥ ५ | तुळ गज सुमार ४॥ |
| अनारी पाच | साडेचारी |

याणेप्रमाणे आम्ही आत्मसतोशीने खडून दिल्हे ते जागेमधे इमारती बाधून सुखी पुत्रपौवत्र नादणूक करून आसिजे पुडे ते जागेसी काही आमचे भाऊबद इस्कील करावया निसबत नाही हे आमचे वडिलाचे सुकुत साक्ष असे हा कंयपत्र सही ( षट्कोनी मोर्तब )

तेरीख १ माहे जिलकाद

रामया बिन रामया मठपती

गोही

| | | |
|---|---|---|
| मलपा होनपा | धुळी मालाब | जिवाजी सोमाजी ता। |
| वा...... | सेटी | पेठकार मजकूर पत्रप्रमाणे |
| कोटिपा मुचुडी | येलणा साठे | साक्षी |
| तुकाणा इडा जैन | रुद्रणा बिन | गिरियापा मोर्डी नदी कि |
| नरसो अपाजी | चेनदस्वा | रुद्रणा धुळसेटी डीणी |
| मु॥ सरदेसाई साक्षी | मोले दरजी | हणमणा तळवार रामणा |
| | | सिद्‌राज दकेता लिगाणा |
| | | तळवार का। मजकूर तेली |
| | | सोमणा तळवार |

बि॥ लिगोजी तीर्मल कुलकर्णी का। मजकूर

( ही सही या पत्रांत उजव्या बाजूस आडवी लिहिलेली आहे. )

ले. ३६१

श. १५९५ वैशाख वद्य ६
इ. स. १६७३ एप्रील २७

॥ कौलनामा कारकुनानी काा पेठ ( फा. वा. शि. ) आथणी मामले माह-मदपूर सुाा सलास सबैन अलफ ताा समस्त माहनाडानी काा मजकूर बादे कौल-नामा ऐसा जे तुम्ही सिवाजी भोसलेचे फित(र)त करिता गाऊ सोडोन काा कोगट-नुरासी आलेवरी मग गलबल थबिलेवरी तुम्हासी समजाविसी कर व व बदल काा कोगट्नुरासी आलेवरी तुम्ही + + मुदा सागितीले जे हजरत साहेब आले वेळेसी आपणपासी वा देसक वा मिरासीदार ऐसेपासी भेटी वा मोहीमपटी ऐसे येरीज दोन तीनी हाजराचे कतबा घेतले ते करिता कितीयेक रेयात रजीसी जाहले मग कतबा दिल्हेवरी सूटना (?) पाहून पटी करून दिल्हे पैकी ही + + ल करीत आलो ते पैकी चुकून जे बाकी राहिले आसेल ते त्यापासी घेवे या बाबे कौल पाहिजे म्हणून तरी बराये मालुमाती खातिरेसी आणून सद्रहु बाबे कौल दिल्हा आहे जे कोणावरी बाकी आसतील ते ची पा + + देऊ तुम्ही खातीरजमा करून पेठेसी येऊन अपुले उद्दीम करून सुखे आसणे या बाबे कौल आसे मोा सुद [ फा. मो. ] *

* तेरीख १९ माहे मोहरम

---

ले. ३६२

श. १५९८ चैत्र शु. १०
स. १६७६ मार्च १४

( अष्टकोनी मराठी शिक्का )

. कौलनामा अज दिवाण मशहुरल हजरत राजेश्री दत्ताजीपंत वाकेनिवीस ताां माहानाडानी व बाजे पेठ अथणी नावनिसी बिाा

| | | | |
|---|---|---|---|
| सिपवा मुर्चेडी सेटी १ | सिद्पा सिवापूर १ | सिद्वीर से-टी शाहापूर १ | सिद्पा मुद् ... ... ... |
| तानपा जैन १ | पासपा जैन १ | सत्यणा भाडे-१ | रुद्रया |
| गोपाल दलाल १ | जनपा संगोराम १ | करी १ | दलाल १ |
| दादावा दलाल १ | खडथा चाटा १ | आपाजी दलाल १ | नारपा दलाल १ |

सुहूर सन सीत सबैन अलफ यास दादे कौलनामा ऐसा जे लस्केर पेठ मज-कुरास जाऊनु तुम्हास दस्त करून आणुन पनालेयास ठेविले यावरी कितेक तुमची सडणी-दडणीची रदबदल जाहालियावरी तुम्ही खंड होनु ७००० सात हजार होनु कबूल केले तरी तुमचा मवसर पाहून सद्रहु सात हजार होनु तुम्ही कबुलाती प्रमाणे करार केले आहेत हे तुम्ही देता मुदती ... ... केले आहे

---

* हे शब्द पत्राच्या डावीकडील बोटभर कोन्या जागेत आडवे लिहिले आहेत.

| | |
|---|---|
| इा छ ९ मोहरम ता | इा छ ९ सफर ता छ ८ |
| छ ८ सफर साडेतीनी | रबिलोवल साडेतीनी |
| हजार ३५००८ होनु | हजार होनु ३५००८ |

येणेप्रमाणे सात हजार होनु मुदतीचे मुदतीस झाडा करून देणे आणि सुखे पेठ मजकुरी उदीम वेवसाय करून सुखे अशणे काही चिंता न करणे दरीबाब कौल असे रा छ ९ मोहरम पा हुजूर

मोर्तब

सुद

---

ले. ३६३ श्री श. १५९८ चैत्र शु. १३
इ. १६७६ मार्च १७

श्रीराम

माहाराज साहेब

सके १५९८ नळनाम सवछरे चैत्र सुध १३ मो किा पनाला ता राजेश्री मुद्से सेटिय पेठ रामापूर ता मोगलपा कोमटी हिरापूर ता बापूजी राम ... पै जानी ... ... इगरज गोसावी यासी लिहून दिले अथणीकर सिवपा मुचेडी १ १ सिद्पा सिवपूर १ सिद्वीर सेटी शाहापूर १ सिद्पा बारुडूर १ तवनपा जैईन १ पासापा जैईन १ सत्यपा भाडेकार १ खडोबा चाटा १ जनपा सगोराम १ अपाया दलाला १ गोपाळा दलाला १ नारपा दलाला १ दादोबा दलाला १ रुद्राजी दलाला १ येकून चौऊदा जणेनी लिहूत दिल येसे जे राजेश्री चे स्वारी पेठ अथनीसी बकाजी राजे फर्जद याची स्वारी गेली होती त्यानी आम्हासी बद करून किा मा अणिले तेथे आम्हासी खडणी केली पाद्शाही होनु ७०००८ अक्षीरी सात हजार त्यासी अम्ही तुम्हासी दिवाणमधे पैइक्यसी धणी दिले तुम्ही आम्हास सोडुऊन अणिले असे सदरहु पैके अम्ही तुम्हासी मैहिन १ मधे जे जगा मागा ते जागा देऊ या बोलास अतर पडो देणार नाही हे अमच वडिलाच इमान असे हा कतबा सैही या पैईकीयासी नुकसानीसी धाणी सिवपा मुचेडी १ सिद्पा सिवपूर १ तवनपा जैईन १ पासापा जैईन १ सदरहू पैईकी सात हजार होनू फारीक करून देऊ हे लिहिले सैही

| | |
|---|---|
| सिवपा मुचंडी ( कानडी ) | सतेपा भाडेकरी |
| सिद्प सिवपूर ( कानडी ) | जनपा... सगाराम |
| सिधवीर सेटी सहापूर ( कानडी ) | आपया दलल लिहीले प्रमाण |
| सिद्प बरुडूर ( कानडी ) | दादोबा दलअल पत्र |

तावनापा प्रमाने सही
पासान जपेटे नारपा हिरेमनी दलाल
वासील

जी हेजीव वा मुदसेटी पेठ रामापूर वा लक्षमोजी लस्किरी गंच गुजारतीने शाहारामधे रोकड पादशाही होसमान

+ ०२५ दिले छ २४ रबिलासर
१५५ मोगलपा कोमटी हिरापूर
१५० कोकडनूरमधे हेसामाव रोकड
५० छ ३० रबिलासर
+ ५० बापू पै राम धस्टे कोलापूर तवनपा पासपा सत्यपा सत्यशाहारामधे दिले
———
८०

---

ले. ३६४ श. १५९९
इ. १६७७

श्रीमंत
खडोबाय
देवस्य मुद्रा भ
द्राय राजते

कौलनामा अज दिवाण ठाणा राजश्री खडो बायेदेऊ हवालदार व कारकून सा। अथणी ता। माहानाडानी व रयानी पेठ का। अथणी सु।। समान सबैन अलफ बादे कौलनामा येसाजे हुजरून माहाराज साहेब आम्हासी हुकूम सादीर केला व रा। प त या नी व सुबेदारी आज्ञा केली की पेठ का। मजकुरासी पाठविले की पेठ मजकूर दोनी साले कुल मजरा पडिले असे सरकारीचे कौल दिधले आहे तेणेप्रमाणे माहानाडासी वा रयेतासी दिलासा देऊन कौल देऊन पेठ मामूर करवतो म्हणोन पाठविले वरी आम्ही पेठ मजकुरासी येऊन माहानाडाचे मुदा मनास सौदीचे थल विदमाने मनासी आणिता मुदा सागितला बि ता।

राजश्री राजेसाहेबाचे घोडा राऊत तीरदालकर जाजती करून......ता करिता स्वारी तर्फसी जाता नये लग गोणिया पाडून घेऊन तमाम लुटी

[ पुढील मजकूर गहाळ ]

ले. ३६५

१६०१ श्रावण व. १४
१६७९ आगष्ट २४

माहामेरु राजाधिराजेश्री सिवपा मुचडी मोकाम पेठ का। आंथणी स्वामी गोसावी यासि

दा। बो। शलिवान शके १६०१ सीधं अर्थी नाम संवछरे स्रावण वदि चतुरदसी रविवार तद्दिने होनपा बिन गगपा गु गो...मोकाम मजकूर याने लिहून दिल्हे कर्ज...येसे जे अम्ही अपुल अतमकार्यालागी स्वामियापासी घेतिल होनु ।। अक्षरी धरण घेति [ ल ] आसे यासी मुदती सुधीसी पावते करून देऊ जरी ने दु तरी होनासी कुडोच्या प्रमाणे देऊ हा आमचे वडिलाचे सुकृत साक्षी हा लिहुन दिल कतबा संही ता। छ २७ माहे रजबु गोही

......विस्वनाथ

नरसापा नि...

दपुर गोही

---

ले. ३६६

श. १६०१ माघ व. २
इ. १६७९ फेब्रु. ६

सेके १६०१ सिधार्थी नामा सवास्छेरे माघ वदी ब्दितीया सु।। समानीन अलफ छ १५ माहे मोहरम ते दिवसी मोकाम पा। तेरदाल दर जागा देसक (?) श्री चे देवाली पेठ का। अथणी वा छपन देशाचे समस्त दैव बैसोन नेम केले जे... ... उंगठ सालाबाद दोनी मुठीने देत घेत होते हाली गरगशा मनास आणून नवे जकीर जे केल... ...घेत होत ये... ... उगट येक मुठीने घेवे तसे चालू सलाबादप्रमाणे येक मुठीवाड ... ... मुठी मिरे वा सुपारीचे अट्टे तेणेप्रमाणे देत घेत जावे हाली नवे जकीर लाभ येक मुठी वा उगठ पाव येणेप्रमाणे समस्ता दैवामधील जो घेईल तो दैवा वेगळा सिवाचार कुलाचार वेगले व मोगलाचे गलबलाकरितां पा। मजकुरासी समस्त दैव आला होता अवघे दैवाचे समाधान करून पेठ का। मजकुरीचे मोकासाई वा देसकानी येऊन समाधान करून पेट मासी गेलेवरी पेठेमधे बिसक बाद येक मुठी लाभ व उगठ येक मुठी मिरे सुपारीसी देत घेत होते तैसेचि सुपारी वा मिरे जे घेती स्यानी लाभ येक मुठी वा उगठ येक मुठी देत घेत जावे येकादे समई फितरत करिता अगर येक किचाट करिता समस्त दैव मेलून पेठसभा करून जे जे जागासी समस्त दैव जातील येक जागा करून राहातील ते गावीचे असपास गाऊंगावी कोणही कोणही राहातील वस्र सुपारी वा मिरे देऊ घेऊ लागतील या पेठ मजकूर बा। सालाबाद लाभ येक मुठी वा उगठ येक मुठी जैसे देवे तैसेचि देत घेत जावे हे नेम उतर सोडून दैवामधील चुकिलेया त्यासी

सिवाचार कुलाचार वा छेपन देशाचे दैवा वेगले हे नेम केले सैही यासी अलीले अलीले, दस्तुर घालून दिल्हे असे बिा तिमाजी राऊ जिवा........नारायण*

---

ले. ३६७ १६०१ फाल्गुन शु. ९
१६८० फेब्रु. २८

खान अलीशान...सा खान सा-
हेब सलाम + + + + +

१
३

तालीक

...छ वाजीबुल अज समस्त माहानाड पेठ का। अथणी मुमर पा। तेरदळ सुरसन समानीन अलफ बा। ता। छ माहे सफर साहेबाचं कदम बरकतनि पा। मजकुरा सलाबीत असो साहेब सलामत पेठ का। मजकूर व समस्त माहानाडाचं माकसुद् तरी हाजरत खान दिलीलखान याचे ताहवेली करिता जीव जिन जितरूब तमाम टाकून येकयेक चीता डे णे जन पागडी समेत जीव घेऊन बाहीर पडलो जिन जितरूब तमाम मता लुटून फना होऊन गेले तैसेच घरे व दुकान जाळून तलफ केले अैसे मधे मशुरुल राऊ अजम सीव सुभेदार पा। मजकूर यानी बहुत निशा करून घर व जागा दुकान देऊन खड...व मधे ठेऊन घेतले जे तुम्ही स्यारी रोज गुजारन करून भग तुमचा मुगा जे असल तैसाच दिलासा केला जाईल म्हणुउन बहुत वजा निशा करून ठेऊन घेतलेवरी साचं साहेबास अर्जानी मोकासा जाहाला हे आइकून बहुत खुसीहाल जाह्मलोवरी साहेबानी हि पेठवरी नजर इनायती करून माहानाडाचा समाचार घेतला नाही यावरून कुल जमाव होता तो जागा जागा जेथे वतन होते तेथे जाऊन गुजरन करावे म्हणुउनु अदेशेता राऊ आजम सीवराऊ बोलु लागले की आपणास साहेबानी कागद् पाठविला आहे कीं माहानाडा राकुं न देतां दिलासा देऊन ठेउन घेणे माहानाडाचा दिलासा करून घेऊन येऊ म्हणुऊन बोलोन जैसे तैसे जे कोणी थोड बहुत आहेती त्यांस दिलासा करून ठेऊन घेतले सर्व समाचार आइकिले की साहेब स्वारी फर्माऊन व न ह ळा स तरफेस येऊन बहुत काही फतेबाजी केले यावरी हे खबर आइकून बहुन खुसीहाल होऊन जे बंदगी होती + + + + देऊन गेले सारखे जाहाले आता साहेबानी माहानाड वरी नजर इनायेत करून आपणास पंद् काय ते सजा सादीर केले पाहिजे पेठ व गाऊ तरी कुल जाळून तलफ होऊन जिन जितरूब जाऊन रयेत लोक तमाम कगांल जाहाले आहे हे हि कुल हकीकत साहेबाच बंदगीस रोशनहि आहे

---

*या खाली कानडी, मोडी व बाळबोध मिळून ७५ सह्या आहेत.

ले. ३६८ श्री श. १६०२

स. १६८० (?)

महमेरु राजमान्य राजश्री
सिवपा मुचेडी वा जिवाजी
सोमाजी गोसावी यास

विनती पोशे जिवाजी कृस्ण नि। जानीब गा तिमाजी नाईक सेर[ण] सेरनार्थी अनुक्रमे नमस्कार विनती उपरी तुम्ही रा। नाईक पासो[न] कर्ज घेतले होन १००८ नेव सेह ते पैके अमचे गुजारतीने रा। नाइकास पावले तुमचे कतचे तुम्हास दिल्हे अता रा। नाइकास काही समध नाही विशेश लिहिणे नलगे हे विनती

साक्ष

सिवराव सुबेदार पा। तीरदल पत्र प्रमाण मुधाजी आनद हवालदार पत्र प्रमाणे

साक्ष विसाजी गंगाधर मजमूदार साक्षी

लक्ष्मवा व मोघेपा देसाई बि। रघुवपा
मु। देसाई पा। मजकूर बि। तिमाजी
नागोजी देसकुलकर्णी पा। तेरदल

[ कानडी अक्षराच्या ३ ओळी ]

---

ले. ३६९ श. १६०४

स. १६८२

( म. शि. )

कौलनामा अज सुभा राजश्री नारो राम सुभेदार व कारकून माहालानिहाय सुभा ता। आजिरे ता। बकालानी सहउपरी (?) देस तेरदल व रायेबाग व पेठ हुकेरी व बाजे देहाय मालूम बाद सुहूर सन सलास समानीन अलफ बादे कौलनामा येसाजे सा। अडगल या विलायेतीमध्ये गांवगना कितेक बैल आणून चारणीस घालीत होता त्यास दरम्याने सा। मजकुरास बैल न पाठविता परभारा चारणीस घालीत आहा तेणे करून दिवाणचे हासिलास तट पाडिला म्हणून मालूम केले तरी बराये मालुमाती सा।तिरेसी आणून तुम्हला कौल मन्हामत केला असे पेसजी प्रमाणे बैल कुल आवघेच पाठवणे आणि सिरस्तेप्रमाणे देत जाणे यावरी या गोष्टीस दगावा काही येक लागणार नाही सातीरजमा रासोन कुशहाल येत जात जाणे दरिबाब कौवल आसे छ ९ रमजान मोर्तब सूद ( बाटोळी लेखन सीमा )

ले. ३७० श्री श. १६०५
स. १६८३

राजश्री सिवापा मुचोडी गोसावी यासी

॥छ॥ सौजेनी सदाचारसपंन राजमान्या स्नेहकित कोटो नागोजी नामजाद माहालानिहाये ठाणा प्रो मुधवळ शरणार्थी विनती उपरी येथील क्षेम जाणऊन गोसावी यानी आपुले कुशल लेखन करणे आठवण करून तुम्ही पत्र पाठविले ते पाऊन समाधान पावलो भलेचे नित्य यैसीच आहे दूर असिले तरी आपले स्नेहयासी आतर पडो देत नाही तुम्ही निरतर पत्र पाठऊन आमचा समाचार घेत जाणे या उपरी तेरदाळीची राहाटी आवघी विस्तारे लिहिली तुम्हा लोकाचे सर्वस्वे चालविले तरीच तुम्ही लोक राहणार नाहीं तरी [चौकोनी मराठी शिक्का, डाव्या बाजूच्या समासांत] तुम्हासी काये ठाऊ उणे आहेती जगमसेटी मुधवळामधे आहेती ठाऊ जागा तुमचा आहे आम्हापासून कोणेविशी आतर पडणार नाही तेरदली सदाचाराचे गोस्टीस काही गदळ जाहाले आहे ते मुधवळाकडे येणार आहेती म्हणऊन लिहिले तरी ते गोस्टीचे काये आहे सदाचारासी कोणाचे साहेबी नाही तुम्ही कोणे विशई चिंता न करणे तेवडे लाहान दाचकानी जमखाने विकत मिळत आसिले तरी दोनी पाठऊन देणे काये पैका होईल तो पाठऊन देऊ येणार हाती आपुले वर्तमान पाठऊन आमचा समाचार घेत जाणे तुम्ही विवेकी आहा हे विनती

फारसी
मोर्तब

---

श. १६०५
ले. ३७१ स. १६८३

छ. कौलनामा मशरुल अनाम भगवंत राऊ सुभेदार व कारकुनानी पा तेरदल ता सिवया मुछोडी व सा माहानाड पेठ शर्जापूर पा का मा सुा अर्बा समानीन अलफ बादे कौलनाम यैसाजे तुम्ही समस्त (अष्टकोनी फारसी शिक्का) साल गुदस्ता शाहाःजादेचे तहवेली करिता पा मा सोडून परागंदा होऊन ठाणा मुधोलेसी गेले यावरी पा मारिचे देसकानी व नाडगिरानी इलतमेश केले जे मोगलाचे तहवेली करिता समस्त माहानाड पेठ मा सोडून ठाणा मजकुरासी गेले आहे येसीयासी साहेबी नजर इनायत करून ठाणा मा पावेतो जाऊन दिलासा करून पेठ मामूर करावी म्हणोन इलतमेश केली त्यावरून आम्ही व देसक व नाडगोंड ठाणा मारासी येऊन माहानाडाचे मुद्दा काये म्हणोन विचारिले तुम्ही राजश्री आबाजी राजे कदम सुभेदार व कारकुनानी ठाणा मा याचे विद्यमाने मुद्दा पेश केले मुदे बरहुकुम तपसिले हजरत साहेबसी लिहून तपसिले

कौल सादीर करावे म्हणौन आर्दास पाठविली त्यावरून हजरत साहेबी नजर इनायत करून मुदेमवाफिक तपसिले कौल मन्हामत करून पाठविले कौल प्रमाणे आम्ही चालऊन घेऊन यासी काही फरख होऊ देणार नाही पेठ मा। बाबे कौल बा। तपसिले दिवाणीचे फर्मान व हजरत मदारूल महामीचे कौल व माहाराज छत्रपतीचे कौल आणौन देऊन जे सरंजामी होवे ते तुम्ही पेश कराल ते प्रमाणे सरंजामी करून या बाबे खातीरजमा राखोन पेठ मा।रासी येऊन आबादानी करणे कौल प्रमार्णे इकजवार पा। मजकुरीचे व देसक व नाडगीर व पटेल कसबा व देसकुलकर्णी कसबा व बारा बलुते याचे निशानसी माह्मजरहि करून देऊन पेठ पा। मा। विरतमठासी इनाम जमीन चावर पाऊ दर सवाद का। मा। पैकी दिल्हे असो याप्रमाणे हुजरून हजरत साहेबांचे खुर्दखत आणौन देऊन हाली सुभाचे मिसाल करून दिल्हे असे पेठ मा।चे जे काये वस्तभाऊ व पैके गोपालराऊ नि।। राजेसाहेब घेतले असेल व नेले असेल ते तमाम आणौन देऊन हुजरही लिहून सरंजामी करून देऊन हमाबाबे खातीरजमा असोन पेठ मा।रासी येऊन मामुरी करून खुसी असणे दरिबाब कौल असे मोर्तब ( वाटोळा मो. ) ताजाकलम तंबाखू नगहत येटचद करून दर नगास होन ८॥ प्रमाणे देणे येक लावणी जकाती देणे फरोक्त जालीया त्यापासून घेणे माल धण्यापासून येक लावणीच देणे पेठ मा।रातून परपेठेस नग घातलेया जकायेती घेणार नाही येक लावणीच देणे तंबाखू जलीचचे दर नगास होन ८÷ प्रमाणे देणे मो। सूद ( बदामी फा. मो. )

तेरीख १७ माहे रजब
रजब

---

३७१ १६०५ ज्येष्ठ शु. ३
१६८३ मे. १९

( फारशी अष्टकोनी शिक्का )

कौलनामा अज रस्तखाने खुदायेवंद खा। शर्जाखान खलदअयाम दौलतहु तां माहानाडानी पेठ का। अथणी चिदानद सु।। सलास समानीन अलफ दादे कौलनामा ( फारशी वाटोळा शिक्का ) ऐसाजे पेठ का। मजकूर मोगलाचे तहवेलीकारिता जालून फना होऊन खराब जाहाले याकारिता जुजवी पेठ का। मा। मामूर होत असताना खाने अजम खैरतखान येऊन पेठ मारून खराब केले यावरी लावणी होत असतां दुसरेने मोगलाचे तहवेली येऊन जे होते ते घर व मळगी जालून खराब केलें याकारिता ४ साल पेठ मा। खराब होऊन भाईस पडोन दिवालावणी नाहीसे जाहाले पेठ मा। दैव पा। तेरदळमधे खुसवस्ती पेठ मा। विले होत नाही

म्हणुन राहिले येसेयासी पेठ मा।रवरी नजर इनायत करून पेठेचे विलेयद्दल सुजाअतमाहासी हुजरून पाठविले सुजाअतमाहा पेठ माचे देसकासी व मिरासीदारासी बोलावून आणून कौल देऊन पेठेचे उस्तवारीबद्दल मिरासीदारास मेलऊन घेऊन कौल देऊन पेठ व गाऊ मामूर करावे बदल सा माहानाडाचे दिलासाबद्दल ठाणा मुधोलासी आले मुदा मवाफिक कौल देऊन तैसेची हुजरातीचे कौल आणून देऊ म्हणऊन दिलासा दिल्हे पेठ का। मा। मोगलाचे तहवेलीकरिता खराब जाहाले दिवालावगी नाही येसेयासी खाने अजमासी देसक व मिरासीदार अर्ज केले जे पेठेसी कौल सात साले ७ देवे रवेश सालाबाद माहतकदीम भोगवटे बा। चालवावे येसीयास कानु रवेश जाथिता माहतकदीम बा। मिरासीदारकडुन लिहून घेऊन कौल दिल्हे येजे प्रा। हुजरूनहि कौल आणुन देवितो म्हणवून सुजाअतमाहा देसकासी व मिरासीदार कानु रवेश चि ता।

मिरे व सुपारी लाभ उगट दर गोणीसी मुठे २ लाभासी मुठे १ उगटासी मुठे १ व लवगा व पत्री जायेफल गडच गुळसोयरे तादुळ जिनसाना केणे जे जे धडने समान आहे तेचि धडेने जोका घेत होता तेच बा। जोका घेणे सालाबाद जे जे वस्तासी लाभ उगट आसे तेची बा। घेवे नवी जिकीर करू नये कोण करील ते गुन्हेगार

दिवाणात सालाबाद देवामधे जो कोण वडीलपण करिताती त्यानेच जावे त्या वेगले करून आपसीर कोणी जाऊ येऊ लागिले तरी दिवाणाचे गुन्हेगार

पेठ मा। जैन लोका व हटकर उगलाई वरबाड केलीया व मेयत जाहालेया कलस ठेऊ नये धरून घेऊं नये जैन लोकाने कासीचे स्थळ विदमाने हारिले कासीचे जयेपत्र व दिवाणाचा फर्मान व मोकासाईचे सु॥ व पा। जयखडी व हकजवाराचे माहाजरपत्र जाहाले आसे त्या बा। चालवावे नवी जिकीर करतील तेने दिवाणाचे गुन्हेगार

आडाणी व बाजे कानु माहतकदीम सालाबाद भोगवटा प्रा। घेवे नवी जिकीर करू नये

जकायेती पेसा व निकालु व मारी वगत (!) मा। व ठाणादारी व इरसाल व सिग सिगसिगोटी व बद्री व बरदा व अस्प घोडा व कौल कुटी व बाजे कानु जे आहे ते माहत कदीम बा। घेणे नवी जिकिर करू नये जे नवी जिकीर करतील तेने दिवाणाचे गुन्हेगार

येणे प्रमाणे तुम्हास कौल दिल्हे आहे तुम्ही सा। देव पेठ मार जाऊन पेठ मामूर करून आपुले दौलतखोई जाहीर करणे गोणिया पेठ मा।रासी येतील व पेठ मा।वरून उभेमार्ग व आडमार्ग येत जात जातील येकदर सालाबाद बा। सोने

जे ( ! ) गोणियां आलिया गेलिया माहत कदीम बा। जकायती घेऊ तुम्हांसी कोणे· बाबे अजार लागणार नाही तुम्हापासून खना व रुजानत पेठेमधे व गावामधे लावा व ती आपुले आपुले मधे झगडा भांडण कलागती खुनी खराबी व सिद्‌ल व चोरी नौनाव चाहाडी केलिया कुल तमाम माफ बारा खुनी केलिया माफ आहे येकंद्र ह्माबाबे हुजरातीचे कौल आहे तैसे तुम्हासी कौल पाठविले असे बिता।

दिवाणाचे फर्माण १ मद्‌ारुल माहमीचे कौल १ माहाराज छेत्रपती कौल १ खान खासा आमचे कौल १ येसे कौल करून पाठविले असे पेठ मा।रासी सात ७ साले कौल दिल्हे असे साल सात पावते फला व बाजे घेऊ नायेसे कौल सादीर केले आहे तो परयेत तुम्ही पेठ मा। मामूर करून घर व मळगी बाधोन सुखी खुसीहाल राहाणे कौल पुरा जाहालेवरी माहतकदीम प्रा। फला व बाजे कमावीश बाब तुम्ही जैसे सागतील त्याणे प्रा। घेऊन तुम्हांस कोणे बाबेचा अजार लागणार नाही बाट तीट मध्ये चोरानी व पुड पालेगार आजार दिल्हेया त्यास सजा देऊ तुमचे काडीचे काडी बा। आणून देऊन पालेगार व पुडाचे कमावीस असलिया दूर करून पेठमधे गोरु व बैल व म्हैसी व गाई व घोडा व दुकान फोडून व खिडकी तोडून व बाजारातीं गोणी अगर खलीती गेलीयां जे वस्त जाईल ते दिवाणातील देऊन पेठेमधे वेठी व बेगार धरावे नि।। नाही निपुत्रिक असलिया तो मयेत जाहालेयावरी त्याचे वित विभये जे असेल त्याचे देणेदारास त्याचे· वैवस्त देवाऊ या खेरीज तुम्ही जैसे जबानी सागत जाल त्या प्रा। येकंद्र कौल चालऊ परपेठेस मा।रासी गोणिया येऊन दुकानमधे साठवण करून पुढे गोणिया रवाना करावे इतुकेमधे पाऊसपाणी बहुत लागिले अगर वाटेस गलबले बहुत होऊन गोणिया राहिलिया व कितियेक रोजानी रवाना केलिया त्यासी जकायती घेऊ नये व लावणी देऊन जाणे मलसी व फकीर व फकराना व खैरत माहालदार दर बाजारासी गोणिया सुमार ६० साठी केले असे सरकारामधुन गला व ह्मा जिनस आलियां पेठेत उट घालणे नि।। नाही येणे प्रा। तुम्हास कौल सादीर केले असो मिरासीदार सालाबाद माहत कदीम बा। आसावे नवी जिकीर केलिया सजा देऊन पानाचे खोती दूर करून बीड लावणी केले आसो पानेचे नगासी जकाती होन ०~ चवल यासी दिवाणासी होन ०~। व हकदारास होन ०·।· येकून होन ०~ येणे प्रा। घेऊ या खेरीज येक पाने दिवाण व हकदार घेणे नि।। नाही पेठेमधे सादिलवार पटणसेटी येऊन घेऊ नये दुकानदारापासी सादिलवार घेऊ नये स।। देव जे अर्ज सागून पाठवितील तेणे प्रा। सरजामी करून पाठून देत जाऊन गुन्होगार नफरासी सीर मारावे सिक्के जाहाले असेल तरी देव सागून पाठविलेया सोडून देऊन तुम्ही कोण्हेबाबे अदेशा न करिता कायेहाल

होऊन पेठ मारास येऊन मामूर आबादानी करून सुखे असणे हा कौल पा। हुजूर मो। सुध ( षट्‌कोनी मोर्तब )

रु शुरु

निवसि

तेरीख २ माहे जमादिलाखर

जमादिलाखर अखेर

सुरु सुद

---

ले. ३७२ श्री शके १६०५
इ. स. १६८३

श्री सिद्धेश्वरदेव

खाने अजम सिदी खैरतखान

श्रीमतु सजन सुध सिवाचार सकल गुरु लिंग जंगम प्रेमी सिवभक्तिपरयेण परउपकारमूर्ती माहमेरु राजश्री सिवण मुछेडी वा समस्त माहनाड पेठ का। आथणी मो। पा। तेरदाल गोसावी यासी •

•।।७ विनंति बधु + सिदगोड भूपती देसाई वा पाटेल का। मजकूर शरणशरणार्थी विनंति उपरी येथील क्षेम जाणून गोसावियाने आपुले क्षेम + ल ण लिहिता आज्ञा दिल्हे पाहिजे......मोगलाचे गलबालकरिता तुम्ही वा समस्त देव आवघे मिलून पा। मजकुरासी गेलेवरी हजरत साहेबासी मोकासा अर्जानी जाहलेवरी चेनपा कु + वा जवगीकार पा। जवखडी होऊन हजरत साहेबाचे भेटीस जाऊन अपुले कफकाफ का पू न पेठ आपण मामुरी करितो म्हणून बोलोन सेवटी आपुले मुद घातले की सालाबाद भोगवटा पेठ मजकुरी सुपारी वा मिरे लाभा वा उगट यासी येक गोणीस ८। येक उगट मुठीने दता जातो आता ; तेरदालमधे समस्त माहानाडा आहेती ते गावमधे जातात लाभ उभठ दोनी मुठीने घेऊ देऊ सालाबाद प्रमाणे म्हणतात ( ऐ ) सेयासी साहेयाने आपणवरी नजर इनायत करून येक......वा वजन ८८।• येक पाऊ जोखून देवे सरीखे खुर्दखत करून दिल्हेया आपण जाऊन पेठ बिलाकुसूर मामूर करू देऊ म्हणून आम्ही पैरभार आइकलो हे वर्तमान तुम्ही आइकिले असाला तरी गोसावियाने त्या गोष्टीवरी ना जाणे सालबाद जधी पेठ जाहले आहे तधीपासून लाभ वा उगठ दोनी मुठीने देत घेत आहेती तैसेची पेठचे रवेश आहे नवे जकीर सौदीमधे बैसून राजश्री परवती आवा देसाइणी पा। जवखडी यासी बाधून घेऊन खत...करून तु नी प ड नव जकीर करून थोड दिवस मुठमार्दीने चालून घेतले तैसेची आताहि मालुमाती करून खुर्दखत करून घेतले त्या गोस्टीवरि

गोसावि याने ना जाता सालाबाद महाद् कदीम पेठ जाहले ता जैसे दोनी मुठीने लाभ वा उगठ देत घेत आहेती तैसेच पुढेहि सालबाद चालेल चालून घेणार आम्ही आसो दरमेने आम्हावितरक नवे जाकीर केले होते चालू पाहतो की काय हे गोस्टी सर्वथा चालणार नाही तुम्ही समस्त देवाचे समाधान करणे यासी आम्हापासून आतर पडणार नाहीं यासी आम्ही चुकलेया श्री स्वामी सक्षी असो सालबाद प्रमाणे दोनी मुठीने लाभ वा उगठ जैसे चालिले आहे तैसे चालू बहुत काय लिहू हे शरणर्थी ( च. मो. )

---

ले. ३७४ श. १६०५ ज्येष्ठ शु. ३
१९ मे १६८३

( फारसी अष्टकोनी शिक्का )

कौलनामा अज रख्तखाने खुदायेवंद खा। शर्जाखान खलद्यामदौलतहू ता माहानाडनि पेठ शर्जापूर कसबे तीरदल बिदानद् सु॥ सलास ( फारशी वाटोळा शिक्का ) समानीन अलफ दादे कौलनामा येसा जे का। पेठ अथणी असता दिलेलखानाचे तहवेली होऊन दौड केले त्यातर्फे आम्ही होतो अजीवारता तुम्ही पा। तेरदाळाचे आसरेयास आलेत ते अहवाल पा। मौरीचे कारकून हुजूर लिहिले की माहानाड समस्त पा। मा।रासी आले त्याचे दिलासा बहुत वजा करून पेठेचे रचणूक करावे येसेयासी साहेची पेठेचे व + + + दा चाले सारिखे कौल मन्हामत करावे म्हणोन बराये मजकूर खातिरेसी आणून तुम्हासी दिलासेयाचे कौल पाठविले होते जे तुम्ही बेफिकीर पा। मा। पेठचे रचणूक करून उद्म वेवसाऊ करून सुखे असणे पेस्तर आम्ही ते तर्फेसी येऊन तुमचे दिलासासारिखे तमाम गोस्टीचे ताहा करून देऊन त्या बग्हुकूम पेठेचे काम आद्। रवा चालऊन सुखे असणे म्हणोन तरी साल मा। शाहाजादे ये तर्फेसी आले ते धास्तीने तुम्हीं जागा सोडून परागंदा जालेती हे अहवाल तपसिले सुजाअतमाह मिया अशरफ महमद् सुभेदार येही खातिरेसी आणून लिहिले जे पेठ मा। दोनी तीन तहवेली कारिता हलास होऊन जागा सोडि ( ली ) आहे त्याकरिता पा। माचे मामुरी होईना येसीयासी साहेबी खातिरेसी आणून पेठेसी कौल हद महदूद करून अहदशर्तेनसी पाठविलेया साहेबाचे कौलावरून पेठ मामूर करतील व विलायतीचे लोकासी दिलासा होईल म्हणोन बराये मालुमाती खातिरेसी आणून तुम्हासी तपसिले कौल सादर केले असे हरबाबे पा। माचें व पेठेचे उस्तवारी बदल सुजाअत माहा मा।इलेस धणी करून आमचे जागा ठेविले असे ते जे काये कौल बोल देतील ते बाबे आम्हापासून फरख पडणार नाही ये येकीन समजणे यासी दरम्याने असे का। अथणीचे पेठ मामूर बधल कौल सादर केले असे तेही मामूर करणे सुजाअतमाहा खेरीज हरदो पेठ मारासी

जरेचे तसवीस होणार नाही हरदो पेठेसी दिवाणचे फर्मान व मदारुलमाहामी हुकुमतचे कौल व आमचे सुर्दसत येसे करून पाठविले असे ते घेऊन सुखे पेठ मा। मामूर करून असणे समस्त माहानाड अर्ज सागोन पाठवितील तेणेप्रमाणे सरंजामी करून पाठवीत जाऊ व गुन्होगार नफराचे सिके जाले असले तरी तुम्ही सागोन पाठविलेया सोडून देऊ व तुम्ही मोगलाचे धास्तीने पेठ का। अथणी सोडून परागदा होऊन आपले मालमता दार बार ( ! ) टाकून जीव घेऊन पा। मासी आलेती ते वरुती पा। माचे कारकुनी व देसाई तुमचा दिलासा करून आपले जागा ठेऊन घेऊन पा। मारी पेठ करून दुकान बाधोन उदीम व्यवसाऊ करणे तुम्हांस काडीचा अजार न लागो देता हुजूर अहवाल लेहोन पाठविले येसेयासी हुकूम सादर केले जे समस्तासी दिलासा देऊन बहुत वजाने निशा करून ठेऊन घेऊन ते जैसे कौल मागतील तैसे हुजरून सादर करू ये बाबे पेठेचे इ म दा द करणे म्हणौन पा। माचे कारकुनासी व देसाई यासी व तुम्हासी पेसजी लिहिले होते जे त्या तर्फेसी येऊन दिलासा करून तह करून देऊ पा। मा। मळगिया बाधोन रचना जाले साल मा। मोगलाचे तहवेलो या तर्फेसी जाले हे धास्तीने पा। मा। सोडून परागदा जाले येसेयासी पेठेचे व पा। मारचे इमदाद बदल सुजाअतमाहा माइलेसी हुजरून आमचे जागा ठेविले सुजाअतमाहा व देसाई समस्त माहानाडाचे मुदा बदल ठाणा मुधोलासी येऊन दिलासा केले सुजअतमाहा व देसक व नाडगीरानी व हकदार इलतमेश केले जे पेठ मा। साहेबाचे नावासी मामूर करावे तरी पेठ मासी कौल साले ११ दिल्हेया पेठ मा। आबादानी होईल पेठेस गोणिया आले तरी दर गोणास जकाती अहद शर्त करून पेठेसी

| | | |
|---|---|---|
| कौल बि ता। | सिगोटी | म्हैसीस |
| मिठ व सुपारी | बैलाशी | दे। मि- |
| व गडच सर्कंव | दरयेकासी | रासीदार |
| कापड व हमा | दे। मिरास- | टका |
| जिनस भुस आजि- | दार होन दुबळ | १० |
| लिया दर सदे | ०८ | |
| गोणियास शकर | तादूळ जोखून घ्यावे | |
| सागडली ती मु- | मापे मोजून घ्यावे | |
| गेंड १० बाद | नि। नाही किरे- | |
| करून बाकी ९० | पाइली सोती कोण्ही | |
| गोणीसी सोलवसि | करूनये | |
| प्रमाणे सोडी | अस्प दरसदेसी | |
| करून दर गोणीस | दो। मिरासीदार | |

रुके ८९ नव यास
दिंवाण व हकदार
मिरासीदार रुका
मिळोन रुके ८१
८८
बेसक व छेपाव
कापड व घोगडी
व थलभरीत व
थलकोडी कमावीस
हाली पेठ मा। भोग-
वटा जैसे चालत
आहे तैसे चालऊ
उभे मार्ग बांदीया व
हरदो गलिया दे॥ हकदार
होन ८॥

होनु अडीच २॥
बांदी बरदा स॥
फो पेठ मा। जालिया
दर दे॥ हकदार
होन ०।॥
घास व कडबी
व लकडी भारेसी
कांहीं घेऊं नये

येणे प्रमाणे कौल देणे म्हणोन इलतमेश केले बराये इलतमेश खातिरेसी आणून तुम्हांस सदरहु प्रमाणे कौल सादर केले असे सदरहु प्रमाणे देऊन सुखी असणे पेठ मारास हमा जिनस मता घेऊन येत जाणे तुम्हा-पासून खता व ख्यानत पेठेमधे व गावामधे कव्हावती आपुले आपणामधे झगडा भाडण कलागती व खून खराबी व सिद्ळकी व चोराना व चाहाड केलिया तमाम बारा खून केलिया माफ केले आहे येकदर हमा बाब कौल आहे पेठेस कौल पाहिजे म्हणऊन सुजाअतमाहा व देसाई कितीयेक रदबदल केले की पेठेसी साले ११ परियेंत रफाक घेऊ नये म्हणऊन तरी खातिरेसी आणून तुम्हास साले ११ पावेतो कौल सादर केले आहे तोवरी पेठ मामूर करून सुखी खुशहाल राहाणे कौल पुरा जालेयावरी तुम्ही जैसे सागाल तेणे प्रमाणे रफाक घेऊन तुम्हास कोण्हे बातेचा अजार लागणार नाहीं हा ट ती ट मधे चोरानी व पुडपालेगारानी आजार दिल्हेया त्यासी सजा देऊन तुमचे काडीचे बस्त आणून देऊ पेठेमधे गोरु व बैल व म्हैसी व गाये व घोडा व दुकान फोडून व खिडकी तोडून व बाजारातील गोणिया अगर खलितो गेलिया जे वस्त जाईल ते आपण देऊ पेठेमधे वेठी व बेगारी धरणे नि॥ नाही व निपुत्रीक असलिया तो मयेत जाले तरी त्याचे वित विशये जे असेल याचे देणेदारासी त्याचे येवज देवऊन या खेरीज तुम्ही जैसे सागाल तेणे प्रमाणे येकदर कौल चालऊन व पर पेठेने पेठ मारासी गोणिया येऊन दुकानामधे साठ-वण करून पुढें गोणिया रवाना करावे इतक्यामधे पाऊसपाणी बहुत लागले अगर

